# प्रेमोपहार

..................................................................

..................................................................

..................................................याजकडून

लांच्छित चंद्रमा

..................................................................

..................................................................

..................................................................

यांस

अर्पण केला आहे.

अजिंक्यतारा पुस्तक-माला.

पुस्तक १ लें.

# लांच्छित चंद्रमा.

लेखक आणि प्रकाशक:

नारायण हरि आपटे-सातारा.

मुद्रक:

दत्तात्रय गणेश खांडेकर,

लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

प्रत २०००
प्रत १००



साधी बांधणी
दहा आणे.
उंची कागद व बांधणी.
सव्वा रुपाया.

मिळण्याचें ठिकाण:—अजिंक्यतारा पुस्तकालय, सातारा.

# याच लेखकाचीं इतर पुस्तकें व कादंबऱ्या.





ऐतिहासिक

अजिंक्यतारा. ( शिल्लक नाहीं )

मानवी आशा. ०१२

आनंदमंदिर. ०४



सामाजिक

कर्मगति चित्र १ लें. ०१२

वंदावें कीं निंदावें ? ०२

कपटजाल. ०८



प्रसिद्ध होणारीं पुस्तकें

आफ्रिकेच्या जंगलांत.

[ छापत आहे ]

भुरळ चित्र २ रें.

याला कारण शिक्षण चि. ३ रें.

सर्व पुस्तकांस ट. व्ही. पी. खर्च निराळा पडेल.

मिळण्याचें ठिकाणः—अजिंक्यतारा पुस्तकालय, सातारा.





# जगदीश प्रार्थना.



ईश्वरा ! तुझ्या इच्छेनें आज मी स्वतंत्रपणें वाचकांची

अल्प-स्वल्प सेवा करण्यास

प्रारंभ केला आहे.

तरी

आजपर्यंत ज्याप्रमाणें तुझें कृपाछत्र आह्मा सर्वांवर राहिलें,

होत असलेल्या नानाविध अपराधांची जशी

तुजकडून आह्मांस क्षमा होत गेली,

व वेळो वेळीं तुझ्या अंतस्थ सूचनेमुळें जशा होणाऱ्या

चुका टळल्या

त्याचप्रमाणें

यापुढेंही तुझी कृपा आह्मावर राहो ! अपराधाची क्षमा मिळो !

अंतस्थ उपदेश जास्त जास्त मिळत जावो !

अशी मनःपूर्वक प्रार्थना करितों.



वाचकांनीं

आजवर ठेवलेल्या प्रेमाचें द्योतक

ह्मणून

हें पुस्तक

मी

माझ्या सर्व आबाल वृद्ध वाचकांच्या

कर कमलांत

सादर व प्रेमपूर्वक

अर्पण करितों.

वाचकांनीं कृपा करून या पुस्तकांचे निर्भीडपणें गुण-दोष कळवावे. कोणते भाग आवडले, कोणते भाग न आवडले व त्याचें कारण कळविल्यास मला पुढील पुस्तकांत बरीच मदत होईल. वाचक या विनंतीकडे दुर्लक्ष करणार नाहींत अशी खात्री आहे.

लेखक.

# एक रत्न हरपलें !

होय ! वाचकवृंद ! आज आह्मी एका रत्नाला हरवून बसलों आणि ह्मणूनच " लांच्छित चंद्रमा ' उदय होण्यास इतका विलंब !

माझे परममित्र, अजिंक्यतारा पुस्तकालयाचे मॅनेजर, लेखनकार्यांतील माझे एक सहाय्यक, मराठी भाषेचे एक उत्तम कवि, ' विधुरविलाप, भारद्वाज, व्हायोलेट्स, तारकापरिषद्, इत्यादि सुंदर काव्यांचे कर्ते, निष्णात ज्योतिषि आणि मराठा जातींतील एक अद्वितीय विद्वद्रत्न रा. **दिनकर नानाजी शिंदे** उर्फ **इंदुकान्त** कवि ता. २७ आक्टोबर इ. स. १९१३ रोजीं दिव्यलोकीं चालते झाले ! वर दिलेलीं विशेषणें केवळ मित्र-प्रेमानेंच दिलीं नाहींत ! त्यांत सत्य आहे ! ज्यांना त्यांच्याशीं परिचय करण्याचा सुप्रसंग प्राप्त झाला आहे, त्यांना वरील विशेषणांत अतिशयोक्ति दिसणार नाहीं अशी पूर्ण खात्री आहे. महाराष्ट्रांतील प्रसिद्ध लेखक व विद्वान् गृहस्थ त्यांचे मित्र होते ! असो.

आक्टोबर महिना सुरू झाल्यापासून रा. शिंदे ह्मणत होते कीं, " हा महिना मला वाईट आहे. या महिन्यांत मी बहुतेक मरणार ! " दुर्दैव आमचें कीं, हें त्यांचें कटु भविष्य अक्षरशः खरें झालें! भविष्यकथनावर माझा विश्वास नाहीं. माझी बरोबर जन्मवेळ अगर कुंडलीही नाहीं. तरी चेहऱ्यावरून व स्वभावावरून ते मला ह्मणत, " तुमचा एक मित्र तुह्माला धोका देईल. " भावी काळांत काय होणार आहे माहीत नाहीं. पण रा. शिंद्यांनीं स्वतःच आह्माला चांगलाच दगा दिला यांत शंका नाहीं !

मरतेवेळीं माझ्या कार्याविषयीं त्यांना चांगलें स्मरण होतें अगदीं अखेरीस त्यांनीं "भिऊं नका. आह्मी तर जातोंच आहे पण ईश्वर तुह्मांस यश देईल. " असा धीर दिला होता.

'लांच्छित चंद्रमा' चें नामकरण करण्यापासून तो त्याचा कांहीं भाग छापून होईपर्यंत रा. शिंदे यांनीं फारच श्रम घेतले व त्यांना आपल्या हातून हें काम पार पडावें, अशी फार आशा होती. तसें घडलें असतें तर आम्हांला फार संतोष वाटता; पण देवाची इच्छा तशी नव्हती !

आमच्या कार्याला मित्रनिधनामुळें मोठाच अडथळा आला व भावीकालाविषयीं मोठी शंका वाटूं लागली आहे. तरी एका हिंदी कवि मित्रानें पत्रीं कळविल्याप्रमाणें:–

मित्र ! शोक में धैर्य धारण कीजिये, यह संसार है–कर्म क्षेत्र है।
तुम कौन हो, क्या कर रहे हो, क्या तुम्हारा कर्म है ?
कैसा समय, कैसी दशा, कैसा तुम्हारा धर्म है ?
हे मित्र ! क्या यह विज्ञता भी आज तुमने दूर की ?
होती परीक्षा ताप में ही स्वर्ण के सम शूर की !

ग्रन्थमाला के विषय में सतत परिश्रम कीजिये ! कर्तव्य से न हटिये । यही परीक्षा है !

मित्राचा हा उपदेश पुढें ठेऊनच आम्ही वाचकांची सेवा करूं. ज्या वाचकांना मला आश्रय देण्याइतकी शक्ति असेल व इच्छा असेल त्यांनीं ती अवश्य द्यावी व आपल्या मंडळीकडून देववावी ! ज्यांची तशी स्थिति नाहीं त्यांनीं निदान प्रेमाशीर्वाद तरी द्यावा ! उत्कट प्रेमानें दिलेल्या आशीर्वादानेंही माझें कल्याण होईल, अशी मला खात्री आहे.

अजिंक्यतारा पुस्तकालय, सातारा. } वाचकांचा नम्र सेवक, नारायण हरि आपटे.

———

प्रस्तावनेच्या दृष्टीनें सांगण्यासारखें बरेंच आहे. पण सध्या स्थळ आणि काळ या दोहोंच्या अभावीं तो बेत रहित करावा लागत आहे. परमेश्वरकृपेनें दुसरी आवृत्ति लौकरच निघेल, अशी पूर्ण उमेद वाटते. तेव्हां त्यावेळीं 'प्रस्तावना' लिहिण्याचा मानस आहे.

*  *  *          *  *  *

प्रस्तुत कादंबरी समाजापुढें आणण्याकरितां माझ्या कित्येक परिचित आणि अपरिचित मित्रांनीं मला अतिशय सहाय्य केलें, किंबहुना त्यांच्या खटपटीमुळेंच हें पुस्तक पुढें आलें असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. तेव्हां त्या निरपेक्ष सहाय्याबद्दल मी माझ्या सर्व मित्रांचा मनःपूर्वक आभार मानतों! ईश्वरानें त्यांस सुखी ठेवावें.

*  *  *          *  *  *

या कादंबरींत नवीन गोष्ट म्हणजे प्रकरणाऐवजीं नुसत्या चढत्या फुल्यांनीं काम भागविलें आहे. त्यापासून वाचकांची कांहीं गैरसोय होणार नाहीं अशी उमेद आहे. या पुस्तकाचे मुद्रक रा. रा. दत्तात्रय गणेश खांडेकर यांनीं पुस्तक छापून काढण्याचे बाबतींत व प्रुफें तपासण्याचे बाबतींत अतिशय श्रम घेतले. या त्यांच्या उपकाराबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें.

दिवाळी १८३५.
अजिंक्यतारा पुस्तकालय,
सातारा.

वाचकांचा नम्र सेवक,
**नारायण हरि आपटे.**

T. R. Malati Bai

# लांच्छित चंद्रमा.

*



"विश्वासघात! माझ्याशीं विश्वासघात!! मालदेव माझ्याशीं विश्वासघात करीत आहे, असेंच ना तुझें ह्मणणें? छः! मग त्याबद्दल मला भ्यायचें कारण? विश्वासघात करणारानें बिचकावें पाहिजे तर! त्याकरितां मी आपलें मन कां अस्वस्थ करून घेऊं? मनगटांत बल नसेल तर खुशाल आपल्या शत्रूविषयीं साशंक होऊन काकदृष्टीनें त्याचे हालचालीकडे पाहात राहावें! मला तसें करण्याचें मुळींच कारण नाहीं. आज मी जो तुमच्या सर्वांच्या सूचना, विणविण्या, शंका बाजूला सारून येथें आलों, तुह्मी नको नको ह्मणत असतां मालदेवाच्या कन्येशीं विवाह—"

"विवाह! राणाजी, या कपटनाटकाला, या अपमानास्पद-कृत्याला आपण विवाह हें नांव देतां? स्पष्ट बोलतों याबद्दल क्षमा करा, पण मालदेवानें चालविलेली ही विटंबना—यासच जर आपण विवाह हें बहुमानास्पद नांव देत असाल, तर विवाह या शब्दाचा अर्थ तरी बदलला पाहिजे, किंवा जगांत इतरत्र चालू असलेल्या विवाहपद्धतीला कायमचा आळा घालून मालदेवानें अमलांत आणलेली हास्यास्पद विटंबना-"
"मालदेवानें मला आदरानें बोलावून आणून आपली मुलगी मला दिली—ही माझी विटंबना!" राणाजी थट्टेनें हंसून बोलूं लागला, "जनक राजानें सीता देवीला—"

"कोणीकडे देवतुल्य जनक राजा आणि कोणीकडे कपटपटू मालदेव! कोणीकडे सर्वांना मंगल झालेलें असें सीतास्वयंवर आणि कोणी-

कडे मालदेवानें केलेली आपली थट्टा! कोणीकडे मोठ मोठे राजे महाराजे, विद्वान् विप्रगण यांचे समोर सीता देवीनें रामचंद्रास वरमाला घातल्याचा मनोहर देखावा आणि कोणीकडे चितुरगडावरील एका भिकारड्या महालांत आपल्या विवाहाचा उपहास! राणाजी, अद्याप आपण हंसतां आहां, हंसा—तारुण्याचें रक्त आपल्या अंगांत सळसळत आहे, अहंकारानें आपलें मन गच्च भरलें आहे, त्यामुळें माझीही विचारवाणी आपल्यास पटत नाहीं. जा! आपण आतां पाहिजेल तें करण्यास मुखत्यार आहां! कांहीं धोका असल्यास मालकास सावध करणें हें मी सेवकाचें एक कर्तव्य समजतों. त्याप्रमाणें मी तें करून चुकलों—आतां मला आज्ञा व्हावी." अगदीं निकरावर गोष्ट आलेली पाहून राणाजींनें आपली मुद्रा गंभीर केली. त्यानें थोडा वेळ आपल्या स्वामीनिष्ठ सेवकाकडे खालपासून वरपर्यंत पाहिलें व म्हटलें, " हरदेव, खालीं बस. तारुण्यामुळें व गर्वामुळें आमची विवेकबुद्धि भ्रष्ट तर झालीच आहे, पण हरदेव, स्वामीनिष्ठेबरोबर तुझ्यांत थोडीशी राजनीतिज्ञता असती तर काय बहार झाली असती! मालदेवानें केलेल्या टवाळकीचें चित्र माझ्या डोळ्यांपुढें धरून मला तूं आज नखाच्या कामाला कुऱ्हाडीचा घाव घालण्यास सांगत आहेस—"

" म्हणजे? " हरदेवानें दचकून विचारिलें. राणाजी त्याचे मुद्रेकडे पाहात होता. काय असेल तें असो, हरदेव त्या पाहण्यानें ओशाळला. एखाद्या गोष्टीविषयीं आपलें मत ठाम झालें असतां व त्याच्या सत्याभासानें हुरळून जाऊन आपण त्याचे निराकरणास उद्युक्त झालों असतां ज्याप्रमाणें एखाद्यानें आपली कल्पना, आपली भीति व तन्निवारणार्थ आपण करत असलेले उपाय व्यर्थ आहेत असें सांगावें व ती गोष्ट एका वाक्यानेंच सिद्ध करून दाखवावी, त्यावेळीं आपली काय स्थिति होते? आपण चुकत आहोंत हें कळतांच आपण किती ओशाळे होतों? हरदेवाची अशीच स्थिति झाली. आपल्या धन्याला.आपण मोठ्या उत्सुकतेनें त्याच्यावर येऊं पाहणाऱ्या संकटाची सूचना देण्यास गेलों असतां, त्याचें खरें स्वरूप त्यास उघड करून दाखविलें असतांही त्याचें महत्त्व लक्षांत न घेतां मालकानें आपली टवाळी करावी, याचें हरदेवास

फार वाईट वाटलें. किंबहुना आपल्या धन्याचा त्यास रागही आला. आणि ह्मणूनच तो कांहींशा उद्धटपणानें राणाजीचा गर्विष्ठपणा काढण्यासही चुकला नाहीं. पण राणाजीनें त्यास " आज तूं मला नखाच्या कामास कुऱ्हाडीचा उपयोग करण्यास सांगत आहेस" असें ह्मटलें. त्यावेळीं मात्र तो दचकला. राणाजीच्या तीक्ष्ण दृष्टीनें तो ओशाळला. जें संकट आपल्याला समजलें आहे, तें आपल्या मालकाच्या नजरेसही आलें असलें पाहिजे आणि कदाचित् ते त्यांतून पार पडण्याचा उपक्रमही करीत असले तर आपल्या घाबरण्याचा कांहीं उपयोग नाहीं! असेच ओशाळवाणे विचार हरदेवाचे मनांत आले व तो खालीं पाहूं लागला. तेव्हां राणाजी त्यास सांकेतिक भाषेंत ह्मणाला, " हरदेवा, शत्रुचें कपट आपल्या लक्ष्यांत आलें आहे, असें त्यास आपल्या घाबरण्यानें अथवा उपायानें सुचवून देऊन त्यास सावध करणें चांगलें, कीं आपल्यास या कपटनाटकाचा गंधही नाहीं असें सोंग घेऊन ऐनवेळीं त्यास पालथा घालणें चांगलें? बोल, मालदेवानें केलेली कुचेष्टा–" राणाजी आपला ओष्ठदंश करून ह्मणाला, "माझ्या लक्ष्यांत आली नाहीं–पण जाऊं दे. " राणाजी कानोसा घेऊन ह्मणाला, " जा, बाहेर कोणी तरी उभें आहे असें वाटतें. पहा बरें कोण आहे तें ?–" हरदेव बाहेर गेला.

वर दिलेला संवाद एका लहानशा कोठींत घडला होता. ही कोठी हरदेवास राहण्याकरितां ह्मणून दिली गेली होती. हरदेवानेंच राणाजीला ' मला आपल्यास कांहीं महत्वाचें सांगावयाचें आहे व तें फार गुप्त आहे ' असें त्या दिवशीं दुपारीं सुचविलें होतें. हरदेव अतिशय स्वामिनिष्ठ. राणाजीचें त्याच्यावर फार प्रेम व विश्वास. हरदेवानें राणाजीला जरी ' तारुण्याचें रक्त तुमचे अंगांत सळसळत आहे ' असें ह्मटलें होतें तरी हरदेव स्वतःही तरुणच होता. राणाजीची बावीशी उलटली होती व हरदेव पंचविशीच्या जवळ जवळ पोंचला होता. फरक एवढाच कीं, हरदेवाला वाटत असे, वयाचे मानानें आपल्यास अनुभव फार आले आहेत. आपली विवेकबुद्धि धिमेपणाची व दूरदर्शीपणाची आहे. तेव्हां राणाजीनें आपल्या सल्ल्याप्रमाणें चालावें. ह्मणजे याचा अर्थ राणाजीनें आपल्या मुठींतील बाहुलें होऊन बसावें अशी मात्र हरदेवाची इच्छा

नव्हती हो! राणाजीचा स्वभाव परबुद्धीनें चालण्यासारखा नव्हता व हरदेवाची स्वामिनिष्ठाही इतक्या नीच स्वरूपाची नव्हती. श्रीमारुतीरायानें ज्याप्रमाणें रघुकुलतिलक रामचंद्राची सेवा केली, तशीच सेवा आपल्या हातून राणाजीची घडावी, हीच हरदेवाची मोठी महत्वाकांक्षा. राणाजी हीं गोष्ट जाणून होता व ह्मणूनच त्याचें हरदेवावर भावाप्रमाणें प्रेम होतें. त्यांतल्या त्यांत हरदेव आपणास मूर्ख, अविचारी, गर्विष्ठ समजून आपल्या रक्षणाकरितां झटत असतो, हें पाहून तर त्या उदारधी राणाजीला फार कौतुक वाटे. एवढेंच नव्हे तर कांहीं कांहीं प्रसंगीं हरदेवाला चिडवून त्याचेकडून 'तुह्मी अविचारी आहां, गर्विष्ठ आहां' अशीं विशेषणें लाऊन घेण्यांतही राणाजीला मौज वाटे. हें वाचून कित्येक वाचकांना मोठें नवल वाटेल; पण प्रेमाचा, विश्वासाचा, निष्ठेचा अतिरेक ओळखण्याचीं जीं कांहीं साधनें आहेत, त्यांत आपल्या कनिष्ठाकडून त्या त्या विकाराच्या भरांत होणारी पूजा हें एक होय. ही पूजा आपलें हृदय उचंबळून टाकणारी खास असते. प्रसंगविशेषीं द्रौपदीनें पांडवांची केलेली निर्भर्त्सना, सलोखा करण्याचे वेळीं भीमाचें धर्मराजाशीं उन्मत्तपणाचें वर्तन, तुकोबांचा आपल्या 'विठ्याशीं' झालेला कलह, व पौराणिक नकलांतून मारुतीच्या रामावरील रुसव्याच्या गोष्टी यांवरून आमचे वरील ह्मणण्यास बळकटी येईल.

त्याच दिवशीं संध्याकाळीं राणाजी हरदेवाकडे आला व तेथेंच त्यांचें वरील भाषण झालें; पण हें भाषण होत असतां बाहेर कोणी तरी उभें असावें असें राणाजीस वाटलें व त्यानें हरदेवास बाहेर कोण आहे तें पाहून येण्यास सांगितलें. तो गेल्यावर राणाजी उठला व बाजूला कोनाड्यांत जळत असलेल्या पंतीकडे पाहात पुटपुटला, "मालदेव, माझ्याशीं—आपल्या जांवयाशीं—तूं दगाबाजी करणार! ह्यः!" या 'ह्यः' मध्यें किती अर्थ भरला होता! आणि राणाजीच्या शरीरयष्टीकडे पाहणारास व त्याचे पराक्रम ज्यांस माहीत होते त्यांस हें तिरस्कारपूर्ण 'ह्यः' किती सार्थ आहे, हें चांगलें कळून चुकलें असतें. असो.

हरदेव बाहेर आला. पाहतो तों एक अपरिचित तरुण अंगणांत हिंडत होता. या वेळीं जरी तो दारापासून दूर चांदण्यांत होता, तरी

आपण आंत बोलत होतों, त्या वेळीं हा दाराबाहेर उभा राहून आपल्या गोष्टी ऐकत असावा, अशी हरदेवास शंका आली. त्यानें किंचित् पुढें होऊन विचारलें " कोण तें ? " एकदम दचकून भानावर आल्या· सारखें करून या अपरिचित तरुणानें इकडे तिकडे पाहिलें. हरदेवास पाहतांच तो पुढें आला व ह्मणाला, " राणाजी इकडे आले आहेत ना?" हरदेवाची शंका वाढूं लागली. त्यानें विचारलें, " कशावरून ? आपण त्यांच्यावर कोणी पाळत ठेवणारे आहांत वाटतें ? किल्लेदारानें– " हर-देवाचे मागें कोणीसें खाकरलें ! हरदेवानें वळून पाहिलें तों राणाजी. हरदेव लाजला. तो किंचित् बाजूला सरला. राणाजीनें पुढें येऊन त्या अपरिचित तरुणास ह्मटलें, " आपलें काय काम आहे ? " दोघांनींही परस्परांकडे निरखून पाहिलें. दोघांच्याही मुद्रेवर आश्चर्य दिसलें. आलेल्या तरुणास राणाजीची तीक्ष्ण दृष्टी सहन झाली नाहीं. त्यानें आजूबाजूला व विशेषें-करून बाजूला उभा असलेल्या हरदेवाकडे साशंकपणें पाहात ह्मटलें, " मला आपल्याला कांहीं सांगावयाचें आहे. " आवाज ऐकतांच राणाजी दचकला. त्यानें पुन: एकवार त्या तरुणाकडे निरखून पाहिलें. त्या पाहण्यापासून त्यास कांहीं तरी बोध झालेला दिसला. त्यानें भुंवया अकुंचित करून दूर दिसणाऱ्या एका दिव्याकडे पाहिलें व त्याचें कोडें त्यास सुटलें. त्याचे मुद्रेवर हास्य दिसूं लागलें. त्यानें हंसत हंसत विचारलें, " मग आपल्यास एकांत पाहिजे असेल नाहीं ? " राणाजीचें तें हंसणें पाहून त्या तरुणाचें मन अस्वस्थ झालेलें दिसलें. तो पुढें चालत ह्मणाला, " हो–" राणाजी हरदेवाकडे वळून ह्मणाला, "माझी समशेर आण पाहूं. मी बसलों होतों, तेथेंच खुंटीला आहे. "

" तलवार काय करायची ? " अपरिचित तरुण ह्मणाला. " मी निःशस्त्र आहें. माझ्यासारख्या निःशस्त्र माणसाबरोबर एकटें येण्याला वीरमणी राणाजीला भीति कां वाटते ! "

राणाजी हंसला. त्यानें हरदेवास सांगितलें, " बरें, माझी तलवार महालांत पाठवून दे. मी सडाच जातों. " असें ह्मणून तो त्या तरुणा-बरोबर गेला. हरदेवाला हें बरें वाटलें नाहीं. तो हात झाडून ह्मणाला,

" आपल्या अविचारी धाडशी स्वभावानें हे आपला जीव धोक्यांत घालून घेणार. "

राणाजी व तो तरुण हरदेवाच्या कोठीपासून बरेच दूर गेले. त्या मार्गाकडे ते चालले होते तिकडे वर्दळ कमी होती. चांदणें मात्र स्वच्छ पडलें होतें. राणाजीनें पाहिलें तों डाव्या बाजूला सुमारें पन्नास साठ हातांच्या अंतरावर एक व्यक्तीही त्याच दिशेला जात होती. त्या व्यक्तीची आपल्या हालचालींवर नजर असावी असें राणाजीस वाटलें. तो मुद्दाम थांबला. अपरिचित तरुणही थांबला. त्याबरोबर ती व्यक्तिही पण थांबली. तो प्रकार पाहून मात्र राणाजीचें मन अस्वस्थ झालें. आपण आपली तलवार बरोबर आणिली असती तर बरें होतें असें त्यास वाटलें. याच वेळीं तो तरुण ह्मणाला, " राणाजी, आपण आपली समशेर आपल्याबरोबर आणिली असती तर बरें झालें असतें. " राणाजीनें आश्चर्यानें विचारिलें, " तें कसें काय ? "

" मी जें कांहीं सांगणार त्याकडे आपलें लक्ष पाहिजे. आपलें मन तर अस्वस्थ दिसतें. "

" तसें नाहीं कांहीं. " राणाजी त्याकडे निरखून पाहात ह्मणाला, " आपण खुशाल सांगा. " दोघे पुनः चालूं लागले. दूर अंतरावर चालणाऱ्या व्यक्तीनेंही तसेंच केलें. राणाजी पुटपुटला, " हरदेव खास नव्हे. " अपरिचित तरुण हळूंच ह्मणाला, " राणाजी, आपला विवाह मोठ्या मजेचा झाला नाहीं ? " राणाजीला ती सलगी झोंबली. तो त्याचा एकदम हात धरून कर्कश स्वरांत ह्मणाला, " मग ? " अपरिचित तरुण गोंधळला व भ्यालाही. त्यानें आपला हात सोडवून घेत ह्मटलें, " आपणाला राग येणें साहजिक आहे, पण आपण वास्तविक सावध असायला पाहिजे होतें. "

" अहो बा–" राणाजी जीभ चावून ह्मणाला, " मी चांगला सावध आहें. आपल्या उपदेशाचें औषध देऊन सावध करण्यास आपण आलां असल्यास आपण ही तसदी व्यर्थ घेतलीत असें मी ह्मणतों. " अपरिचित तरुण ह्मणाला, " आपण सावध आहांत हें पाहून फार आनंद

झाला; पण पहा हो, आज आपली न् आपल्या नववधुची भेट होणार आहे. तिच्या सौंदर्यमदानें कदाचित् आपण मत्त होऊन आपल्या घातक परिस्थितीला विसराल. "

राणाजी उसळून ह्मणाला, " जा! चांडाळणी! तूं अशी दचकूं नकोस-मालदेवाची रखेली मीं ओळखली. जा! पुरुषवेषानें मजकडे येऊन मला उपदेश देणाऱ्या मदनोन्मत्त बये- राणा हमीर इतका विषय-लोलुप खास नाहीं. " ही निर्भर्त्सना ऐकतांच तो तरुण अथवा ती स्त्री सर्पाप्रमाणें उलटली. ती खदखदा हंसून ह्मणाली, " राणाजी, निःशस्त्र प्रतिकार आपण कुठवर करूं शकाल? आतां आपल्यास आपली तल-वार मिळेल काय? आपल्या सैन्यांत-प्रत्यक्ष आपला प्राणप्रिय हरदेव. "

" बस्स्! चांडाळणी, यापुढें एक शब्द बोलशील-माझ्या मनुष्या-विषयीं अविश्वासाचा एक शब्द तोंडावाटें काढशील, तर मी तुझें मुस्कट रंगवीन. "

" राणाजी, मी त्याचा अस्सा प्रतिकार करीन. " असें ह्मणून तिनें आपला लपविलेला जंबिया काढून उगारला! राणाजी सावध होऊन बाजूला सरणार व ती पुरुषवेषधारी स्त्री त्याच्यावर भयंकर वार कर-णार, तोंच एक तीर सूं सूं करीत आला व त्या राक्षसिणीच्या जंबिया घेतलेल्या हाताच्या मनगटांत शिरला! त्या स्त्रीनें वेदनेनें एक किंकाळी फोडून आपलें अंग जमिनीवर टाकलें!

एकंदर प्रकार पाहून राणाजी आश्चर्यचकित झाला. त्यानें सगळी-कडे पाहिलें, पण त्यास कोणीही दिसलें नाहीं. मघाशीं दूर अंतरावर चालणारी व्यक्तिही दिसली नाहीं. तो तीर त्या व्यक्तीनेंच मारला असावा. पण ती व्यक्ति कोण? आपल्या विश्वस्त सेवकांपैकीं कोणाला संशय येऊन त्यानें तर वेळेवर मदत करण्याकरितां आगमन केलें नसेल? काय असेल तें असो, तीर मारणारी व्यक्ति व मघाशीं दुरून चालणारी व्यक्ति या एकच होत. मात्र आपल्या सेवकांपैकीं ती खास नव्हे, असेंच त्यास वाटूं लागलें! तो थोडा वेळ त्या बेशुद्ध पडलेल्या स्त्रीकडे पाहात विचार करीत उभा राहिला. तिच्या मनगटांतून रक्त वाहात होतें.

राणाजी खालीं बसला व त्यानें तो तीर उपसून काढून रक्त येऊं नये झणून जखमेच्या वरचे अंगास मनगट आवळून धरलें. आतां या बाईची व्यवस्था कशी करावयाची? अशीच हिला टाकून जाणें योग्य नाहीं व येथें राहावें तर कोणी येऊन पाहिल्यास आपल्यासंबंधीं त्यांना भलतीच शंका येणें साहजिक आहे. असा विचार करीत तो उभा होता तोंच त्या बाईची किंकाळी ऐकून दोघे चौघे धावून आले. त्यांनीं राणाजीस तेव्हांच ओळखिलें. त्यांनीं त्या पुरुषवेषधारी स्त्रीकडे पाहून झटलें, " हें कोण? " इतक्यांत त्यांचेपैकींच एक झणतो, " अरे ही तर भुलैंया! "

* *

"भुलैंया—मालदेव महाराजांची नाटकशाळा—आणि ती इथें कां?" दुसऱ्यानें प्रश्न केला व ते आलेले सगळे राणाजीकडे व भुलैंयाकडे आळीपाळीनें पाहूं लागले. राणाजीस त्या नोकरांना खरी हकीकत सांगावी कीं कसें, याचा विचार पडलेला दिसला. थोडा वेळ त्यानें सर्वांच्या मुद्रेकडे पाहिलें व नंतर झटलें, " तोंडाकडे पाहात उभे राहूं नका. हिच्या दासींना वगैरे बोलावून आणा व हिची काय ती व्यवस्था करा. जा, कोणी तरी एक दोन लोटे पाणी आणा अन् हिची जखम धुवून पाण्याची पट्टी द्या. " असें झणून त्यानें एका मनुष्यास तिचें मनगट धरण्यास सांगून तो तेथून निघून गेला.

पण त्याचें मन आतां पूर्वींइतकें स्वस्थ नव्हतें. मालदेवाचें कपट त्यानें केव्हांच ओळखून ठेवलें होतें व त्याचा ऐन वेळीं प्रतिकार कसा करावयाचा हेंही त्यानें ठरवून टाकिलें होतें. पण मालदेव आपलीं प्यादीं अशा चमत्कारिक तऱ्हेनें पुढें ढकलील असें मात्र त्यास वाटलें नव्हतें. मालदेवाच्या चालूं असलेल्या कपटनाटकांत भुलैंयाच्या आगमनाचा प्रवेश निष्कारण खास नाहीं, असें त्यास तेव्हांच कळून चुकलें; पण या चमत्कारिक प्रवेशाच्या आंतल्या बाजूस मालदेव कोणता प्रवेश घडवून आणीत आहे हें त्यास समजेना. हरदेव समजत होता तितका राणाजी बेसावध नव्हता, पण भुलैंयाचें आगमन त्यास एक विलक्षण कोडें वाटूं लागलें. बरें, भुलैंया आली ती आली. पुरुषवेषानें कां आली? तिनें एक-

दम आपल्या चमत्कारिक विवाहाचाच प्रश्न उपस्थित कां केला? आपल्या पत्नीपासून सावध राहण्याबद्दलच तिनें आपल्यास कां सुचविलें? हरदेव फितूर झाल्याचें तिनें कां दर्शविलें? असे विचार सारखे त्याच्या मनांत येऊं लागले. व हे विचार करीत करीतच तो हरदेवाच्या कोठीकडे वळला, पण हरदेव तेथें नव्हता. मात्र त्याच्या सेनेंतील एक मनुष्य तेथें बसला होता. राणाजीला पाहतांच तो उठून उभा राहिला. राणाजीनें ह्मटलें, " कायरे, तो हरदेव कुत्रा कोठें गेला? " तो प्रश्न ऐकून त्या मनुष्यास मोठें नवल वाटलें. राणाजीचें हरदेवावर फार प्रेम. असें असून ते त्यास ' कुत्रा ' हें विशेषण देतात. तो मनुष्य चुप्प बसलेला पाहून राणाजी कांहीं न बोलतां निघून गेला. तो थोडासा पुढें गेला व त्यास एकदम एक कल्पना सुचली! एखाद्या अपरिचित भुयारांत जाऊन पड-लेल्या माणसाला ज्याप्रमाणें पुष्कळ वेळ धुंडूनही वाट सांपडूं नये व आपण येथेंच कुजून मरणार असें त्यास वाटून तो निराश व्हावा न व्हावा तोंच कोठून तरी वाऱ्याची झुळूक किंवा प्रकाशाचे किरण येऊन कोठें तरी जवळपास बाहेर पडण्यास वाट आहे असें त्यास कळून यावें, त्याचप्रमाणें राणाजीची स्थिति झाली. तो थोडासा थबकून ह्मणाला, " हां, असेंच असलें पाहिजे. मुलैयाच्या सौंदर्यास बळी पडून मीं तिच्या हस्तगस्त व्हावें याच हेतूनें ही कृति लढविलेली दिसते! विषयी माल-देवाला ही युक्तिच सुचली यांत नवल नाहीं. पण आतां मीं सावध राहिलें पाहिजे. प्रत्येक पाऊल मला जपून टाकलें पाहिजे. " तो पुनः चालूं लागला व स्वगत पुटपुटला, " आपण आह्मों यापेक्षांही जास्त जागरूक राहण्याची जरूर दिसते. हरदेवाची एकदां भेट झाली पाहिजे. ह्मणजे त्यास अखेरची व्यवस्था सांगतां येईल. समजा, यदाकदाचित् त्याची भेट नच झाली व त्यापूर्वींच लढण्याचा प्रसंग आला तर? हं; त्याची नको काळजी. आतांच्या मनुष्याजवळ मी ' हरदेव कुत्रा ' हे शब्द बोलून ठेविलेच आहेत. तो हे शब्द हरदेवास सांगणार न् हरदेव त्या शब्दाचा भाव ओळखून व्यवस्था करील. मालदेव, तूं माझा सासरा! आपल्या पोरीच्या सौभाग्याशीं विश्वासघात करण्यासही तुझें मन मागें घेत नाहीं अं? नाहीं—नाहींच घेणार. तूं स्वभावतःच दुष्ट. तूं बापालाही

न जुमानणारा जांवयाला कशाला भीक घालतोयस ? (उपहासानें हंसून) आमच्या मामासाहेबांची परीक्षा तर होऊन चुकली. दोघा मेव्हण्यांचा आमच्यावर पूर्वींपासूनच डोळा आहे—आतां राहतां राहिली आमची पट्ट-राणी ! आज रात्रीच्या प्रथम भेटींतच त्यांचीही परीक्षा होऊन जाईल ! पण ती चांगली असेल हा भरंवसा बाळगणें धोक्याचेंच आहे. आपल्या-कडून सावध असावें हेंच बरें—हो, न जाणो, मालदेवासारख्याची पोर ती ! कुठला पति न कुठलं काय ? चितुरगडचें राज्य घशांत टाकण्या-करितां मालदेव टपलेला. त्यास त्याची लेक सहाय्य करणारच करणार. करा—सर्वजण माझ्याविरुद्ध कट करा. पण मामासाहेब ! ध्यानांत असूं द्या—जर माझ्या एका केंसाला धक्का लागला तर ? तर काय, हरदेव तुझ्या नरडीचा घोट घेतल्याखेरीज कधींही राहणार नाहीं. माझे लोक आहेत पांचशेंच, पण वेळ आली तर ते पांच हजाराला भारी आहेत. ” अशा प्रकारचे विचार करीत तो चालला असतां समोरून त्यास त्याचा मेहुणा बनवीर येतांना दिसला. राणाजी त्यास चुकविणार तोंच तो पुढें होऊन किंचित् ओरडून ह्मणाला, “ आ जमाईजी ! किती वेळ तरी मी आपणास हुडकीत आहें. चला, जेवायचें झालें आहे.” यावेळीं राणा-जीचे मनांत हरदेवाची भेट घेऊन त्यास पुढील सर्व व्यवस्था सांगाव-याची होती. पण तेवढ्याकरितां आपण जर बनवीरास ‘ मला काम आहे, मी मग येतों ’ असें सांगितलें तर त्यास तें खरें वाटणार नाहीं. निदान त्यास कांहीं तरी शंका येऊन तो जाण्याचें मिष करून आपल्या-वर पाळतही ठेवील, हें केव्हांही इष्ट नाहीं. तेव्हां बनवीराबरोबर आपण जावें हेंच बरें, असा विचार करून राणाजी त्यास ह्मणाला, ‘ मी आतां तिकडेच येणार होतों. ” असें ह्मणून ते दोघेही चालूं लागले. थोडा वेळ कोणीं कांहींच बोललें नाहीं. नंतर राणाजी ह्मणाला, “ काय बनवीर, आमची रवानगी करण्याचा केव्हां विचार आहे ? ”

बनवीरानें राणाजींच्या मुद्रेकडे पाहिलें. थट्टेचें हास्य तेथें दिसत होतें. बनवीर चाचरत ह्मणाला, “ विवाह तर काल झाला, अन् इतक्यांतच परत जाण्याची गडबड ? ” ह्या बोलण्यावर राणाजीच्या मनांत एक झणझणीत उत्तर देऊन मालदेवाच्या

विश्वासघाताचें उद्घाटन करण्याचें फार होतें; पण त्यानें मोठ्या कष्टानें आपली ती इच्छा दाबून ठेविली. तो कांहीं बोलणार तोंच बनवीर एका बाजूच्या वाटेला वळला. राणाजी आश्चर्यानें ह्मणाला, " अँ, तुह्मी तिकडे कोणीकडे निघाला ? "

"हो–मी तुह्माला प्रथम सांगायला विसरलों. आज आपल्याला भुलैयाबाईकडे मेजवानी आहे–" नांव ऐकतांच राणाजी दचकला. तो थबकला. ' मी तेथें येत नाहीं ' हे शब्द त्याचे अगदीं ओंठावर आले होते; पण त्यानें ते तसेच मागे सारले. त्याची ती स्थिति बनवीराच्या लक्ष्यांत आली. तो ह्मणाला, " कां तुह्मी घोंटाळतांसे ? "

"कांहीं नाहीं–कांहीं नाहीं." राणाजी चालत ह्मणाला. "मला वाटतें हा निरोप मला पूर्वींच कोणीं तरी कळविला होता. मला त्याची आठवणच नव्हती. बरें झालें तुह्मी आलांत ते. " राणाजीनें ही कांहीं तरी सबब सांगितली; पण त्याचें मन मात्र मोठ्या बुचकळ्यांत पडलें. भुलैयानें आपणास भोजनास बोलवावें याचा काय मतलब ? ती तर जखम होऊन तेथें पडली आहे ? अन् ही मेजवानीची तयारी कोणीं केली ? कांहीं तरी पेंच–कांहीं तरी कपटाचा डाव–दिसतो. चालूं द्या–मामा–फांसे टाकत चला ! यांतूनही मी निसटून आपल्या नरड्यावर हात ठेवीन ! यांतूनही बचावून मी माझा चितोरगड परत घेईन ! याच वेळीं बनवीराचे मनांत कसले विचार चालले होते हें कळण्यास कांहीं मार्ग नव्हता. त्याची मुद्रा विकारशून्य दिसत होती. इतकेंच काय, पण तो राणाजीकडे क्वचितच पाहात होता. आपल्या बोलण्याचा राणाजीवर काय परिणाम झाला हें पाहण्याची त्यास गरजच दिसली नाहीं. त्याच्या दृष्टीनें या विषयांत कांहीं विशेष मतलबही नसेल; पण राणाजीस मात्र तसें वाटलें नाहीं. मालदेवाच्या प्रत्येक कृत्याचा त्यास संशय येऊं लागला होता. अर्थात् भुलैयानें पुरुषाच्या वेषांत आपलेकडे येणें व पुनः तिच्याकडेच भोजनाचें आमंत्रण येणें या दोन गोष्टींचा परस्परांशीं चांगला दृढ संबंध असला पाहिजे असें त्यास वाटलें. तो मनांतले मनांत ह्मणाला, " हां हां ! तो डाव चुकला ह्मणून आतां ही दुसरी युक्ति योज-

लेली दिसते ! काय, मालदेव भुलैंयाकरवीं मला विष घालून मारणार ? होय-असेंच असलें पाहिजे. " हे विचार त्याचे मनांत येत होते, तोंच भुलैंयाच्या महालाजवळ ते येऊन पोंचले. यांना पाहतांच तेथील नोकराचाकरांची मोठी गडबड उडाली. ' जमाईजी पधारे-जमाईजी पधारे ' असा जिकडे तिकडे गोंगाट झाला. त्या गोंगाटानें राणाजी शुद्धीवर आला. तो पुटपुटला, " आतां मला चांगलें सावध राहिलें पाहिजे. माझा एकदम नाश करण्याची मालदेवाची इच्छा दिसत नाहीं. माझा नाश झाल्यावर त्याचा आरोप आपल्यावर येऊं नये यासाठीं तो जपतो आहे. तेव्हां देवावर विश्वास ठेवून आपण सावध राहावें हेंच बरें. " असें ह्मणून त्यानें आपले क्रोधविषयक व चिंताविषयक विचार बाजूस सारले. त्यानें आपला चेहरा हंसरा केला व तो बनवीराच्या पाठोपाठ बागेच्या फाटकांत शिरला.

चांदण्याचे दिवस असल्यामुळें महालापुढील चुनेगची चौथऱ्यावर बिछायत घातली होती. राणाजीचा दुसरा मेहुणा रणवीर स्वागत करण्याकरितां तेथें उभा होता. मध्यभागीं मुद्दाम तयार केलेल्या आसनावर राणाजीस बसविण्यांत आलें. सर्वजण आपआपल्या इतमामाप्रमाणें बसल्यावर माळ्यानें मोगऱ्याच्या फुलांनीं भरलेलीं दोन तबकें राणाजीच्या दोन्ही बाजूस आणून ठेविलीं. दोन दासी पंख्यानें वारा घालूं लागल्या व त्या कृत्रिम वायुलहरीबरोबर मोगऱ्याच्या घमघमाटानें राणाजीचें नाक दरवळून गेलें. तो प्रकार पाहून त्यास मोठी मौज वाटली. तो हंसला ! सर्पाला पकडतांना जादूगारास असेंच कांहीं करावें लागतें. हें त्याचे मनांत आलें कीं काय कोण जाणे? इतक्यांत-अहाहा ! प्रत्यक्ष रंभेप्रमाणें अलंकारभूषित अशी भुलैंया तेथें आली ! तिची मुद्रा मोठी टवटवीत दिसत होती. चेहऱ्यावर हास्य खेळत होतें. गालावरील लालीस चांगलाच रंग चढला होता. राणाजीनें पाहिलें, भुलैंयानें उजव्या हातांत एक मोठा सुगंधित पुष्पहार घेतला होता. त्या हाराचे दोन तीन वेढे तिनें आपल्या मनगटाभोंवतीं दिले होते व मधून मधून लडिवाळपणें ती त्याचा वास घेत होती. जणूं काय, एखाद्या शुभ्रकांती सर्पाला ती मंत्र घालून खेळवीत होती. हा सर्प-हा पुष्पहाराचा

फांस–राणाजीवर पडणार होता काय ? " जमाईजी,–" एवढीच हाक मारून भुलैंया हंसली ! एका सुंदरीचें मंजुळ हास्य तें ! पण राणाजीच्या कानास तें गोड लागलें नाहीं. तिनें तो हार मनगटाभोंवतीं कां गुंडाळला होता हें राणाजीनें तेव्हांच ताडलें. तो आपला ओष्ठदंश करून ह्मणाला, "अस्सें ! घडून गेलेल्या प्रसंगाची भुलैंया ओळख देणार नाहींसें दिसतें."

भुलैंया ह्मणाली, "जेवायचं झालंय्."

"मग आमचीही तयारी आहे." राणाजी एकदम ह्मणाला व उठला. भुलैंया ओळख देत नाहीं तर आपणही त्या प्रसंगाची ओळख द्यावयाची नाहीं, असा त्यानें निश्चय केला. दूर अंतरावर एक चौरंग ठेवून पाय धुण्याची व्यवस्था केली होती. जवळच एक दासी हातपाय पुसण्यास एक रुमाल घेऊन उभी होती. राणाजी पाय धुण्यास गेला. त्यानें पाय धुतले. दासीनें रुमाल पुढें केला. त्यानें तो घेण्याकरितां हात पुढें केला तोंच त्या दासीनें इकडे तिकडे पाहात प्रथम त्याचे हातांत एक चिटोरें दिलें व मागून रुमाल टाकून ती वळून बाजूला झाली ! राणाजीस आश्चर्य वाटलें. तो त्या दासीला निरखून पाहणार तों ती गेलीसुद्धां !

" आहे–आपल्यास कोणाची तरी मदत आहे. हें चिटोरें अगोदर वाचलें पाहिजे." असें ह्मणून तो पुनः बिछायतीकडे आला. रणवीर व बनवीर कांहीं बोलत होते. राणाजी आपलें यज्ञोपवित बाहेर काढीत ह्मणाला, "मला एकवार बाहेर जावयाचें आहे." बनवीरानें एका दासीला हाक मारून व्यवस्था केली.

ज्यावेळीं राणाजीस एकान्त मिळाला त्यावेळीं त्यानें मोठ्या उत्सुकतेनें तें चिटोरें वाचलें. तें पत्र मोठ्या घाईनें लिहिलें होतें. यावरून लेखकाच्या मनांत तें लिहिण्याचा विचार अगदीं एकदम आला असावा, असें स्पष्ट दिसत होतें. पत्रांत असा मजकूर होता.

" आपली मनःस्थिति एकंदर प्रकार पाहून मोठी चमत्कारिक झाली असेल. आपण या प्रसंगीं घाबरणार नाहीं अशी पूर्ण खात्री आहे. भोजनास अनमान करूं नये. विषप्रयोगाची मुळींच भीति नाहीं. सर्व जिन्नस माझ्या समोर झाले आहेत. मात्र विनंति एवढीच कीं, कोणत्याही प्रकारानें बिचकून आपले मनोविकार बाहेर दाखवूं नयेत. जें कांहीं आपणास सांगण्यांत येईल, तें सर्व खरें माना-निदान बाहेर तसें दाखवा. एकलिंगजी आपला पाठीराखा आहे."

" आश्चर्य ! या माझ्या रक्षकानें आपली सही कां केली नाहीं ? " राणाजी तें चिटोरें फाडीत ह्मणाला, " भुलैंयाच्या हातावर बाण मारणारी व पत्र पाठविणारी या दोन्ही व्यक्ति एकच दिसतात! आं ! आपली पत्नी-आपली नववधु-असेल काय ? तसें असलें तर ? मग माझ्या-सारखा भाग्यवान मीच ! पण मालदेवाचे पोटीं असें रत्न निपजणें कठीण ! माझ्या पत्नीची व माझी अद्याप तोंडओळखसुद्धां नाहीं. माझ्याविषयीं तिच्या मनांत इतकें प्रेम उत्पन्न होणें शक्य तरी कसें आहे? पण एकवार आतां हरदेवाची भेट झाली पाहिजे." असे विचार करीत तो परत महालांत आला. त्यानें संधि साधून पत्र देणाऱ्या दासीला ओळखून काढण्याचा निश्चय केला. पुनः हातपाय धुतल्यावर आपल्या दोघा मेहुण्यांसह तो भोजनास मुदपाकखान्यांत गेला. तें चिटोरें न मिळतें तर राणाजीस भोजनास बसण्यास मोठी शंका वाटली असती. पण त्या चिटोऱ्यावर त्याचा पूर्ण विश्वास बसला होता.

भोजन आटपलें. इतक्यांत मालदेवाकडून त्या दोघा भावांस बोलावणें आल्यावरून ते राणाजीची अनुज्ञा घेऊन निघून गेले. भुलैंयाच्या निजण्याच्या महालांत राणाजीस नेण्यांत आलें. भुलैंयाही मागोमाग आली. तिनें मोठ्या आदरानें त्यास एका कोचावर बसविलें व ती स्वतः विड्याचें सामान घेऊन खालीं थोड्या अंतरावर बसली. राणाजीनें तसबिरा पाहण्याचें मिष करीत तिच्या हालचालींवर नजर ठेविली. थोड्या वेळानें भुलैंया ह्मणाली, " राणाजी ! "

राणाजी आश्चर्यानें तिच्या मुद्रेकडे पाहूं लागला. भुलैंया त्याच्याकडे पाहात स्वगत पुटपुटली—" मालदेव महाराजांनीं यांच्याशीं तरी असं करायचं नव्हतं. " हें पुटपुटणें राणाजीस सहज ऐकूं गेलें. किंवा भुलैंयाची तशी इच्छाही असेल. राणाजी चिठ्ठीयांतील सूचना विसरला, " तो दचकून ह्मणाला, " काय ह्मटलेंत ? " " छे, कुठें काय ? " भुलैंया ह्मणाली, " जायफळ दिसत नाहीं. मेल्यांना हजारदां सांगितलं. थांबा अं, मी घेऊन येतं." असें ह्मणून ती तेथून निघून गेली. राणाजीस आश्चर्य वाटलें. हा काय घोंटाळा आहे ? भुलैंयाच्या मनांत आहे तरी काय ? कांहींना कांहीं तरी कपटप्रकार सुरू आहे खरा ? पण तो काय ? हाय ! एक आपल्याजवळ तलवार असती तर ? मग—मग प्रत्यक्ष यमाचीही भीति नव्हती. असे विचार त्याचे मनांत येत असतां कांहीं चाहूल लागल्यामुळें त्यानें दाराकडे पाहिलें. तो काय ? चिठोरें देणारी दासी तोंडावर बुरखा घेऊन दारांत उभी होती. राणाजी एकदम उठून पुढें होत ह्मणाला, " तीच—तीच ती."



* * *

त्या दासीला पाहतांच राणाजीस ज्याप्रमाणें आश्चर्य वाटलें, त्याचप्रमाणें त्यास आनंदही पण झाला. भुलैयाचें-अर्थात् अप्रत्यक्ष रीतीनें मालदेवाचें-चमत्कारिक वर्तन पाहून त्यास अगदीं भांबावल्यासारखें झालें होतें, आणि अशा प्रसंगांत कोण नाहीं होणार? राणाजी शूर होता, चतुर होता, दूरदर्शी होता व राजनीतिही त्यास चांगली अवगत होती. पण सध्यांची एकंदर परिस्थितिच अशी जुळून आली होती कीं, तो किंकर्तव्यमूढ झाला. भुलैया मालदेवाचे सांगण्यावरून हें सर्व करीत आहे, हें खरें कशावरून? कदाचित् ती आपल्यावर अनुरक्त झाली असेल आणि ह्मणूनच तिचे हे चाळे नसतील कशावरून? ही शंका मनांत येतांच राणाजी गोंधळला. मालदेवाच्या कपटकारस्थानांतूनही फणसांतील गुठळीप्रमाणें निघून जाणें शक्य आहे. शत्रूच्या सैन्यामध्यें सांपडून त्यांच्या तलवारी डोक्यावर नाचत असतांही त्यांतून प्राणरक्षण होणें कांहीं विशेष कठीण नाहीं. परंतु नितंबिनीरूपी वागुराच्या जाळ्यांतून निसटणें किती कठीण? किती अशक्य? मनाचें चांचल्य कोणत्या वेळीं उत्तेजित होईल व तें आपल्यास फशीं पाडील हें कोणीं सांगावें? भुलैयाबद्दल आपल्यास तिटकारा वाटतो आहे खरा; पण संसर्गानें तो वितळण्याचा संभव नाहीं काय? अलबत! पुष्कळ संभव आहे.

भुलैया तांबूल करण्याचे गडबडींत होती. त्या वेळीं राणाजीचे मनांत असेच विचार सुरू होते व त्या नागिणीच्या कामफुत्काराचा श्वास आपले अंगास लागण्यापूर्वीच आपण येथून निसटलें पाहिजे. तो श्वास अंगास लागून जहर चढल्यास त्यांत आपलें पतन होण्यास मग फार वेळ नको. हे विचार येण्याला व ती दासी दारांत दिसण्याला एकच गांठ पडली. त्याबरोबर राणाजीचे मनांत 'ज्याप्रमाणें आपलें दुर्दैव आपल्यास गर्तेत ढकलण्यास प्रयत्न करीत आहे, त्याचप्रमाणें आपलें *सुदैवही नकळत आपल्या रक्षणाची खटपट करून राहिलें असलें पाहिजे'* असें आलें, आणि केव्हांही झालें तरी असेंच आहे. 'विनाशकाले विपरीत बुद्धिः' ही ह्मण जरी खरी असली तरी ज्यावेळीं दुर्दैवाचा फांस आपल्या

गळ्याशीं बसून संकटानें आपले प्राण कोंडूं पाहतो त्याच-त्याच वेळीं सुदैवही आशेच्या रूपानें आपल्या भोंवतीं भोंवतीं घुटमळून आपलें रक्षण करूं पाहातें. त्याचेपासून आपलें रक्षण होणें किंवा दुर्दैवापासून आपलें निकृंतन होणें हें केवळ आपल्या मानसिक बलाबलावर अवलंबून आहे. संकट आलें असतां ' अरेरे, आतां मी कसचा बचावतों ' असे निराशेचे उद्गार काढणें ह्मणजे आपण आपल्या हातानें दुर्दैवाचा फांस आंवळ करून सुदैवाच्या न कळत होणाऱ्या सहाय्यावर दुगाण्या झाडण्यासारखेंच आहे. कार्यकर्ती मंडळी ह्याविषयीं फार जागरूक असतात. दुर्दैवकालांत येणाऱ्या संकटांच्या लाटांपुढें आपण चूर न होतां त्या लाटांनीं आपल्या कठोर हृदयावर आदळून चूर व्हावें अशीच त्यांची महत्वाकांक्षा असते. आणि जेथें अशी महत्वाकांक्षा आहे तेथें अपयश जाणें फार-फार कठीण! आमचा नायक अशांचपैकीं होता. आतां पुष्कळ वेळां अशा लोकानांही येत असलेल्या संकटांवर कोणतें अस्त्र फेंकावें याचा भ्रम पडतो. भुलैयाचें वर्तन पाहून राणाजी भांबावला त्याचें कारण हेंच; पण त्या दासीला पाहतांच त्यास आनंद झाला व तो एकदम तिला ह्मणाला, ' फक्त एक तलवार-' ती दासी कांहीं उत्तर देणार तोंच भुलैयाचा शब्द ऐकूं आला. त्याबरोबर ती दासी नाहींशी झाली! " चांडाळणीनें ऐन वेळीं दगा दिला! " राणाजी हात झाडून ह्मणाला-" बरें पण असो. आपल्या रक्षणकर्तीला आपला हेतु तरी कळला आहे. शक्य तो प्रयत्न करून ती आपल्याकडे तलवार पोंचवील यांत शंका नाहीं. एकदां तलवार हातीं लागल्यावर होय-ह्यः ह्यः ह्यः मालदेव-मालदेव-तूं दिव्यावरचा पतंग-" असें ह्मणून तो हंसत हंसतच कोचावर जाऊन पडला! त्याचें मन मोठें प्रफुल्लित झालें. इतक्यांत भुलैया आंत आली. तिनें सहजच राणाजीकडे पाहिलें व त्याचा तो खुललेला चेहरा पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलेंसें दिसलें. ती ह्मणाली- " आपला चेहरा मघाशीं विचारी दिसत होता. " यावेळीं राणाजीचे मनांत एक कल्पना आली. एक लहानसा दगड टाकून भुलैयाच्या मनाचा थांग घेण्यास ही संधी बरी आहे, असें त्यास वाटलें. ह्मणून तो हंसत हंसत ह्मणाला, " ह्यः, काय ह्मणालांत? हंः, त्यांत कांहीं विशेष

नाहीं. आपल्या मनासारखें कार्य घडलें नाहीं कीं, मन अस्वस्थ व्हावया-चेंच. मन अस्वस्थ झालें कीं, चेहऱ्याचा नूर बदललाच पाहिजे." असें ह्मणून त्यानें भुलैयाच्या उजव्या मनगटाकडे पाहिलें. भुलैया तें भाषण ऐकून दचकली. पण तिनें तो भाव चट्दिशीं बदलला. ती ह्मणाली, "हं हं—अस्सं. आतां आपल्या मनासारखं काय झालं? अन् त्या वेळीं काय बिघडलं होतं?" तिचा हा प्रश्न ऐकून राणाजी चकित झाला. पुरुषवेषानें आल्याची, बाग लागल्याची कांहीं कांहीं ओळख नाहीं अं? आश्चर्य! आश्चर्य!! राणाजीला दुसरें कांहीं उत्तर सुचेना. तेव्हां त्यानें उघडपणेंच भुलैयाला नरम करण्याचा प्रयत्न केला. त्यानें तिच्या मन-गटाकडे बोट दाखवीत ह्मटलें, "आपल्याला तेथें काय लागलं आहे?" आपला हा प्रश्न ऐकून भुलैया एकवार बिचकेलच बिचकेल अशी राणा-जीस मोठी आशा होती; पण शाबास भुलैया! ती निमिषभरच घोंटा-ळली असेल नसेल. लागलींच ती हंसून ह्मणाली, "अगदीं बोलतां बोलतां माझ्या मनगटाकडे लक्ष्य गेलें?" पुनः ती हंसली. त्या हंस-ण्यांत व्यंगोक्ति पूर्ण भरली होती. राणाजी घोंटाळलेला पाहून तर तिला फारच मौज वाटली. बरोबरच आहे. तरुण, कावेबाज अशा ललनेशीं संभाषण करण्यास एक प्रकारचें अंगीं चातुर्य पाहिजे. राणाजीला असा प्रसंग यापूर्वीं कधींच न आल्यामुळें शापसंभ्रममधील पुंडरिकाप्रमाणें त्याची अवस्था झाली. वनदेवतेनें पुंडरिकाच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन त्याचें सौंदर्यवर्णन केलें व एक अलौकिक सुगंधी मंजिरी त्यास अर्पण केली. त्यावेळीं त्या निष्पाप पण सुंदर ललनावर्गाशीं अपरिचित अस-लेल्या ऋषिपुत्राची कोण दुर्दशा! तो पुढें प्रांजळपणें ह्मणाला—"परि-चय नव्हता अशा स्थितींचा यास्तव तेथोनी। अधोवदन मी पुढें चाललों लज्जित होवोनी।" राणाजी ऋषिपुत्र नव्हता तरी त्यास हाकाळपर्यंत रमणीबरोबर बसण्या–उठण्याचा किंवा संभाषण करण्याचा प्रसंग मुळींच आला नसल्याकारणानें भुलैयासारख्या चतुर स्त्रीपुढें त्यास भांबावल्या-सारखें झालें. दुसरें असें असतें कीं, आपण अटकळ बांधल्याप्रमाणें जर कोणतीही गोष्ट घडून आली नाहीं तर मनुष्यास साहजिकच आश्चर्य वाटतें. स्त्रिया या स्वभावतः निर्बळ अशी राणाजीची समजूत. अर्थात्

भुलैंयाचा कावेबाजपणा मनगटावरील जखमेची गोष्ट काढतांच पार वित-ळून जाईल–मग ती गोगलगाईप्रमाणें आपल्यापुढें नम्र होईल–असें त्यास वाटत होतें; पण ती गोष्ट काढतांच तिनें ती गोष्ट तर उडवलीच, उलट आपल्यालाच प्रश्न विचारते याचा अर्थ काय ? ' अगदीं बोलतां बोलतां माझ्या मनगटाकडे लक्ष्य गेलें ? ' ह्या प्रश्नाचें उत्तर भुलैंयासारख्या स्त्रीस देणें सोपें नव्हतें. या प्रश्नावर राणाजीला पूर्व हकीगत तरी सांगणें भाग होतें. बरें समजा, त्यानें तें न सांगतां दुसरें कांहीं उत्तर दिलें तर ? भुलैं-यास तें पटेल काय ? पुनः तिनें आपल्यास चीत करण्याचे हेतुनें जर ' परकी स्त्रीकडे आपण इतक्या बारीक नजरेनें कां पाहतां ! ' असा प्रश्न केला तर ?

याप्रमाणें राणाजी आपल्या मनाला हेलकावे देत होता व भुलैंया तांबूल करण्याच्या गडबडींत वांकड्या डोळ्यांनीं त्याची ती स्थिति पाहून मनांतल्या मनांत हंसत होती. तिचे मानसिक विचार स्पष्टपणें कळ-ण्यास जरी मार्ग नव्हता, तरी त्यावेळीं तरी ती आपल्या मनांत, " कां राणाजी, झाली ना फजिती ? बायकांना तुम्ही चीत करणार होय ! हें शक्य तरी कसें ? घोंटाळा–असेंच घोंटाळत रहा ! आपला शूरपणा येथें कांहीं काम देणार नाहीं. " असेंच म्हणत असली पाहिजे.

इकडे राणाजी भुलैंयाला बरोबर झोंबेल, असें उत्तर शोधून काढ-ण्याचा प्रयत्न करीत होता. त्यानें नानाप्रकारें विचार केला; पण भुलैं-याला पूर्वीची सर्व हकीकत सांगून झाडल्याखेरीज ती नम्र होणें शक्य नाहीं. कपटानें, व्यंगोक्तीनें आपण तिला रंगणावर आणूं पाहिल्यास आपणच फसण्याचा संभव आहे, असेंच त्यास वाटूं लागलें. त्यानें आपल्या मनाचा कांहीं निश्चय केला व तो स्तब्ध बसला. अशा प्रकारें तो बराच वेळ स्तब्ध बसलेला पाहून मात्र दचकली. तिची मुद्रा पाल-टली. इतकी कीं, राणाजीचें तिकडे लक्ष्य असतें तर त्यानें तो फरक ओळखून कदाचित् त्या फरकाचें त्यास कारणही कळण्याचा संभव होता. पण यावेळीं तो आपल्याच विचारांत गुंग होता. भुलैंया कां दचकली? कारण उघड आहे. राणाजीचें मन क्षुब्ध झालेलें आहे व आतां ते

आपली उघड उघड खरडपट्टी काढणार हें त्या चतुर स्त्रीनें तेव्हांच ओळखलें. आतां यास काय युक्ति करावी? राणाजी क्रुद्ध होऊन आपली उघड निर्भर्त्सना करूं लागल्यास त्यांत आपल्यास जय येणें शक्य नाहीं. आणि हें तर भुलैयेला इष्ट नव्हतें. कांहींही युक्ति करून राणाजीचे नाकांत वेसण आडकविण्याचा तिचा पूर्वीपासूनचा उद्देश. असें असतां व तशा प्रकारचा सर्व घाट हाकाळपर्यंत जुळून आला असतां अगदीं ऐन वेळीं–सुईच्या नेढ्यांत धागा आडकविण्याचे वेळीं–विघ्न येऊन सर्व बेत ढासळून पडण्याचा रंग यावा हें पाहून कोणास बरें वाटेल? सज्जन आणि दुर्जन यांचा आपलें ध्येय साधण्याच्या प्रयत्नाच्या कृतींत नेहमीं एक क्षुल्लक फरक असतो. सज्जनाचें ध्येय उच्च, त्याच्या सिद्ध्यर्थ होणारे त्याचे प्रयत्न उच्च व त्यावेळीं त्याची मनोवृत्तीही उच्च! दुर्जनाचें याच्या अगदीं उलट असतें. पहिल्याचें मन स्थिर तर दुसऱ्याचें चंचल. एक शंकारहीत तर एक नेहमीं साशंक! पहिला निर्भय तर दुसरा भित्रा. एक खुल्या दिलाचा तर दुसरा कपटी! अशाच प्रकारच्या दोन मनोवृत्ति चितोरगडावरील त्या महालांत परस्परांस हाणून पाडण्याचा प्रयत्न करीत होत्या! आतां यावेळीं कोणाचा जय होणार बरें?

भुलैयानें पुष्कळ पुष्कळ विचार केला; पण तिला कांहीं तोड सुचेना. विडा तयार झाला. तिनें तो पुढें केला मात्र. राणाजी ताडकन् उठला व तिच्या त्या तांबूल धरलेल्या हातावर तिरस्कारानें चापटी मारून तो ह्मणाला–" बस्स्, भुलैया! पुरें झालें हें नाटक! मी विचारतों या प्रश्नाचीं सरळ उत्तरें दे. नाहीं तर–नाहीं तर. " राणाजी मुठी वळवून पुढें कांहीं बोलणार तोंच त्यानें आपल्या मुठी सोडल्या. त्यानें हातांत हात घातले व ते आपल्या छातीवर ठेवून तो ह्मणाला, " भुलैया–नाहीं, भिऊं नकोस तूं. स्त्री आहेस, अबला आहेस, जें कांहीं करीत आहेस तें तूं त्या दुष्टाचे सांगण्यावरून करीत आहेस. क्रोधाच्या भरांत मी हें सर्व विसरलों–जा–भुलैया तूं येथून जा! जा, तुझ्या त्या मालदेवाला जाऊन सांग जा! मी त्याचा जांवई खरा; पण तो माझा प्राण घेऊं इच्छितो! त्याला सांग जा! भुलैया, तुझा हेतु पूर्ण झाला असें तूं त्याला सांग! कारण जोंपर्यंत मी निःशस्त्र आहें तोंपर्यंत मालदेवाच्या मी ताब्यांत आहें. तो माझा

नाश करूं शकेल. पण थोड्याच वेळांत माझ्या हातीं तलवार यावी अशी व्यवस्था मीं केली आहे. दचकूं नकोस. तुझ्या महालांत कोणीही फितूर नाहीं. ह्मणून ह्मणतों जा! ती तलवार हातीं येण्यापूर्वीं तूं मालदेवाला सांग जा कीं, केळवाड्याचा सिंह जाळ्यांत सांपडला! यावेळीं त्याचा नाश होणें कठीण नाहीं; पण तलवार हातांत पडली तर?" राणाजी आपल्या हाताकडे पाहात ह्मणाला—"चितोरगडावरील सर्व सेना माझ्या अंगावर कोसळून पडली तरीही मी ताब्यांत येणें शक्य नाहीं. ह्मणून ह्मणतों जा भुलैंया! तूं मालदेवाकडे जाऊन आपला जय झाल्याचें सांग!" असें ह्मणून राणाजी पलंगावर येऊन पडला! काय असेल तें असो. आतां त्याचे मनांतील शंका पार नाहींशी झाली. त्यास सर्व घोंटाळा उलगडल्यासारखें झालें. तो प्रसन्नवदनानें गर्भगळीत झालेल्या भुलैंयाकडे पाहात राहिला.

ह्यावेळीं भुलैंयाची किती चमत्कारिक अवस्था होती! राणाजीनें चवताळलेल्या वाघाप्रमाणें हातावर चापट मारतांच भीतीनें तिची अगदीं गाळण उडाली. आणि त्यावेळीं तिनें नीच स्त्रियांना अनुरूप असा मार्ग-आरडाओरड करून राणाजीची बेअब्रू करण्याचा मार्ग—धरण्याचा अगदीं निश्चय केला होता तोंच राणाजीनें आपलें सर्व स्वरूप अगदींच पालटलें! तें पाहून मात्र भुलैंया आपले कपटाचे सर्व डाव विसरली! तिनें राणाजीकडे पाहिलें. तो केळवाड्याचा सिंह, तो राजकुलतिलक, तो वीरांचा वीर तिला किती तेजस्वी दिसला! त्या तेजानें ती दिपून गेली! आणि कां नाहीं दिपून जाणार? पतिव्रतेच्या शीलामध्यें ज्याप्रमाणें सर्व ब्रह्मांडाला सजीव किंवा निर्जीव करण्याची शक्ति आहे त्याचप्रमाणें निष्पापवृत्तीच्या वीर्यशाली पुरुषांमध्येंही विलक्षण तेज आहे. प्रतिव्रतेच्या क्रोधापुढें ज्याप्रमाणें दुष्टांच्या दुष्ट मनोवृत्ति पेटल्या जाऊन त्यांत त्यांचीच आहुति पडते त्याचप्रमाणें निष्कलंक वीरापुढें कामी स्त्रिया लटपटल्याच पाहिजेत. मदनाचे फुत्कार अंगाला लागल्यानंतर अंगाचा दाह होऊन त्यांत आपल्या सौजन्याची आहुति न देणारे फार—फार विरळा. पण तसें जोंपर्यंत घडलें नाहीं तोंपर्यंत तरी प्रत्येक मानवाचे अंगीं एक विलक्षण सामर्थ्य असतें. आणि त्या सामर्थ्यापुढें तो कोणत्याही नीच मान-

वास चीत करूं शकतो. राणाजींपुढें भुलैया चीत झाली त्याचें कारण तरी हेंच होय.

भुलैया राणाजीकडे पाहात उभी राहिली! बराच वेळ राणाजीही तिच्याकडे पाहात उभा होता. ती कांहीं बोलत नाहीं असें पाहून तो ह्मणाला—"भुलैया, तूं थांबलीस कां बरें? मीं सांगितलें तें तुला खोटें कां वाटतें? तूं जाऊं लागलीस तर मी तुला आडवीन असें कां वाटतें? ह्यः भुलैया—तूं वेडी आहेस. अरेरे भुलैया—माझें बोलणें रुचेल कां नाहीं समजत नाहीं; पण बोलतोंच. भुलैया—अहाहा, भुलैया, तूं किती सुंदर आहेस? रूपानें तूं खरोखरच देवी आहेस! अंतःकरणानें तशी असतीस तर आज मला असें वाटलें असतें—तूं माझी आई असावीस! होय—भुलैया, आश्चर्यचकित होऊं नकोस—तूं माझी माता असतीस तर मी तुझ्यासारखाच सुंदर झालों असतों नाहीं? पण हाय—हाय, तुझें वर्तन पाहून तुला माझ्या सर्गस्थ मातेची उपमा देणें खरोखरच जड वाटतें! माझी माता विलक्षण शूर होती. पण ती तुझ्या इतकी रूपवान् नव्हती.* चमेलीच्या फुलाप्रमाणें ती साधी पण, गुणानें युक्त होती. भुलैया, तूं सद्गुणी असतीस तर? ब्रह्मदेवानें गुलाब पुष्पाला रंग आणि गुण दोन्हीही दिले—तुला त्यानें गुणावांचून कां बरें ठेविलें? भुलैया, तुझी भेट होई-पर्यंत मला असें वाटे, जगांतील सर्व स्त्रिया माझ्या मातेच्या सांचांतून काढलेल्या असाव्यात. पण अरेरे! भुलैया, आज तूं आपल्या वर्तनानें माझ्या त्या कल्पनेचे वाभाडे काढलेस!—"

"बस्स! राणाजी, बस्स करा!!" भुलैया जर्जर होऊन ह्मणाली, "आपल्या कल्पनेचे वाभाडे मीं काढले ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. पण ते वाभाडे पुनः जोडण्याचें सामर्थ्य या भुलैयाचे अंगांत आहे कीं

*राणाजीच्या मातेचा इतिहास या कथानकांत गोवतां येणार नाहीं व आमची तशी इच्छाही नाहीं. अन्यकथारूपानें तो केव्हां तरी मिळण्याचा संभव आहे. पण तोंपर्यंत वाचकांनीं लोकहितवादीकृत 'टॉड राजस्थान' मधील चंद्राना राणीचा इतिहास वाचावा अशी शिफारस आहे.

नाहीं हेंही पण मी आपणास थोड्याच अवधींत दाखवीन! राणाजी! ऐका, माझी प्रतिज्ञा ऐका! आपण मला आतां आपल्या मातेची उपमा देण्यास कचरलांत, पण एक काळ मी असा घडवून आणीन, कीं ज्यावेळीं तुम्ही—राणाजी तुम्ही—मला माताजी म्हणून माझे पायावर मस्तक ठेवाल! अशी योग्यता मी आपले अंगीं आणीन! राणाजी! आपला मीं अपराध केला आहे. त्याबद्दल मी आपली क्षमा मागत नाहीं. पण हां—माझ्या डोळ्यांत ज्ञानांजन घालून आपण मला सावध केलेत याबद्दल मात्र मी आपले आभार मानतें. आणि माझे आपण गुरु आहांत असें समजतें. अपराधाची क्षमा करण्यास मानवापेक्षां दीनदयाळ प्रभु जास्त समर्थ आहे व म्हणूनच आपली क्षमा मागण्याचें सोंग मी करीत नाहीं. जगाचा चालक—सर्वांना बाहुलीप्रमाणें नाचविणारा तो प्रभु—एक माझा तरी झाला पाहिजे, नाहीं तर हा देह झडेपर्यंत त्याच्या दारांत टाहो फोडीत उभी राहीन. कदाचित् पूर्वसंचितानें या जन्मीं मला सिद्धि मिळणार नाहीं! मी पुन: जन्म घेईन. एक जन्म नाहीं—दोन नाहीं—शंभर नाहीं-हजार नाहीं—लागेल तितके जन्म घ्यावे लागले तरी मी ते घेईन; पण मी आपलीशींच काय, सर्व जगाची माता जो परमेश्वर त्याचें स्वरूप प्राप्त होईपर्यंत झटेन—हाच माझा निश्चय! हीच माझी प्रतिज्ञा!!" असें म्हणून ती विलक्षण स्त्री तेथून जाऊं लागली. दारापर्यंत गेली असेल नसेल तोंच ती पुन: परत वळली. यावेळीं तिची मुद्रा अगदीं शांत होती. ती शांत स्वरांत म्हणाली, "राणाजी! मी आपल्या मातेच्या पदाला पोंचेपर्यंत पुन: आपली भेट होणें शक्य नाहीं. तेव्हां मी आपल्यास एवढेंच सुचवितें, मालदेव आपला हाडवैरी आहे. खूब सावध असा बरें! थोडेंसें दुर्लक्ष केल्यास घात होईल. तुमचें लग्न असें चमत्कारिक तऱ्हेनें कां झालें, याचें कारण तुम्हाला अद्याप समजलेलें दिसत नाहीं. मी आपणास सांगूं इच्छितें. त्यांत आपलें मन दुखवावें असा उद्देश नसून आपल्यास सावध करावें हीच इच्छा आहे. ऐका राणाजी. आपली सध्याची पत्नी—मालदेवाची मुलगी मंगला—ही विधवा होती. तिचें एकवार लग्न होऊन चुकलें होतें ती सात वर्षांची असतांच विधवा झाली. आज त्याच विधवेचें आपल्याशीं कांहीं खोडसाळ हेतु मनांत धरून लग्न

करण्यांत आलें आहे. " असें ह्मणून ती तेथून झपाट्यानें निघून गेली. राणाजीला आतां सर्व गूढ उकललें !!

* * * *

एखाद्या गरगर फिरणाऱ्या चक्रावर एखाद्या मनुष्याला बसवून जर त्या चक्रास गति दिली तर त्या मनुष्यास भोंवळ येण्यास सुरुवात होते व पुढें त्यास त्या चक्रावरून काढून घेण्यांत आलें तरी त्यास स्थिर जमीनही फिरल्यासारखी वाटून आपण पडतों कीं काय अशी भीति वाटते. तो खालीं बसतो व डोक्यांतील भोंवळ निघून जाईपर्यंत डोळे मिटून स्वस्थ पडावें असें त्यास वाटत असतें. डोळ्यांत भोंवळ उत्पन्न झाली आणि पोटांत ढवळूं लागलें कीं, मग त्यास वाटतें आपण त्या चक्रावर व्यर्थ बसलों. पण त्या चक्रावर बसण्यापूर्वी अथवा चक्राला गति मिळाल्यानंतरही थोडा वेळ, त्यास आपल्या स्थितिबद्दल मोठी मौज वाटते. भोंवतालच्या वस्तु आपल्या भोंवतीं किती मजेनें फिरत आहेत, हा विचार त्याचे मनांत येऊन त्यास आनंद होतो न होतो तोंच चक्राला विशेष गति मिळाल्यामुळें यांच्या डोक्यास व उदरांतील अंतर्व्यवस्थेसही गति मिळून त्याचा तो आनंद कवडीमोल ठरूं पाहतो. पित्तप्रकृतिच्या माणसांना ही स्थिति फार दुःसह होते. पण प्रत्येक मनुष्याला अशा स्थितिपासून थोडा फार त्रास होतोच होतो. मुद्दाम संकटांत उडी टाकून धाडशी कृत्यें करूं पाहणाऱ्या वीर पुरुषांची व फिरत्या चक्रावर बसून आनंद लुटूं पाहणाऱ्या मनुष्याची स्थिति जवळ जवळ एकसारखीच असते. एक चक्रावर बसतो, दुसरा संकटपरंपरेवर आरूढ होतो. एकाच्या चक्राला गति मिळते, एकाची संकटपरंपरा गरगर फिरूं लागते. पहिल्याला भोंवळ येऊं लागतें, दुसऱ्याला संकटांवर संकटें येणाऱ्या स्थितिमुळें घोटाळल्यासारखें होतें. एकाला चक्रावरून काढून घेतल्यानंतर फिरत असतें, दुसऱ्याला संकटपरंपरेंतून सुटण्याचा मार्ग सांपडला असूनही कोडें उलगडत नाहीं. आमचा नायक सध्यां अशाच स्थितींत सांपडला होता. चितोरगडावर आल्यापासून कोड्याला सुरुवात झाली ती भुलैयाच्या अखेरच्या भाषणानें त्याचा अगदीं कळस झाला ! भुलैयानें आपल्या भाषणानें त्यास

खप–खप जोरानें स्वतःभोंवतीं फिरविलें व जाते वेळीं कोड्याच्या चक्रांतून त्यास काढून दूर फिरकावून दिलें व ती निघून गेली. पण ती गेल्यानंतरही राणाजीला सर्व वस्तु आपल्या भोंवतीं अतिशय वेगानें फिरत आहेत असें वाटत होतें.

अल्लाउद्दीन खिलजीनें पाद्मिनीच्या इच्छेनें चितोरची रक्षा करून चितोड हस्तगत केल्यावर बाप्पारावळचा अधिकारी वंश दुर्दैवाचे गोते खात रानांत पळून गेला. हा वंश ह्मणजे राणा हमीर याचा चुलता अजयसिंग होय. जोहार होते वेळीं राणा लखमसीनें आपला निर्वंश न व्हावा ह्मणून अजयसिंह व आपला नातू हमीर यांस अरवली पर्वताच्या एका कोपऱ्यांत असलेल्या केळवाडानामक भिल्ल राज्यांत पाठवून दिलें. हमीराचा बाप ऊरसिंग हा चितोडचा खरा वारस. पण तो लढाईत वारल्यामुळें राण्यानें आपल्या धाकट्या मुलास ह्मणजे अजयसिंगास चितोडच्या गादीवर बसविलें व 'तुझ्या मागून तूं हमीर यास गादीवर बसव' अशी त्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें अजयसिंगानें आपल्या पश्चात् हमीरानेंच राज्यावर बसावें असें केलें; पण हें सर्व नाटक केळवाड्यासच झालें. अजयसिंगानें प्रयत्न करूनही चितोर त्याचे हातांत आलें नाहीं. अल्लाउद्दीनानें आपल्या तर्फे मालदेवनामक रजपूतास चितोडचे गादीवर बसविलें. हमीर वयांत येतांच त्यास ही स्थिति रुचली नाहीं. त्यानें चितोर हस्तगत करण्याप्रीत्यर्थ प्राण वेंचावे लागले तरी हरकत नाहीं, पण चितोर पुनः आपल्या वंशाकडे आणण्याची दृढ प्रतिज्ञा केली. तो लहानपणापासूनच अतिशय शूर आणि धाडशी होता. त्याचप्रमाणें तो विचारीही होता. चितोर हस्तगत करण्याची प्रतिज्ञा करितांच त्यानें प्रथम त्याच कार्यास हात घातला नाहीं तर आपल्या समशेरीचें बल अन्यतऱ्हेनें मालदेवाचे कानीं जाऊन त्याच्या पोटांत धास्ती उत्पन्न होईल व तो गुप्तरीतीनें तरी आपलें सख्य करण्यास कबूल होईल, असा त्यानें प्रयत्न चालविला. अजयसिंग केळवाड्यास तेथील भिल्ल राजाचा पाहुणा ह्मणून गेला होता; पण हमीरानें शौर्यानें आणि राजनीतीकुशलतेनें त्यास बाजूला सारून स्वतःच त्या प्रदेशाचा राजा बनला व सर्व भिल्लांस आप-

लेसें केलें. केळवाडा येथें पाणी व चारा मुबलक होता त्यामुळें आपल्या फौजेस वाढविण्यास त्यास कसलीही अडचण पडली नाहीं.

अशा प्रकारें केळवाड्यास जम तर बसला ! मुसलमानांचे प्रस्थ यावेळीं वाढत्या प्रमाणावर होतें व त्यामुळें राजस्थानांतील लहान मोठे सरदार, ठाकुर अगदीं त्रासून गेले होते. कोणी तरी आपल्यांतच बलाढ्य पुरुष निर्माण होऊन त्यानें आपलें नायक व्हावें व त्यानें आपल्या या वाटीस लागलेल्या शत्रूस शासन करावें असें त्यांना वाटूं लागलें होतें. हमीराचें शौर्य, धैर्य पाहून सर्वांचे डोळे त्याचेचकडे लागले. सर्वांनीं त्याच्याशीं सख्य केलें व तो एक अल्पवयी तरुण त्या सर्वांचा नायक झाला ! हे सर्व कांहीं मुकाट्यानें व हळू हळू झालें. मालदेवास याची कुणकुण लागलीच होती. हातीं आलेल्या चितोरच्या राज्याचा खरा अधिकारी अशा प्रकारें फोफावत चाललेला पाहून त्याचीं मुळें आपल्या सिंहासनाखालीं येऊन तीं आपलें सिंहासन डळमळीत करतील, इतकेंच नव्हे तर कदाचित् आपल्यास पालथें पाडतील असें मालदेवास वाटलें; पण ज्याप्रमाणें हमीर मालदेवाशीं उघड.दोन हात खेळण्यास कचरत होता त्याचप्रमाणें मालदेवही पण या तरुण वीराशीं तोंड देण्यास भीत होता आणि ह्मणूनच त्यानें कपटानें हमीरास चिरडण्याचा विचार केला.

हमीराची सर्व तयारी होऊन चुकली होती. त्याला नायक ह्मणणाऱ्या सर्व सरदारांनीं वेळीं आपण मदत करण्यास तयार आहोंत अशीं खरींखुरीं वचनें दिलीं होतीं. त्याप्रमाणें आतां कोठून मालदेवावर झडप घालावी या विचारांत तो होता तोंच मालदेवाचें पत्र ' आपण आपली मुलगी देऊं इच्छितों ' असें येऊन थडकलें. राणाजीला कांहीं तरी निमित्त पाहिजेच होतें. त्यास आयती संधि मिळाली. त्याच्या मित्रांनीं व सल्लागारांनीं मालदेवाच्या या विवाहमसलतींत कांहीं कपट आहे असें सांगितलें. कारण रजपुतांत विवाहासंबंधीं एक विशेष चाल आहे. मुलीच्या पित्यानें मुलगी उपवर झाली ह्मणजे ज्या कोणा तरुण रजपुतास आपली मुलगी अर्पण करावयाची असेल, त्या वीराकडे आपल्या उपाध्याया-बरोबर नारळ पाठवून मुलगी स्वीकारण्याची विनंति करावयाची असते.

तसें मालदेवानें न करितां एक मोघम पत्रच पाठविलें. यांत त्यानें आपला अपमान केला आहे असें हमीराकडील मंडळीस वाटलें. आणि ह्मणूनच त्यांनीं मालदेवाची ही उद्धट विनंति फेंटाळून लावण्याविषयीं आग्रह केला; पण राजनीतिकुशल हमीर ही संधि केवळ पोकळ मानापमानाकडे नजर देऊन घालवून बसणारा नव्हता. त्यानें विचार केला, प्रसंग पडल्यावर मालदेवास पालथा घालण्यास आपण समर्थ आहों. तेव्हां त्यानें आपली खोडी करण्याचा जो प्रयत्न केला आहे, त्याचें प्रायश्चित त्यास आपण मागून खुशाल देत बसूं; पण सध्यां तो आपल्या घरच्यांत आपण होऊन बोलावीत आहे त्याचा फायदा घेतलाच पाहिजे. न जाणों, त्यानें कपटानें बोलाविलें असलें तरी आपल्या दैवानें आपल्यास अनुकूळ वारा लागल्यास त्याचे कपटजालांत त्यासच अडकावून आपण आपलें चितोरचें राज्य हस्तगत करूं. ” असा सर्व बाजूंनीं विचार करून हमीर यानें मालदेवाची मुलगी करण्याचें कबूल केलें व तो निवडक पांचशें लोकांसह चितोरगडावर आला.

राणा हमीर संध्याकाळचे सुमारास गडावर येऊन पोंचले. पण गडावर विवाहासारख्या मंगलप्रसंगाला शोभेल असे कांहीं प्रकार तेथें नव्हते. गुढ्या नाहींत, तोरणें नाहींत, मंडप नाहीं, वधुपक्षाकडील वऱ्हाड नाहीं, मंगलवाद्यें नाहीत, जिकडे तिकडे सामसूम. तें पाहून हमीराचे अनुयायी त्यास ' आपण हें वेड्यासारखें काय करतां आहां ? येथें विवाहाची किंचितही तयारी दिसत नाहीं. तेव्हां मालदेवाचें कपट उघड उघड दिसत आहे. आपले आल्या पावलीं माघारे फिरा आणि मालदेवाशीं लढाई करण्यास कांहीं खुसपट पाहिजे म्हणतां तें हें अपमानाचें कृत्य पुढें करून त्याचें पारिपत्य करा. ' इत्यादि सल्ला देऊं लागले. पण हमीरानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. त्यानें विवाहाची अनुमति दिली. त्याच दिवशीं रात्रींच वधूचा हात वराचे हातीं देण्यांत आला. त्यावेळींही कसला समारंभ नाहीं. मंत्र नाहीं, तंत्र नाहीं, ब्राम्हण नाहींत, सगळा गुप्त प्रकार. जणूं काय, हा विवाह कोणास समजूं नये अशीच मालदेवाची इच्छा दिसली. हमीराकडील मंडळी हमीरास उघड उघड नांवें ठेऊं लागलीं.

हमीरानें येवढेंच उत्तर दिलें- " शिशुपालाचे शंभर अपराध भरले नाहींत. "

* * * * *

भुलैया निघन गेल्यानंतर कितीवेळ तरी राणाजी शून्यदृष्टीनें त्या उघड्या दाराकडे पाहात पलंगावर बसला होता. भुलैयानें त्यास त्याच्या नववधूविषयीं जें कांहीं सांगितलें होतें तें त्यास खोटें वाटत होतें असें नाहीं. उलट त्या भाषणानें गडावर घडलेल्या सर्व कोड्यांचा त्यास थोडा-बहुत उलगडा खास पडला. भुलैयाचें तें भाषण म्हणजे मालदेवाच्या, भुलैयाच्या साशंक वर्तनाची एकप्रकारें किल्लीच होय. असें असूनही घडलेल्या एकंदर प्रकारानें त्यास एक प्रकारची मानसिक भोंवळच आली. आणि त्याचमुळें त्यास सारखें फिरल्यासारखें वाटत होतें. थोडा वेळ तरी तो अगदीं मूढ होऊन स्वस्थ बसला. त्याच्या डोक्यांत विचारांची अगदीं कालवाकालव होऊन गेली. कोणत्या विचाराचा धागा पकडून आपण पूर्व ठिकाणावर यावें-हेंच त्यास समजेना. तो दाराकडे पाहात होता, पण तेथें त्यास कांहीं दिसत नव्हतें. अंतःचक्षुपुढें मात्र मध्येंच मालदेव, मध्येंच भुलैया, मध्येंच हरदेव तर मध्येंच ती पत्र देणारी दासी या व्यक्ति फिरून फिरून दिसत होत्या व अदृश होत होत्या. जणूंकाय कोणी त्यावर नजरबंदीच केली होती. बराच वेळ गेला. राणाजीकडे कोणीही आलें नाहीं. तो त्या महालांत एकटाच बसला होता. कमरेइतकी उंच अशी एक बेलिया घातलेली चांदीची समई तेथें तेवत होती. जसजसा वेळ जात चालला, तसतसा तो एकान्त त्यास दुःसह होऊं लागला. भुलैयानें आपल्या भाषणानें आणलेली गुंगी हळू हळू त्याच्या मनावरून जात चालली. त्यानें एक लांब सुस्कारा टाकला व तो उठला. त्यानें आपला चेहरा दोन्ही हातांनीं पुसला व दिव्याकडे पाहिलें. दिव्यावर कोळी आला होता. एक विश्वास सोडल्यानें व चेहऱ्यावरून हात फिरविल्यानें त्यास किंचित् बरें वाटलें. दिव्यावरील कोळी झाडून त्यासही त्यानें उज्वलित केलें. तो महालांत फिरून आपले विचाराचें विस्कळित झालेले धागे जुळवूं लागला ! किती-किती प्रयासानें

त्यास तें सर्व एक करतां आलें. पण हें घडल्यावर मात्र त्यास एक मोठें दडपण दूर झाल्यासारखें वाटलें. तो आपलें सर्वांग झाडल्यासारखें करून म्हणाला, "एकूण मालदेवाची कन्या विधवा आणि त्या विधवेचें आज मीं पाणी ग्रहण केलें अं ? माझ्या सल्लागार मंडळीस हें कळलें तर ! ओह ! मालदेव, तुझा अपराध इतका भयंकर असेल असें वाटलें नव्हतें ! एखादें खोडकर पोर ज्याप्रमाणें सिंह गरीब आहे, निजला आहे, माण-साळलेला आहे असें समजून त्याचे आयाळास हात घालून त्यास ओढूं पाहतो तद्वतच ही तुझी चेष्टा सुरू आहे असें मला वाटत होतें; पण अरे दुष्टा, माझ्या पुढं तूं एक क्षुल्लक असूनही मीं जसजसें तुझें वर्तन सहन केलें तसतसें तूं न कळत माझ्या गळ्यांत फांस टाकलास अं ? आणि तो आंवळण्याचें काम कोणाकडे, तर त्या तुझ्या रखेलीकडे ? " पण हा अखेरचा शब्द उच्चारतांच त्यास कसेंसें वाटलें भुलैयाचें तें भाषण, त्यावे-ळची तिची ती विलक्षण मुद्रा, त्यावेळीं तिनें केलेले ते आविर्भाव हे सर्व त्याच्या नेत्रांपुढें उभे राहिले. आणि त्या सर्व गोष्टी त्यास असें बजाऊं लागल्या कीं, भुलैयाची योग्यता फार मोठी आहे. भुलैया जातीची नीच नव्हे ! राणाजी पुढं म्हणाला, " होय, भुलैयेनें जें कांहीं सांगितलें तें सर्व खरेंच असलें पाहिजे. तिला आपल्या वर्तनाचा खास पश्चात्ताप झाला यांत शंका नाहीं. " तो दाराकडे वळून म्हणाला, " जा भुलैया, तुझ्या अनुतापाच्या विचारांना कृतीचें स्वरूप मिळो आणि तूं प्रतिज्ञा केल्या-प्रमाणें परमेश्वरस्वरूपी हो ! भुलैया ! मघाशीं माझें मन तुला आपल्या मातेच्या जवळ नेऊन बसविण्यास कचरलं. पण हां. आतां वाटतें कीं, तूं त्या उपमेला योग्य आहेस. जा, परमेश्वर करो आणि माझी ही सुखमय कल्पना खोटी न ठरो ! " हे शब्द त्याचे मुखावाटें निघतांच त्याचें मन फार-फार प्रसन्न झालें. भविष्यकाळांतील भुलैयाच्या उज्वल स्वरूपाची तर त्यास प्रतिकृति अंतःचक्षुपुढें दिसली नाहीं ! कोणी सांगावें ?

राणाजी पुनः इकडे तिकडे फिरूं लागला. तो विचार करूं लागला, "आतां या विवाहाला मी आपला विवाह आणि त्या विधवा नववधूला मी आपली पत्नी म्हणूं शकतों काय? म्हटल्यास माझ्याबरोबर त्या शब्दांचीही विटंबना

होणार नाहीं काय? नको—झाली एवढी माझीच विटंबना बस्स झाली. " असें ह्मणून तो थांबला. पुनः त्यास कांहीं कल्पना सुचली तो ह्मणाला, " नाहीं पण—सगळ्यांची परीक्षा घेतली, त्याप्रमाणें एकवार माझ्या पत्नीचीही परीक्षा मला घेतली पाहिजे. न जाणों माझा प्राण घेण्याकरितां मालदेवानें आपल्या कन्येचा हिरकणीप्रमाणें उपयोग केला असला तरी कदाचित् ती आपल्या सद्वर्तनानें मला भूषणभूत होईल. कोणीं सांगावें? तेव्हां आजचा भेटीचा प्रसंग घडल्यास तो नाकारूं नये हेंच बरें." पुनः तो थांबला. नंतर तो दाराकडे वळून आश्चर्यानें ह्मणाला, " पण मला बोवा आश्चर्य वाटतें. अद्यापपर्यंत इकडे कोणींच कसें आलें नाहीं ? कां सर्व मंडळी भुलैया आपल्या कार्यांत विजयी होत आहे कीं कसें याची वाट पाहात असली पाहिजेत. ह्यः वेडचानों !—" इतक्यांत दारांत बनवीर दिसला. त्यानें आश्चर्यानें विचारिलें, " काय, अद्याप तुह्मी इथेंच ? राणाजी मनांतल्या मनांत हंसून ह्मणाला, " गड्या, भुलैयानें तुह्मां सर्वांना फसविलें. " नंतर तो उघड ह्मणाला, तर मग मीं कोठें जावयाचें? जामाताला देवतुल्य मानावें असा शास्त्रार्थ आहे. अर्थात् देवांना ज्याप्रमाणें पाहिजेल तसें वागवावें. ते जसे पूजला भाळून आपल्या भक्तास पाहिजे तें करूं देतात त्याचप्रमाणें श्वशुरगृहीं आमची स्थिति. तुह्मी कराल तशी पूजा मान्य करावयाची. ठेवाल तेथें बसून राहावयाचें आणि आणाल तो नैवेद्य ग्रहण करावयाचा—" राणाजी हें सर्व हंसत हंसत ह्मणाला; पण त्या हंसण्याचे आड क्रोध व तिरस्कार लपून बसले होते. बनवीराला तें समजलें कीं नाहीं कोण जाणें ? तो तिकडे दुर्लक्ष्य करून ह्मणाला, " झोंपेची वेळ झाली असल्यास शेजगृह तयार आहे " असें ह्मणून बनवीर पुढें झाला.

"अगदीं गाढ निद्रा लागावी अशी व्यवस्था केली आहेना?" राणाजी त्याचे मागून जात ह्मणाला. यावर मात्र बनवीर दचकला. तो वळून तीक्ष्ण दृष्टीनें राणाजीकडे पाहात ह्मणाला, " ह्मणजे याचा मतलब? " राणाजी ह्मणाला, " कांहीं नाहीं, आपली सहज थट्टा हो—"

दोघेही मुलैंयाच्या महालांतून बाहेर पडले. राणाजी बारीक नजरेनें सारखा इकडे तिकडे पाहात होता. आपली रक्षणकर्ती आपल्यास हरप्रयत्न करून तलवार आणून देईल अशी त्यास पूर्ण खात्री होती. पण बागेच्या फाटकापर्यंत त्यास कोणींही आढळलें नाहीं. पण फाटकाबाहेर पडतांच रस्त्यावर हरदेव उभा असलेला दिसला. त्यास आनंद झाला. बनवीर पुढें होऊन त्यानें त्या दोघांस एकांत दिला. राणाजीनें विचारिलें, " तलवार ? "

" महालांत पोंचविली. "

" महालांत पोंचविली ? आतां मला ती कसची मिळते ? "

" म्हणजे याचा मतलब ? " हरदेवानें साशंक होऊन विचारिलें.

" राणाजी हलकेंच किंचित् हंसून म्हणला, " याचा मतलब एवढाच कीं केळवाड्याचें पाणी मालदेवाला व त्याच्या साथीदारांना दाखविण्याचा प्रसंग लौकरच येणार आहे. माझ्या महालाच्या आसपास असा. एक शिटी ऐकूं आली कीं, तुमच्या तलवारी नागव्या करा. बस्स, यापेक्षां जास्त कांहीं नाहीं. "

हरदेवाला असेंच कांहीं पाहिजे होतें. त्याचा चेहरा खुलला. तो तेथून निघून गेला. राणाजी बनवीराजवळ आला व दोघेही पुनः चालूं लागले.

मध्यंतरी कोणीं कांहीं बोललें नाहीं. दोघेही राणाजीकरितां मुद्दाम तयार केलेल्या शेजगृहाजवळ येऊन पोंचले. राणाजी आंत शिरला. मन मुग्ध होईल अशा प्रकारची सर्व शृंगारीक सामुग्री तेथें तयार होती. बनवीर हंसून त्याचे चेहऱ्याकडे पहात म्हणाला, " पहा कांहीं कमी नाहीं ना ? "

" राणाजीही हंसला. तो म्हणाला'–' एक कमी दिसते. माझ्या नोकरानें माझी समशेर इकडे पोंचविल्याचें सांगितलें आहे. ती कोठें दिसत नाहीं. "

" हंः ! निदान आजची रात्र तरी आपली सवत आपल्या पतिजवळ असावी, हें आमच्या ताईला आवडणार नाहीं. "

" रजपूत नववधुला आपल्या पतीची तलवार सवत वाटावी कां ? आश्चर्यच म्हणावयाचें. मी तर आजपर्यंत असें समजत होतों कीं, ज्या रजपूताला समशेर जास्त आवडते, त्यावर त्याची पत्नी जास्त प्रेम करिते."

ह्यावर बनवीर कांहीं बोलला नाहीं. तो मुकाट्यानें तेथून गेला. तो गेला अशी खात्री होतांच राणाजीनें महाल तपासण्यास सुरवात केली. महालांत येण्याजाण्याला दारें किती आहेत ? तक्त पोशी पोकळ आहे कीं काय ? पलंगामध्यें कांहीं यांत्रिक रचना आहे कीं काय ? दारें मजबूत आहेत कीं कसें ? हें सर्व त्यानें नीट लक्षपूर्वक पाहिलें. महालांत प्रवेश करण्यास फक्त एकच किवाड होतें. दारें चंदनी लांकडाचीं व नाजुक होतीं आणि तीं बाहेरून लावून घेण्याचीं होतीं. त्यांच्यावर टिचक्या मारीत राणाजी म्हणाला, " गरीब बिचाऱ्या दारानों ! माझ्या लाथा खाण्याचा प्रसंग तुम्हाला येणार काय ? हर ! हर !! नववधूची प्रथम भेट म्हणजे आयुष्यांतील केवढा एक महत्वाचा व अत्यानंदाचा प्रसंग ! दारानों, माझी ही चाललेली विटंबना पाहून तुम्हाला माझी कींव येत असेल नाहीं ? प्रथम भेटीकरितां म्हणून शेजगृहांत शिरणाऱ्या तरुणाचे कसे विचार आणि माझी ही साशंक स्थिति कशी ? हंसावें कीं रडावें हेंच समजत नाहीं. बरें असो, आतां फक्त राणीसाहेबांची परीक्षा आटपली कीं, आपला हा मेंढराचा अवतार टाकून देऊन—" तोंच त्यास कोणाची तरी चाहूल लागली म्हणून तो महालांत आला. तो पलंगाजवळ गेला आणि पुटपुटला, " बस्स, असेंच करावें. झोपेचें सोंग घेऊन पडावें. राणीसाहेब आल्यावर काय करतात तें पाहिलें पाहिजे. हा मंगले ! तूं कदाचित् रत्न असशील; पण आज तुझ्या घातकी पित्यामुळें तुझ्या विषयींही माझें मन साशंक झालें आहे ! तूं विधवा असशील पण खरी रजपुताणी असशील तर मी तुझें आनंदानें ग्रहण करीन. ईश्वर करो आणि तूं एक अमूल्य रत्न आहेस, बाप्पारावळचा वंश वाढविण्यास योग्य आहेस असें ठरो ! असें झाल्यास माझ्या समशेरीप्रमाणें तूंही आवडती होशील !" असें म्हणून तो पलंगावर निजणार तोंच त्यास पुनः कांहीं

शंका आली. " पलंगावरील बिछाना विषारी तर नसेल ? " त्यानें बिछान्याचा वास घेतला. अत्तराचा वास येत होता. त्यानें सर्व बिछाना तपासला. तो हंसला व ह्मणाला, " हमीर ! तूं दुर्दैवी खराच ! आज तुझें मन किती साशंक !! खऱ्या रजपुताला हें कधीं तरी शोभेल काय ? भित्र्या माणसाचें मन साशंक असतें, असें माझी माता मला नेहमीं सांगत असे. मी खरोखरच भित्रा झालों काय ? जोंधळ्याच्या ताटानें बलाढ्य रानडुकराला चीं चीं करावयाला लावणाऱ्या एका शूर स्त्रीच्या पोटीं असा भित्रा पुत्र मी निपजलों अं ? अरे—तसें नव्हे. अधमाशीं अधमच झालें पाहिजे. " असें ह्मणत तो पलंगावर पडला व त्यानें तोंडावरून शेला घेऊन झोंपेचें सोंग घेतलें. थोडावेळ झाला नाहीं तोंच अवगुंठनयुक्त अलंकारभूषिता मंगला हातांत एक पुष्पमाला घेऊन महालांत आली. राणाजी शेल्याआडून तिची हालचाल पाहूं लागला. आपली पत्नी सुशीला आहे कीं दुःशीला हें कळण्याविषयीं राणाजी यावेळीं किती उत्सुक होता ! मनुष्याच्या आयुष्यांत ही एक मोठी नाजूक स्थिति आहे. आपल्या प्रियमनुष्याच्या अत्यवस्थस्थितींत आपल्या मनाची होणारी स्थिति अथवा युद्धाचे वेळीं जयापजयाविषयीं चिंतातुर असलेल्या सेनापतीची मनःस्थिति ह्या दोनी गोष्टी स्वतःच्या पत्नीच्या वर्तनाविषयीं साशंक झालेल्या मनःस्थितीपेक्षां फार बऱ्या.

मंगला आंत आली व तिनें हळूंच द्वार लावून घेतलें. नंतर ती पलंगाजवळ आली. बराच वेळ ती झोंपेचें मिष करून पडलेल्या राण्याकडे पाहात उभी राहिली. काय चमत्कार आहे ! मंगलेच्या तोंडावरही यावेळीं बुरखा कां असावा ! पण ती तरी काय करणार ! रजपुतांत अशी चाल आहे कीं, प्रथम भेटीचे दिवशीं वधूनें तोंड झांकूनच यावयाचें व नंतर पतीनें कांहीं सुवर्ण देऊन आपल्या पत्नीला मुखदर्शन देण्याविषयीं प्रेमयाचना करावयाची ! आणि त्याच पद्धतीला अनुसरून मंगला आली होती; पण राणातर निजलेला ! मंगलेचा श्वास जोराजोरानें प्रथमपासूनच चालला होता. राणा निजलेला पाहून तिनें एक दीर्घनिश्वास सोडला ! या निश्वासाचा काय बरें अर्थ ? निराशा कीं दुःख ? **मंगलेनें खाकरून आपलें अस्तित्व जाहीर केलें** ! बिचारी

मंगला! झोंपी गेलेलें मनुष्य जागें होईल, पण झोंपेचें सोंग घेतलेलें कसें जागें होणार? पुनः ती स्तब्ध उभी राहिली! नववधु अगदीं प्रथमदिवशींच आपल्या पतीला स्पर्श करण्यास कशी धजेल? राण्याला तिची ती स्थिति पाहून कींव आली. तो आपलें सोंग टाकून देण्याचे विचारांत होता, तोंच दारावर कोणी तरी कांहीं खुणेच्या टिचक्या वाजवीत असावें असा भास झाला. त्यानें कान देऊन ऐकलें तों खरेंच! अर्थातच त्यास आपला पहिला विचार रद्द करावा लागला. मंगलेला त्या टिचक्या ऐकूं येतांच ती दचकली! तिनें कान दिला! ती उत्सुकतेनें दाराजवळ गेली व तिनें दार उघडलें. राणाजीला सर्व दिसत होतें. अर्धवट उघडलेल्या दारांतून एक नागवी तलवार धरलेला हात आंत आलेला दिसला! तें पाहतांच राणाजी दचकला! इतका वेळ दबलेला त्याचा क्रोध एकदम उत्तेजित झाला! तो दांत रगडीत ह्मणाला, "अग चांडाळणी! आज तूं आपल्या पतीचा वध करणार अं? अग पण तूं मला पति कुठून समजत असशील! हा! हा!! आपल्या पतिकरितां प्राणत्याग करणाऱ्या साध्वी रजपुत रमणींनों! यावेळीं तुह्मी आपले डोळे गच्च झांकून घ्या! रजपुत कुमारिकांनों! या वेळीं तुह्मांस आपल्या मातेच्या उबदार कुशींत गाढ निद्रा लागलेली असू द्या! याच याच चितोरावर जोहार करून स्वर्गांत गेलेल्या अबलांनों! कोणत्याही कारणामुळें तुमचे निष्कलंक आत्मे या महालांत आले असतील तर पुढील भयंकर प्रकार पाहण्याकरितां तुह्मी येथें थांबूं नका! हा प्रकार तुमच्या दृष्टीस पडला तर स्वर्गांतही तुह्मास सुख लागणार नाहीं." असें कांहीं मनांतल्या मनांत ह्मणून तो पुनः मंगलेच्या हालचालीकडे पाहूं लागला. मंगला व तलवार देणारी व्यक्ति कांहीं कुजबुजत होत्या. राण्याला तें स्पष्ट ऐकूं आलें नाहीं, पण मंगला दार लावून घेत असतां 'तुकडे' हा शब्द मात्र त्यानें स्पष्ट ऐकिला! "एक घाव कीं दोन तुकडे' असेंच ना! हो असेंच." मंगला पलंगाजवळ आली. ती पुनः राण्याकडे पाहूं लागली. तिचें शरीर कांपत होतें. तिनें तलवारीचा हात किंचित् वर उचलल्याचा राणाजीस भास झाला! एखाद्या चवताळलेल्या वाघाप्रमाणें

राणा उठला. त्यानें पलंगाखालीं उडी टाकली व तो दांत रगडीत ह्मणाला, " चांडाळणी ! आज तूं आपल्या पतीचा खून करणार ?

* * * * * *

ते भयंकर शब्द ऐकतांच मंगला निष्प्रभ होऊन मागें सरली ! राणा ओरडून ह्मणाला, " जा ! तूं किती झालीस तरी एक नीच स्त्री ! आतां तरवार देणारा तुझा बापच असला पाहिजे तेव्हां त्याचा अगोदर सूड घेऊन नंतर तुझ्याकडे पाहीन " असें ह्मणून तो दाराजवळ गेला. पहातो तों बाहेरून कोणीं तरी दार अगदीं घट्ट आवळून दाबलें होतें. राणाजी आवेश करून ह्मणाला, " असें काय ? " तो ओरडून ह्मणाला, " दाराबाहेर कोण आहे त्यानें मुकाट्यानें दार उघडावें. " असें ह्मणून त्यानें किंचित् वाट पाहिली. बाहेरून कोणीं से झटलें. " मंगल आटप ! "

" अरे विश्वासघातक्या — " राणाजी किंचित् मागें सरून दरवाज्यावर लाथ मारून ओरडला, " केळवाड्याच्या सिंहाशीं चेष्टा करणें ह्मणजे प्रत्यक्ष यमाच्या दाढेंत जाऊन लीला करण्यासारखें आहे समजलास ? " असें ह्मणून त्यानें आणखी दोन लाथा जोरानें मारतांच कडाडदिशीं दारें मोडून पडलीं ! दाराबाहेर मालदेव आणि रणभीर सशस्त्र असे उभे होते. राण्यानें मालदेवावर झडप घालून त्यास आपल्या डाव्या हातानें कांखेंत आवळून धरलें ! त्यानें त्यास तलवार उगारण्यास वेळच दिला नाहीं. तें पाहतांच रणवीर त्याचा मेहुणा त्याचेवर तुटून पडला! पण राण्याला हा प्रसंग पहिलाच नव्हता ! त्यानें मालदेवासकट चपळाई करून रणभीराच्या पाठीकडे उडी मारिली व तो तोंड वळविणार तोंच त्याचें मानगूट उजव्या हातानें पकडलें. डाव्या हातानें मालदेवाचें नरडें आवळीत आणि उजव्या हातानें रणभीराचें मानगूट चेपीत तो दांत रगडीत ओरडला, " कुत्र्यानों ! टाका–टाका तलवारी हातांतून." असें ह्मणून त्यानें एकदां मालदेवास आणि एकदां रणभीरास असे हिसडे दिले. त्या आवळण्यानें आणि त्यानंतरच्या हिसड्यानें त्या दोघांही पितापुत्रांचे डोळे पांढरे होण्याची वेळ आली. पण तेवढ्यानें ते ऐकणार नव्हते. ते तलवारी सोडीत नाहींत हें पाहतांच राणाजीनें आपले हस्तरूपी फास जास्त

आवळले. त्याबरोबर ' बँ ' असा स्वर काढून रणभीरानें तलवार टाकली. राणाजी त्या तलवारीवर पाय देत व रणभीरास दूर भिरकावून देत मालदेवास ह्मणाला, " हं, मामासाहेब–सोडा आतां ती तलवार." असें ह्मणून त्यानें मालदेवाचे हातून ती तलवार हिसकावून घेतली व नंतर त्यासही त्यानें एक गुद्दा लगावून दूर ढकललें ! एक सोडून दोन तलवारी राणाजीच्या हातीं आल्या ! त्या तलवारी घेऊन राणाजी तिरस्कारानें त्यांचे अंगावर खेंकासून ह्मणाला, " जा ! माकडानों ! आतां आरडा–ओरडा करून पाहिजे तितकीं माणसें बोलावून माझ्यावर चाल करा ! " असें ह्मणून त्यानें तलवार खाकेंत मारीत तोंडांत बोटें घालून शिटी फुंकिली ! शिटीचा आवाज विलयमान होतो तोंच ' एकलिंगजी की जय ! ' ही गर्जना ऐकूं आली ! ब्रह्मचर्याचें तेज किती विलक्षण आहे ! मालदेव-रणभीरासारखे आणखी दहा-पांच जण आले असते तरी वीररत्न हमीर डगमगला नसता !

इकडे मंगला हा प्रकार पाहून अगदीं तटस्थ झाली ! मालदेव व रणभीर हे अगदीं गर्भगळीत होऊन गेले. किती वेळ तरी भ्यालेल्या दृष्टीनें ते दोघे हमीराकडे पाहात होते. हमीर मालदेवास बजावूं लागला, " मालदेव ! बोल, विश्वासघाताचें देहान्त प्रायश्चित भोगण्याची इच्छा आहे कीं, चितुरगड मुकाट्यानें स्वाधीन करतोस ? तूं असा भिऊं नकोस. विश्वासघातानें, शत्रु निःशस्त्र असतां त्यावरु तलवारी चालविणारा मी नव्हे. लढाईची इच्छा असल्यास तसें सांग. मी लढाईस तयार आहें." इतक्यांत कांहीं शिपायांसह बनवीर तेथें आला !

" ही काय गडबड आहे ? " त्यानें आश्चर्यानें विचारिलें.

" आपला शत्रु जागृत झाला ! " मालदेव ओरडला. " आतां त्यास वठणीस आणणें कठीण ! "

" हें कधींच शक्य नाहीं ? " बनवीरानें आपली तलवार नागवी करीत ह्मटलें, " केळवाड्याचा सिंह चितोरगडच्या सिंहापुढें जर्जर झालाच पाहिजे." असें ह्मणून त्यानें राणाजीवर चाल केली. त्याबरोबर रणभीर व मालदेव यांसही उत्तेजन आलें व त्यांनीं शिपायांचे हातांतून

तलवारी घेतल्या. त्यांच्याही तलवारी म्यानांतून बाहेर पडल्या व त्या महालाला रणभूमीचें स्वरूप प्राप्त होणार असें स्पष्ट दिसूं लागलें! त्याबरोबर मंगला पुढें धांवली व न डगमगतां ती हमीर आणि आपले पिता-बंधु मध्यें जाऊन उभी राहिली. तिघांनींही चवताळून ह्मटलें, " मंगले, बाजला हो—"

" नाहीं बाबा–हें युद्ध अधर्मी होय ! आपलें त्यांचें नातें काय !" तोंच राणाजीनें तिला बाजूला ढकललें व त्यानें मालदेवावर वार केला ! त्याबरोबर रणभीर व बनवीर चिडल्यासारखे झाले. त्यांनीं शिपायांसही आपल्या मदतीला बोलाविलें ! एकीकडे आठजण आणि एकीकडे एकटा राणा हमीर ! राणा हमीर दोन्ही हातांनीं पट्टा करून प्रतिपक्षाकडून येणारे वार चुकवीत होता व त्यांचेवर वार करण्याची संधि पाहात होता. इतक्यांत रणभीरानें लुच्चेगिरीनें खोटेंच ह्मटलें, " अरे, हरदेव राण्याच्या मदतीला आला ! हाणा, पाहतां काय ? तेव्हड्यांत राणाजीचें चित्त विचलित झालें व बनवीराची तलवार राण्याच्या कणखर दंडावर येऊन आदळली ! " जय एकलिंगजी को ! " राण्यानें गर्जना केली. आणि त्यानें जास्त जोरानें तलवार फिरवीत त्या आठजणांच्या कोटांतून तो बाहेर पडला! तो मैदानांत जाऊं इच्छित होता. इतक्यांत कांहीं लोकांसह हरदेव तेथें आला ! त्याबरोबर ही आठ मंडळी भिऊन मागेंच दबली ! हरदेव तलवार हलवीत ह्मणाला, " महाराज ! मोठी भयंकर स्थिति आहे. मुख्य दरवाज्यावर आमचेच लोक आहेत. दरवाजा बंद झाल्यास आपल्यास मदत मिळाण्यास जड जाईल."

राणाजी तलवार फिरवीत ह्मणाला, "मग चला, बाहेर पडा तर—" असें ह्मणून राणाजी आपल्या मंडळीसह तेथून निघून गेला.

वर वर्णन केलेला प्रकार घडण्यास अवघी अर्धी घटका लागली असेल नसेल.

राणाजी आपल्या लोकांसह दरवाज्यावर येऊन पोंचला ! किल्ल्यावरील लोक दरवाजा लावण्याचा प्रयत्न करीत होते आणि राणाजींची सेना त्यांना प्रतिकार करीत होती. राणाजीला पाहतांच तिनें त्याचे नांवचा गजर

केला. राणाजीनें हरदेवास ह्मटलें, "हरदेव, एका दाराला मी पाठ देतों आणि एकाला तूं दे. दरवाजा कसा बंद होतो तो पाहूं." असें ह्मणून तो पुढें घुसला. दरवाजाच्या अवाढव्य दारांना खालपासून वरपर्यंत अणकुचीदार असे मोठमोठे खिळे लावले होते. राणाजीनें किंचित विचार केला व तो हरदेवास ह्मणाला, "हरदेव, दयामाया न पाहतां हें असें करावयाचें." असें ह्मणून त्यानें किल्ल्यावरील एक शिपाई दाराचे खिळयाकडे तोंड करून बसविला व त्याचे पाठीला पाठ देऊन त्याचें अर्धवट लागलेलें तें दार मागें रेटलें. खिळयावर चेंचला जाणारा शिपाई दुःखानें ओरडूं लागला. राणाजीनें तिकडे लक्ष न देतां आपली तलवार सुरू ठेविली व तो आपल्या लोकांस उद्देशून ह्मणाला. "गड्यानों, आतां पटापट बाहेर पडा. झालेल्या अपमानाचा बदला घेण्याकरितां पुनः आपणांस लौकरच यावयाचें आहे."

इकडे दुसऱ्या दाराशीं हरदेवानेंही आपल्या मालकाचें अनुकरण केलें होतें. दरवाजा सताड उघडा झाला. इतक्यांत मालदेव आपल्या दोन्ही पुत्रांसह तेथें येऊन पोंचला! राणाजी व हरदेव यांचें शौर्य पाहून सर्व चकित झाले!

राणाजीनें आपलेबरोबर पांचशें निवडक लोक आणिले होते. त्यांपैकीं सुमारें पंचवीस लोक झटापटींत पडले व दहा, पंधरा घायाळ झाले होते. घायाळ झालेल्यांना उचलून नेण्यांत आलें. बाकीच्यांना नाइलाजानें तेथेंच टाकून सर्व बाहेर पडले. आपले सर्व लोक बाहेर पडलेले पाहतांच राणाजी व हरदेव हेही सपाट्यानें निघून गेले. मालदेव पाठलाग करूं शकतच नव्हता. अशा प्रकारें राणाजीची सुटका झाली.



*   *   *   *   *   *   *

पुष्कळ कार्यकर्ती मनुष्यें-मग तीं कोणत्याही वयाचीं, कोणत्याही स्थितिचीं व कोणत्याही जातीचीं असोत सदसद्विवेकबुद्धीच्या दौर्बल्यामुळें आपल्या अंगीं असलेल्या बौद्धिक किंवा शारीरिक बलाचा दुरुपयोग करितात. आणि आपल्यास जगाकडून दुष्ट, नीच, निष्ठूर अशीं विशेषणें लावून घेतात. अंगांत उसळत असलेल्या ईश्वरी तेजाचा कसा उपयोग करावा हें त्यांना वेळेवर न समजलें, अथवा त्यांस त्या वेळीं कोणी सन्मार्ग न दाखविला तर त्याचें तें तेज जगांतील सुंदर सुंदर वस्तुंवरून दगडी रुळा. प्रमाणें फिरत जाऊन त्याचा नाश करणारच. 'सु'पेक्षां 'कु'कडे मानवी मनाची धांव अगोदर असते असें ह्मणतात. एकपरी ही उक्ती खरी असेल, पण हें तेज बाहेर पडूं लागणार त्या वेळीं इतरांनीं, अर्थात् त्यांच्या हित-चिंतकांनीं, काळजी घेतल्यास त्या तेजास 'कु'ची बाधा होणें शक्य नाहीं. त्या तेजस्वी माणसाचें सुदैव जागृत असलें तर ही गोष्ट सहज घडते-दुर्दैव पहारा देत असेल तर तें दुष्कृत्यांचें बीज पेरण्यास मदत करतें. आपल्या तेजस्वितेचा दुरुपयोग करणाऱ्या मनुष्यामध्येंही दोन वर्ग करतां येतील. एक श्रेष्ठ आणि दुसरा कनिष्ठ! आपल्या दुष्कृत्यांचा प्रवाह अतिशय जोरानें चालत असतांही एखाद्या उपदेशकाच्या अमृतवाणीनें शुद्धीवर येऊन आपल्या आयुष्यास एकदम निराळें वळण देणारीं मनुष्यें श्रेष्ठ वर्गांत जातील. आणि सुदैवानें अशा प्रकारचा उपदेश मिळूनही आपला दुष्ट मार्ग न सोडणारीं कनिष्ठ वर्गांत जातील. पण हें होणेंसुद्धां पश्चा-त्तापाच्या तीव्रतेवर अवलंबून आहे. दुष्कृत्य करतांना अपयश आलें किंवा दुसऱ्या एखाद्या दुष्टाचा नाश होतांना पाहिला, किंवा एखाद्या अधिकारी मनुष्यानें उपदेश दिला तर निर्ढावलेल्या दुष्ट मनालाही पश्चा-त्ताप होत असतो. पण कालांतरानें या पश्चात्तापाची आंच कमी कमी होत जाते व पुनः 'म्येरे माझ्या मागल्या." भुलैयाची स्थिति कशी काय होती तीं आपण पाहूं.

राणाजीस मालदेवाविषयीं सावध राहण्यास बजावून ती तेथून बाहेर पडली. दाराबाहेर पडतांच आपण आतां कोठें जावें बरें ? असाच

तिला विचार पडलेला दिसला. तिला एकदम एक विचार सुचला व तडक ती आपल्या देवघराकडे वळली. भुलैया इतर स्त्रियांप्रमाणेंच देवधर्म करणारी होती. आपल्या सुधामयी बांसरीनें जगास तन्मय करणारा ' बंशीधर ' तिचें पूज्य दैवत. हिरवी संगमरवराची एक सुरेख मूर्ति एका लहानशा खोलींत बसवून त्यास जाळीदार दार लावून तेंच देवघर करण्यांत आलें होतें. भुलैया तेथेंच आली. तिनें आंतून दार ढकलून लाविलें आणि ती आपल्या मूर्तीपुढें जाऊन बसली. काय असेल तें असो, त्या मूर्तीकडे पाहतांच भुलैयाला एकदम रडूं कोसळलें ! ती घळघळा अश्रु ढाळूं लागली. या अश्रूंचा अर्थ काय बरें ? मालदेवाच्या सहवासानें शुद्ध आणि सात्विक प्रेमाचें बनलेलें बर्फ राणाजीच्या भाषणानें पाणी पाणी होऊन उचंबळलें तर नव्हतें ?

भुलैयाच्या ' बंशीधरा 'ची मूर्ति वीतभर उंचीची होती. मूर्ति घडविणारानें आपलें सर्व कसब त्यांत दर्शविलें होतें. घोटीव काम केल्यामुळें तिचें सर्वांग कोठूनही व कसलाही प्रकाश आला तरी तुळतुळें लागे. भुलैयानें त्यास बाळलेणींही केलें होतें. पायांत सोन्याच्या साखळ्या, वाळे, कमरेस घागऱ्याचा करगोटा, हातांत कडी-तोडे, बाजूबंद, गळ्यांत गोफ, हातांतील बांसरी रत्नजडीत ! वर मयूरपिसांचा रत्नें जडविलेला असा सुवर्ण मुकुट होता ! मूर्तीची मुद्रा हांसरी दिसत होती. दोन भुवयांमध्यें एक तेजस्वी हिरा बसविण्यांत आला होता. पिंवळा पीतांबर आणि एक शेला हीं वस्त्रेंही होतीं. एकंदरींत मूर्ति मोठी सुंदर होती. प्रेमळ भक्तांचें मन तल्लीन करण्यास मूर्तिकारांचें तें दगडी कसब खरोखरीच समर्थ होतें. आतांपर्यंत तरी भुलैयानें केवळ हौसेनें आपल्या बंशीधराचें कोड कौतुक केलें होतें. खऱ्या भक्तीचा, ईश्वरविषयक खऱ्या प्रेमाचा त्यांत गंधही नव्हता. असो.

बराच वेळ भुलैयानें अश्रु ढाळले व नंतर तिला थोडें बरें वाटलें. जणूं काय पश्चात्तापाच्या अश्रूंनीं तिनें आपला मानसिक कलंक धुवून काढला. अशा प्रकारें शुद्ध झाल्यावर तिनें बंशीधराच्या मूर्तिकडे पाहिलें. ती म्हणाली, " राणाजी ! मी दुर्गुणी नसतें तर मी तुम्हाला आपल्या

आईप्रमाणेंच आवडलें असतें नाहीं? होय राणाजी, असें सहज झालें असतें; पण मी पापी–माझ्या पोटीं तुमच्यासारखें रत्न कुठलं निर्माण व्हायला? संसारसुखाची थोडीशी झुळूक अंगाला लागून जाते न जाते तोंच दुर्दैवानं येऊन माझं कपाळ फोडलंन्! माझ्या मैत्रिणींपैकीं किती जणांनीं तरी सती जायला सांगितलं; पण मला कुठं तितकं धैर्य होतं? ह्या चांडाळाला देह विकून नरकांत जायचं होतं ना? तारुण्याच्या मस्तीपुढं मला घरदार दिसलं नाहीं. देवाधर्माची आठवण झाली नाहीं. पतिप्रेमाची आठवण झाली नाहीं.–अरेरे, पतीच्या प्रेतावर पडून, छाती पिटून रडणारी मी थोड्याशा काळांत या चांडाळाच्या प्रेमपाशांत येऊन पडलें त्या वेळीं त्या स्वर्गस्थ आत्म्याला काय बरें वाटत असेल! नको– आतां ती आठवणही व्हायला नको! हाय! हाय!! बंशीधरजी! या पापिणीचा उद्धार तुमच्या हातून होईल कां? हा! वेडी भुलैया! केवळ असं क्षणभर रडल्यानें किंवा एक क्षणभर देवाच्या नांवानें टाहो फोडल्यानं कां कुठं तुझा उद्धार होईल? तपंच्या तपं तुला आपला देह झिजविला पाहिजे! याकरितां आतां या गडावर राहणं योग्य नव्हे. चला तर बंशधरजी, चल, आपण दूर कुठं तरी, जिथं मनुष्याचें वारही नसेल अशा ठिकाणीं, जाऊन बसूं आणि मी आपलं भजन गाईन, पूजन करीन. आपण तें मान्य करा आणि मला सद्बुद्धि द्या! राणाजीच्या मातेच्या तोडीचं आपण व्हावं अशी माझी प्रतिज्ञा आहे. लालजी, आपण ती नाहीं कां पूर्ण करणार? कराल–मला आशा आहे.” असें ह्मणून ती मूर्तीकडे टक लावून बसली.

काय चमत्कार आहे! राणाजीच्या त्या एका वाक्याचा केवढा हा परिणाम! तें वाक्य ‘भुलैया तूं माझी माता असतीस तर!’ वाचकांनों, एका निष्कलंक, निष्पाप, वीर्यशाली पुरुषाचें तें मधुर वाक्य! राणाजी अद्याप अतिशय पवित्र होता! त्याच्या हृदयांत कोणाही तरुणीचें प्रेमचित्र उमटलें नव्हतें. त्यास माहीत ह्मणजे फक्त त्याची माता! आपल्या मातेवरूनच त्यानें स्त्रीजातीविषयीं अटकळ बांधली होती. भुलैयाचें रम्य स्वरूप पाहून त्यास खरोखरच आनंद वाटला व त्याच्या निष्पाप मनास मातृप्रेमाचें स्मरण झालें! तो गद्गदलेल्या स्वरानेंच ह्मणाला होता,

तें तिचें शांत उत्तर ऐकून मालदेव चकित झाला. त्याला तिच्या त्या बोलण्याचा कांहींही उलगडा पडला नाहीं. तो पाय आपटून ह्मणाला—" चांडाळणी, तूं माझा विश्वासघात केलास तो केलास आणि पुन: वर ही थट्टा ! " तरीही भुलैयाची मुद्रा शांत. ती पूर्वीप्रमाणेंच शांत स्वरांत ह्मणाली, " मालदेव, आपण चुकतां आहां. माझ्या मनाला ही गोष्ट पटत नाहीं. " मालदेव गोंधळला. भुलैयाला वेडतर नाहीं लागलें ! आज किती दिवसांपासून तरी ती मालदेवाच्या कृष्णकारस्थानांत त्यास सहाय्य करीत होती. कधीं अपयश आलें तर ती त्याचें शांतवन करीत होती. आजच तिला काय झालें ? मालदेवानें विचारिलें, " भुलैया, तुला वेड तर नाहीं लागलं ? "

भुलैयाची तीच शांत मुद्रा आणि तोच शांत स्वर. ती उत्तरली, होय—मालदेव, राणाजींनीं मला वेड लावलं खरं ? "

मालदेव दचकला. तो ह्मणाला, " काय ? कुणाचं वेड ? "

" हें पहा यांचं ! " भुलैयानें आपल्या डाव्याहातावरील मळका व फाटका पदर बाजूला करीत आपला वंशीधर दाखवीत ह्मटलें, " यांचं वेड लागलं आहे. " असें ह्मणून ती जाऊं लागली. मालदेव आश्चर्य चकित झाला. तो तिचा हात धरूं लागतांच ती ह्मणाली, " हं—लांबून काय तें बोला. " मालदेव दचकून मागें सरला. तो पुन: क्रुद्ध मुद्रा करून ह्मणाला, " भुलैया, हा काय चावटपणा आहे ? तूं चाललीस कोठें, तुझा काय विचार आहे ? "

भुलैया हंसली आणि उत्तरली, " मालदेव, तुह्मी भाग्यवान् कीं अभागी ? तुह्माला जांवई किती उत्तम मिळाला! त्यानेंच मला हा चावटपणा शिकविला. आणि हा चावटपणा पूर्णपणें शिकण्याकरितां मी दूर कुठंतरी जात आहें. "

आपला सर्व बेत फसला, राणाजी हातचा निसटला, एवढेंच नव्हे तर जातांना त्यानें आपल्या शौर्यानें आपणास निष्प्रभ केलें ही गोष्ट मालदेवाचे मनास अगोदरच टोंचून राहिली होती. त्यांत त्यास कळलें, भुलैयानें आपलें सर्व कारस्थान त्यास सांगितलें. झालें ! मालदेवाचा क्रोधाग्नी

भडकला व तो भुलैयाकडे आला. तेथें गेल्यावर भुलैया आपल्यास भील, ती आपली क्षमा मागेल, असें मालदेवास वाटलें; पण येथें पाहावें तो भलताच प्रकार! मालदेवाला काय करावें हेंच सुचेना. तो दांत खात ह्मणाला, "समजलों, भुलैया, समजलों—इतके दिवस तूं मला मिठ्या मारीत होतीस, आतां गणाजी—"

"थू तुझ्या तोंडावर!" असें ह्मणून भुलैया तेथून निसटली व पळूं लागली. मालदेव तिच्यामागें लागला. मालदेव वाटेनें सारखा 'तिला पकडा, त्या * * * भग' असें ओरडत होता. पण ती रात्रीची वेळ असल्यामुळें आणि किल्ल्यावर नुकताच गोंधळ उडून गेल्यामुळें त्यावेळीं कोणींही लक्ष दिलें नाहीं. आणि जरी कोणाचें लक्ष गेलें असतें तरी भुलैया सांपडणें शक्य नव्हतें. हरिणीप्रमाणें ताड ताड उड्या मारीत ती पुढें पुढें जात होती. दुसरी एखादी वेळ असती तर मालदेवानें भुलैयास पकडण्याचा इतका अट्टाहास केला नसता. पण मनुष्य क्रोधांत असला ह्मणजे त्यास विषयाचें महत्व कळेनासें होतें. त्याचप्रमाणें मालदेवाची स्थिति होती. सगळ्या अपयशाचें उट्टें भुलैयावर काढावें अशी त्याची इच्छा होती व ती तर हातांतून निसटूं पाहात होती. मालदेवासारख्या वृकस्वभावी माणसास हें कुठून खपणार?

भुलैया बागेच्या फाटकापर्यंत आली व तिनें मागें पाहिलें तों मालदेव पाठीवर होताच. ती पुन: पळूं लागली. मालदेव ओरडून ह्मणाला, "भुलैया, उगीच पळूं नको बरें! किल्यांतून तूं कुठं जाणार?" पण या त्याच्या ओरडण्याकडे तिचें मुळींच लक्ष्य गेलें नाहीं. ती आतां पूर्व दिशेला तोंड करून खांचखळग्यांतून आणि गवताझुडूपांतून पळूं लागली. मालदेवही धापा टाकीत पळत होता! तो मनांत ह्मणत असावा, "काय मजा आहे पहा! जी भुलैया मला मिठ्या मारीत होती तिलाच माझा इतका तिटकारा वाटावा आणि मीं तिला शासन देण्याकरितां तिच्यामागें लागावें."

भुलैया तटाजवळ येऊन धडकली व तिची गति खुंटली! तें पाहून मालदेव आनंदानें ओरडूं लागला. "आतां—आतां कुठं पळाल!"

तरीही भुलैयाचें तिकडे लक्ष्य नव्हतें. ती तटावर हात ठेऊन कड्या-खालीं पाहूं लागली. चंद्र कलल्यामुळें तेथें छाया आली होती. अंधारांत तिला खालचें कांहींही दिसलें नाहीं. मालदेव धापा टाकीत जवळ आला व ह्मणाला, " खालीं उडी टाकण्याचा विचार आहे होय? ह्य: ह्य: ह्य:!" तरीही भुलैया स्वत:स एकटीच समजत होती. ती तटावर चढून उभी राहिली. आपल्या बंशीधराला तिनें पोटाशीं धरलें. मालदेवाला ती उडी टाकेल असें मुळींच वाटलें नाहीं व ह्मणूनच त्यानें तिला पकडण्याचें रहीत केलें. तो तिरस्कारानें हंसून टवाळकी करीत ह्मणाला, " त्या धोंड्याला उराशीं घेऊन स्वर्गांत जाण्याचा विचार आहे वाटतें!" भुलै-यानें लाल डोळे करून मालदेवाकडे पाहिलें आणि नंतर आपलें अंग सांवरून ' जय गोविंदलालजीकी ' ह्मणत तटाखालीं उडी घेतली! ' कड कड धड ' असें कांहींसें ऐकूं आलें. मालदेव अगदीं खुळा झाला. त्यास जी गोष्ट अशक्य वाटत होती तीच त्याचे डोळ्यासमोर घडली!

भुलैयानें मालदेवास चांगलाच भूल दिली!



* *  *  *  * *
*  *

सूर्योदयाची वेळ येतांच सृष्टिमध्यें ज्याप्रमाणें हळूं हळूं चेतना येऊं लागली, त्याचप्रमाणें, प्रभातकालीन शीतल वायुलहरींनीं भुलैयाची सुप्तावस्था दूर होऊं लागून तिच्यांत चेतना येऊं लागली. ती जेथें पडली होती तेथून पूर्व क्षितिज स्पष्ट दिसत होतें. ज्यावेळीं तिनें आपले नेत्र उघडले त्यावेळीं सूर्याचा दूत अरुण क्षितिजाजवळ असलेल्या मेघखंडावर खेळत होता. जवळच्या वृक्षावर पक्षी किलबिल करीत होते. बाह्यवस्तूचें पूर्ण ज्ञान होण्याइतकी शुद्धि अद्याप तिला आली नव्हती. अर्थात् पूर्वेकडील तो अरुणप्रभामय भाग पाहून आणि पक्ष्यांचें कूजन ऐकून तिला मोठें कोडें पडलें. तिनें एकवार सगळीकडे पाहून आपले नेत्र मिटले. ती पुटपुटली, " सगळीकडे इतका चकचकाट कसला बरं ? " ती पडल्या पडल्याच विचार करूं लागली, " हे पक्षी कुठून बोलताहेत, मी कुठं आहें ? आणि तो इतका तांबडा, पिंवळा उजेड कसला पण ? " पुन: तिनें आपले नेत्र उघडले. आतां सूर्याचें आरक्त बिंब क्षितिजावर आलें होतें व त्याचीं कोमल सोनेरी किरणें सर्वत्र पसरलीं होतीं. तिनें उठण्याचा प्रयत्न केला. डावा हात जड लागत होता. तो एखाद्या जड वस्तुखालीं चेपला असावा असेंही तिला वाटलें. तिनें पडल्या पडल्याच त्याकडे पाहिलें. लुगड्याचा फाटका पदर त्यावर पसरला होता. तिनें तो दूर केला. पाहते तों बंशीधराची मूर्ति खालीं तोंड करून हातावर पडली होती ! त्या मूर्तीकडे पाहतांच भुलैया ताडकन् उठून बसली. तिनें उजव्या हातानें मूर्तीला उचललें. डावा हात मुंग्या येऊन अगदीं जड झाला होता. तो झाडीत ती त्या मूर्तीकडे पाहात प्रेमळपणानें ह्मणाली, " आ ! मेरे लालजी ! " पुन: ती इकडे तिकडे पाहूं लागली. भोंवतालच्या झुडपावरील लहान लहान पांखरें या झुडुपावरून त्या झुडुपावर उडून चिंव चिंव करीत होतीं. भुलैयाला पाहून त्यांना आश्चर्य वाटत असावेसें दिसलें. हळूं हळूं भुलैयाला एकक गोष्ट आठवली. आणि आपण तटावरून अपरात्रीं बेलाशक उडी टाकून दिली असतां आपणास मृत्यु कसा आला

नाहीं, याचें तिला आश्चर्य वाटलें. तिनें वर पाहिलें तों चार पुरुष उंच असा कडा वर गेलेला दिसत होता. त्या भयंकर कड्यावरून उडी टाकूनही ती कशी बचावली बरें !

आश्चर्य तर खरेंच, पण भुलैंया वांचली खास. वांचली एवढेंच नव्हे तर तिला क्षुल्लक खरचटण्याखेरीज कांहींही इजा झाली नाहीं.

भुलैंयाला गडावरील प्रत्येक वस्तूचा तिटकारा होता. अर्थात् मालदेवाचे हातीं लागून पुनः विटंबनेंत पडण्याऐवजीं कड्यावरून कोसळून खालीं पडून तुकडे होऊन मरणेंच फार बरें असें तिच्या मनानें घेतलें. कड्याखालीं पडल्यावर आपण वांचणें शक्य नाहीं हें तिला पुरतें समजलें असूनही तिला आपल्या जीवाची भीति वाटली नाहीं कीं मोह उत्पन्न झाला नाहीं. उलट मरण यावें हीच तिची इच्छा, पण मानवी इच्छेच्या नेहमीं विरुद्ध जात असणारी दैवी इच्छा तिच्या इच्छेच्या आड आली. तिनें उडी टाकतांच तिची उडी कड्यापासून निघालेल्या एका झुडपावर पडली ! येथेंच भुलैंया भीतीनें बेशुद्ध झाली. त्या झुडुपाला तिचा तो भार फार वेळ सहन झाला नाहीं. तेथून ती निसटली व त्याच्याखालीं असलेल्या एका जाळींत अडकली ! या झुडुपासून जमीन सुमारें पुरुषभर खालीं होती व तेथें जवळच्या खेड्यांतील लोकांनीं डोंगरावरील गवत कापून त्याचा एक मोठा ढीग करून ठेविला होता. दुसऱ्या झुडुपांतून भुलैंया निसटतांच ती या गवताच्या ढिगावर येऊन आदळली. अर्थात् तिला कांहीं लागलें नाहीं. आतां ती येथेंच होती.

सामान्य जनाच्या दृष्टीला हा चमत्कार कांहीं विशेष वाटणारा नव्हता, पण ईश्वराकडे जिचें मन नुकतेंच लागूं लागलें होतें, जिला आपल्या कृतकर्माचा पश्चात्ताप झाला होता व जिला स्वतःच्या शरीराचा विलक्षण तिटकारा आला होता, त्या भुलैंयाला मात्र हा चमत्कार सहज वाटला नाहीं. चार पुरुषांवरून अंधारांत रात्रीचे वेळीं उडी टाकिली असतांही आपण एखाद्या फुलाप्रमाणें जमिनीवर येऊन पडलों याचें कारण बंशीधराची मूर्ति आपणाजवळ होती हेंच होय, असें तिच्या पश्चात्तापानें शुद्ध झालेल्या भोळ्या अंतःकरणास वाटलें व देवाच्या या

कृपबद्दल तिचें हृदय अगदीं गद्गदून गेलें. तिच्या शरीरावर हर्षरोमांच उभे राहिले व साश्रु नयनांनीं ती आपल्या वंशीधराकडे पाहूं लागली. यापूर्वीं तिनें कांहीं कुचेष्टेनें, कांहीं मौजेनें व कांहीं उत्सुकतेनें देवभक्तांच्या प्रेमाच्या गोष्टी ऐकिल्या होत्या. त्या गोष्टींचें रहस्य तिला आतां उलगडलें. ती ह्मणाली, "देवाला आह्मीं निष्ठुर ह्मणावं तरी कसं? आज इतके दिवस मीं कशी वागलें, देवाला माझी करुणा येण्याचं कांहीं कांहीं कारण नाहीं?आज त्यानं मला फुलासारखं झेलून माझे प्राण वांचविले. तोच देव मला आपल्या पोटांत कां बरं घेणार नाहीं? यापूर्वीं मीं त्याचं भजन केलं होतं कां पूजन केलं होतं, का मला त्याची आठवण होती? पण आयत्या वेळीं वंशीलालाजी तुह्मी धावून आलांत अं? आतां–आतां मी नाहीं तुह्माला सोडायची." असें ह्मणून तिनें त्या मूर्तीस आपल्या हृदयाशीं धरलें. सुमारें चोवीस तासांपूर्वीं जी भुलैया मालदेवाशीं राणाजीला कसा नाहींसा करावा याचें खलबत करीत होती, तीच या वेळीं मूर्तीला पोटाशीं धरून देवाचे अगाध प्रेमांत तन्मय झाली होती. केवढा हा जमीन अस्मानाचा फरक!

ईश्वरविषयक विचार उत्पन्न होण्यास, त्याचेकडे लक्ष लागण्यास प्रातःकालची वेळच मुळीं योग्य! त्यांत जर पश्चात्तापानें दग्ध झालेलें आणि ईश्वरसामर्थ्याविषयीं ओळख पटलेलें अंतःकरण असेल तर! भुलैया तन्मय झाली! उगवता सूर्य नारायण-परमेश्वराचा नेत्र तिला स्वर्गीय संदेश सांगत होता. वायुची लहर, पक्ष्यांचें कूजन, वृक्षलतांचें डोलन, प्रत्येक वस्तु ईश्वरमय असावी असें तिला वाटूं लागलें. ती कांहींसें पुटपुटूं लागली—

**हरि का नाम, हरि का नाम बानि में समाना,**
**पालिया ठिकाना, परमानंद।**
**आपना आपना निराला रंग—**
**पगाना बेगाना जावेगा संग।**
**श्रीमथुरेश जो है जाना पहिचाना,**
**आनंद मनमाना, पाया अमन, पाया अमन,**
**धन धन। मगन मगन लागि है लगन**

त्यागि है जतन हरिके चरन शरन जा
हरिका नाम ॥ इत्यादि ॥

भुलैंयाचे तोंडांतून जसजसे शब्द बाहेर पडत गेले, तसतसे त्यांचें एक सुंदर पद्च बनत गेलें. मात्र आपण जें कांहीं म्हणत आहोंत, त्याची कविता बनत चालली आहे याचें तिला भान नव्हतें. प्रथम ती पुटपुटत होती, पुढें गुणगुणूं लागली व त्यापुढें तर ती खड्या सुरांत गाऊं लागली.

अशा प्रकारें आपल्या बंशीधराला पुढ्यांत घेऊन त्याकडे पाहात व दोन्ही हातांनीं तालिका नाद करीत ती किती वेळ तरी गात होती. त्या भजनांत ती इतकी मग्न झाली की, बाह्य सृष्टीचें तिला कांहीं एक ज्ञान नव्हतें; आणि मध्येंच जर कांहीं व्यत्यय आला नसता तर ती आणखी किती वेळ तेथेंच गात बसली असती हें त्या बंशीधरालाच ठाऊक. पण मध्यंतरीं एक व्यत्यय आला. दिवस थोडासा वर येतो न येतो तोंच गवत कापणारे त्या बाजूला आले व त्यांनीं तिला पाहिलें. तिचा तो वेष पाहून व प्रेमळ भजन ऐकून त्यांना तिचें मोठें कौतुक वाटलें. ते सर्व तिच्याभोंवतीं जमून तिच्याकडे पाहात आणि कुजबुजत उभे होते. भुलैंयाला त्यांचें बराच वेळ भान नव्हतें. भजन गातां गातां मध्येंच तिनें थांबावें व आपल्या बंशीधराचे हनुवटीला हात लावून लडिवाळपणें विचारावें, " कहो लालाजी, क्या मेरी पुकार सुनते हो ? अजी तुम कहां के सुननेवाले ? बिचारा ध्रुव जंगल जंगल घूम रहा था, और आपको पुकार रहा था तो भी आपने उसे दर्शन नहीं दिया ! भला तब आप मुझे कहां से मिलेंगे। न मिले—लालजी न मिलो—मैं तो आपका नाम ही बानी में ( तोंडांत ) समा लुंगी—क्या फिर भी मुझे आनंद नहीं मिलेगा ? अहाहा ! हरि का नाम हरि का नाम—" पुनः तिनें गाऊं लागावें.

इतक्यांत तिनें सहज वर पाहिलें तों हातांत मोठमोठे विळे व दोर घेऊन उभे असलेले दहा बारा इसम तिचे नजरेस पडले. त्याबरोबर ती ताडकन् उठून उभी राहिली. तिनें त्यांच्याकडे कांहीं चमत्कारिक मुद्रेनें पाहिलें. ती ओरडली, " यमदूत, यमदूत ! " असें म्हणून तिनें त्या मूर्तीस पदराखालीं नीट झांकून घेऊन तेथून पलायन केलें ! गवत काप-

णारे चकित होऊन तिच्याकडे पाहूं लागले तों एखाद्या हरिणीप्रमाणें टाण टाण उड्या मारीत ती जात होती. एक वेळही तिनें मागें परतून पाहिलें नाहीं. थोड्याच वेळांत ती नजरेआड झाली.

कांहीं वेळानें ती पायथ्याशीं येऊन पोंचली व एका वाटेला लागली. नंतर तिनें मात्र मागें वळून पाहिलें. कोणी नाहीं असें पाहतांच तिला फार संतोष झाला. ती कांहीं विचार करीत वाट चालूं लागली. ती मनांत म्हणाली, " ध्रुवबाळ, हरीला हुडकण्याकरितांच आपलें घर टाकून आईला सोडून अरण्यांत आला होता. त्याला जसा तो जगन्नाथ लौकरच भेटला तसा मलाही भेटेल कां? छे छे, भुलैंया, तूं किती पापी? ध्रुव बाळ कोणीकडे आणि तूं कोणीकडे? ध्रुवाचें अंतःकरण किती कोंवळं, किती शुद्ध! आणि मी—नरकसुद्धां आपल्या पोटांत मला जागा देण्यास भज-णार नाहीं—हाय! हाय!! बंशीलालजी (पदराखालून मूर्ति काढून त्याकडे पाहात) जन्मभर मी काय अशीच भटकत राहूं? तुह्मी कुठं राहतां याची बरोबर वाट सांगणारा मला कोणीच कां नाहीं आढळणार? हे लालजी, पहा बरं-जर आपण लौकर भेट नाहीं दिली तर—" याच वेळीं कोणीसें गात असलेलें तिच्या कानावर आलें:—

" राम कहने का—गोविंद कहने का—
मजा जिसको जबां पें आ गया।"

भुलैंया कान देऊन ऐकूं लागली. गाणारी व्यक्ति भक्तिभावानें गात होती.

लुटा मजा प्रल्हाद ने उस नाम के पर ताप से,
नरसिंग हो दरशन दिया, त्रैलोक में जश छा गया—
राम कहने का—गोविंद कहने का-मजा-'

तें भजन ऐकून भुलैंया तन्मय झाली. ती मोठ्यांदा ह्मणाली, " अहाहा! क्या ही मीठा भजन! राम! राम!! गोविंद—गोविंद प्रल्हादजीनें इसी नामका मजा लुटा, और फिर क्या भगवान को नर-सिंगरूप लेनाही पडा. मैं भी गाऊंगी. हां हां, मैं भी भगवान् का नाम लेकर उसको बुलाउंगी—लालजी, आप की प्रतिज्ञा मैं फिर एकदफे तोड दुंगा—फिर गाता है. सुनो—"

**नाम शबरी जात भिल्ली प्रेम से सुमरन किया,**
**परमात्मा घर आ गये उसके हाथ का फल पालिया—**

"**राम कहने का-गोविंद कहने का मजा जिसकी जबां पें आ गया-**"

भुलैंया मोठ्यांदा ह्मणाली, " हे गानेवाले, तुम कितने पुण्यवान हो ! क्या ही अच्छा भजन? शबरीनें रामचंद्रजीका ध्यान किया तो उनको उसके झुंटे ( उष्टे ) फलही खाने पडे तो क्या आप मेरे घर न पधारेंगे ? " असे बडबडत ती पुढें चालली. ज्या दिशेकडून गायन ऐकूं येत होतें तिकडेच ती चालली.

तेथून सुमारें पन्नास पावलांवर वाटेच्या आड बाजूला एका झाडा खालीं एक गोरखपंथी साधु बसला होता. त्याच्याजवळ एक एकतारी असून ती वाजवीत डोळे मिटून तो ह्मणत होता.

"**राम कहने का-गोविंद कहने का-मजा जिसकी जबां पें आ गया-**"

साधूच्या एकंदर हावभावावरून त्यास बाह्य जगताचें फार थोडें ज्ञान असावें, असें भुलैंयास वाटलें. ती त्याचेसमोर जाऊन उभी राहिली. ती खाकरली तरी साधु आपल्याच ब्रह्मानंदांत. तें पाहून भुलैयेला आनंद झाला. तिनें त्यास नमस्कार करीत ह्मटलें, " हरीचा पत्ता हे सांगतील."



* *　　　* *　　　* *

*　　　*　　　*

आपल्या वैवाहिक नाटकाचा शेवटचा प्रवेश युद्धांत करून राणाजी हमीर चितोरगडावरून गेल्यास आज बरोबर पंधरा दिवस लोटले. मालदेवानें या कळवाडच्याच्या सिंहास युक्तिप्रयुक्तीनें आपल्या गुहेंत आणून, त्याचे दांत व नखें काढून घेण्याची मसलत योजिली खरी, पण त्याचा परिणाम उलटाच झाला. राणाजी त्याचे तावडींत येण्याऐवजीं सावध मात्र झाला, आणि आतां तो झालेल्या अपमानाचा बदला घेतल्याखेरीज राहणार नाहीं हेंही मालदेवास चांगलें समजून चुकलें. पण आतां त्यास फक्त राणाजीविषयींच काळजी नव्हती. त्याचे घरांतीलच एक मनुष्य शत्रूला फितूर होण्याचा संभव होता. तें मनुष्य ह्मणजे भुलैया !

त्या रात्रीं भुलैयानें उडी टाकल्यावर किती वेळ तरी मालदेव त्या जागीं उभा राहून तटाखालीं अंधेरांत डोळे फाडफाडून पाहात राहिला; पण त्यास त्यावेळीं कांहींही दिसलें नाहीं. नंतर तो विषण्णचित्तानेंच आपल्या महालांत गेला. भुलैयेच्या मृत्यूविषयीं विचार करण्यास त्याचे मनास सवडच नव्हती. दुसरा एखादा प्रसंग असता तर त्यानें त्या रात्रीं दिवट्या धरून तटाखालीं जाऊन भुलैयेची काय स्थिति झाली हें पाहिलें असतें; पण हमीर त्याचे हातांतून निसटल्यामुळें त्यास दुसरा विषय सुचणें शक्य नव्हतें.

दुसरा दिवस उजाडला ! प्रहर दिवसानंतर त्यास भुलैयेची आठवण झाली. तिचा मुडदाच कोठें तरी एखाद्या खांचखळग्यांत सांपडावयाचा अशी त्याची दृढ कल्पना. ह्मणून तो स्वतः न जातां त्यानें आपल्या एक दोन खाजगी नोकरांसच पाठवून दिलें. तोंपर्यंत इकडे भुलैया कोणीकडचे कोणीकडे निघूनही गेली होती. मात्र शोधार्थ गेलेल्या नोकरांस गवत कापणारांकडून भुलैया जिवंत असल्याची बातमी लागली. नोकर गडावर आले व त्यांनीं मालदेवास ती चमत्कारिक हकीगत सांगितली. त्याबरोबर त्याची चिंता दुणावली.

जोंपर्यंत मनुष्यानें कार्याला हात घातलेला नसतो, तोंपर्यंत त्यास यशापयशाची फारशी भीति वाटत नाहीं. असें असें हात गेल्यावर असें असें होत जाणार अशी तो अटकळ बांधीत असतो; पण कार्याला हात घातल्यानंतर प्रथम कांहीं वेळ त्यानें कल्पना केल्याप्रमाणें यश येत जाऊन नंतर एकदम अपयशास सुरुवात झाली असतां त्याची मन:स्थिति मोठी चमत्कारिक होते. आतां आलें आहे एवढ्याच अपयशानें आपलें दुर्दैव थांबणार कीं, आपण दुसऱ्याकरितां तयार केलेल्या जाळ्यांत आपणच सांपडून त्यांत आपला नाश होईपर्यंत हें अपयश वाढत जाणार अशी कुशंका त्याचे मनास डवचूं लागून त्याचें मन हताश होतें. राणाहमीराचा—चितोरगडच्या खऱ्या वारसाचा—नायनाट करण्याकरितां मालदेवाचें किती आटोकाट धोरण ! प्रथम त्याप्रमाणें सर्व होत गेलें. आणि त्या सर्वांचा शेवट जर हमीराचा नाश होण्यांत झाला असता तर ? पण दुर्दैवाला मध्यंतरीच मालदेवाची आठवण झाली. त्याची लाडकी भुलैया—जिनें हमीरास ठार करण्याचा अगदीं विडा उचलला होता—तिनेंच कां ऐन वेळेवर सर्व हेतु ढासळून पाडावा ? बरें, मागून तरी हमीराचा नाश व्हावा कां नाहीं? तोही हातांतून निसटला. इकडे भुलैया तर त्याचे रूपानें अगदीं वेडी झाली. (ही मालदेवाची कल्पना) त्याचेकडे जाण्याकरितां तिनें तयार व्हावें, तटावरून उडी टाकिली असतांही तिनें जिवंत राहावें याचा काय अर्थ ? आतां ती हमीराकडे जाणार यांत शंका नाहीं. तिला गडावरील सर्व गोष्टी माहीत आहेत. त्या हमीरास कळल्या तर ? हां—हां म्हणतां तो आपल्यास पालथा घालील ! असेच निराशेचे विचार मालदेवाचे मनांत आले आणि तो अगदीं बावरून गेला. इतक्यांत त्याची कन्या मंगला त्याचेकडे आली. मनुष्य गोंधळून गेला म्हणजे त्यास आपले विचार—आपला अपयशाचा पाढा—दुसऱ्यास वाचून दाखवावासा वाटतो. मंगलेला पाहतांच मालदेव म्हणाला, " पोरी मंगले, सर्वस्वीं घात झाला. भुलैया मेली नाहीं. तटावरून उडी टाकूनही ती वांचली. आतां ती हमीराकडे जाणार—

" आणि मग ? " मंगलेनें प्रश्न केला. ती तेथें आली त्यावेळीं तिची मुद्रा फार खिन्न दिसत होती. पण भुलैया जिवंत राहिल्याचें ऐकतांच

तिची खिन्नता पार कोणीकडे नाहींशी झाली. तिला फार आश्चर्य वाटलें व तिनें वरील प्रश्न केला; पण तिच्या मुद्रेवरून तिला त्या प्रश्नाचें उत्तर पाहिजेच होतें असें दिसलें नाहीं. ती कांहीं तरी विचारांत होती. मालदेवास मात्र तिचा तो भाव समजला नाहीं. तो ह्मणाला, " आतां काय होणार माहीत आहे काय? ती राक्षसीण राण्याकडे जाणार आणि त्यास गडावरील सर्व बातमी सांगणार–" मंगलेचें त्याच्या सांगण्याकडे लक्ष्य होतें कीं नाहीं कोण जाणें? मात्र तिनें मध्येंच ह्मटलें, " मग बाबा, मी जातें भुलैंयेच्या पाठलागावर. मी तिचे सर्व बेत हाणून पाडीन. मी पुरुषवेषानें जाईन तेव्हां मला कोण ओळखील?" मालदेवानें थोडा वेळ आपल्या कन्येकडे पाहिलें आणि ह्मटलें, " हं जा–मी आणखीही कांहीं तजवीज करतों." आपल्या पित्यास आपली कल्पना एकदम पसंत पडलेली पाहून मंगलेस आनंद झाला. तिचें व तिच्या पित्याचें आणखीही कांहीं बोलणें झालें व नंतर ती आपल्या प्रवासाच्या तयारीस लागली.

मंगलेनें येऊन केवढें तरी कार्य केलें. मालदेवाच्या निराशेच्या विचारास तिनें एकदम निराळें वळण दिलें. मंगला जातांच मालदेव उठून इकडे तिकडे फिरत विचार करूं लागला, " अस्सें–आतां पुनः असा घाट जुळवून या स्वारीला पालथें घातलें पाहिजे. मंगलेला भुलैंया सांपडणार यांत शंका नाहीं. ह्मटल्याप्रमाणें ती तिचे सर्व बेत ढासळून पाडील. आतां तोंपर्यंत आपण रणभीराला थावा दिल्लीकडे पाठवून आणि बादशाहाकडून मागवावी फौजेची मदत. इकडे बनवीराला राण्याच्या वासावर ठेवावा. प्रथम त्या स्वारीकडून कोणीना कोणी वकील खास येईल. त्यावेळीं चितोरगड स्वाधीन करण्याचें सोंग करून आंतून आमच्या फोजेनें आणि बाहेरून बादशाहाच्या फौजेनें थावा दद्ध्या! दोन्ही बाजूला पेटलेल्या लांकडांतील किड्याप्रमाणें हा केळवाड्याचा सिंह जेथल्या तेथें तडफडून मेला पाहिजे."

नवीन योजना–नवीन मसलत! मालदेवानें योजल्याप्रमाणें केलें. मंगला भुलैंयेच्या शोधार्थ गेली. रणभीर दिल्लीला गेला आणि बनवीर

केळवाड्यास दाखल झाला. आतां या नवीन जाळ्यांत आपलें सावज कसें काय अडकतें याची मालदेव वाट पाहूं लागला.

मनुष्य विचार करतेवेळीं, आशा करतेवेळीं, योजना करतेवेळीं आपल्या मनास शक्याशक्यतेच्या बाहेर ठेवीत असतो. मालदेव या नियमास अपवाद नव्हता. राणाजी सावध झाला आहे. तोही आपल्याकडून कांहीं योजना योजीत असलाच पाहिजे ही गोष्ट तो विसरला. असो.

चार दिवस—आठ दिवस—करतां करतां पंधरा दिवसांवर काळ लोटला. तरी कोणीही परत आलें नाहीं कीं कोणाची कांहीं खबर कळली नाहीं. राण्याकडून तर कांहींच गडबड झाली नाहीं. जणुं काय कांहीं घडलेंच नाहीं. हें पाहून मात्र मालदेवाचें मन पुनः आशानिराशेच्या तडाक्यांत सांपडलें. आपल्या मुलांपैकीं प्रत्येकास त्यानें आपापल्या कामाचें काय झालें तें गडावर तातडतोब कळविण्याविषयीं बजावून सांगितलें होतें. असें असतां अद्यापि कोणाकडून कांहींही खबर येऊं नये याचा अर्थ काय? समजा, वनवीरास कोणीं ओळखलें असल्यास तो शत्रूच्या कैदेंत पडला असेल. मंगलेनें तरी परत यावें कीं नाहीं? समजा तीही स्त्री मनुष्य ह्मणून कुठें चुकली असेल किंवा कांहीं संकटांत असेल. रणभीर हावेळपर्यंत यायला पाहिजेच होता! बादशाहानें त्यास ठेऊन घेतलें ह्मणावें तर माझें पत्र अतिशय तांतडीचें होतें. तेव्हां काय घोंटाळा आहे कांहीं समजत नाहीं." हें वाक्य तो अगदीं त्रासून ह्मणतो आहे तोंच एका नोकरानें येऊन बाहेर एक घोडेस्वार आल्याचें सांगितलें. तें ऐकतांच मालदेव धांवतच बाहेर देवडीवर आला. पण त्या स्वाराकडे पाहतांच त्याची निराशा झाली. तो त्या स्वारास कांहीं टाकून बोलणार तोंच त्यानें पुढें येऊन लावून मुजरा केला व एक लखोटा त्याचे हातांत टाकला. मालदेवानें चडफडतच तो लखोटा फोडला. त्यांत ठराविक मायन्यानंतर असा मजकूर होता—

"मेर लोकांनीं पुनः बंडावा सुरू केला आहे. आणि सध्याची त्यांची तयारी चांगली दिसते. कदाचित् यावेळीं त्यांना केळवाड्याचा ठाकूर हमीर याजकडून आंतून

मदत असावी. कसेंही असो. आहे या फौजेनें त्यांच्याशीं तोंड देणें कठीण आहे. करितां शक्य तितकी लौकर भरपूर मदत पाठवावी. "

पत्र वाचून संपतांच मालदेवाची मुद्रा मोठी पाहण्यासारखी होती. त्यानें अतिशय तिरस्कारानें त्या स्वाराकडे पाहिलें आणि तो कांहीं न बोलतां एकदम आपल्या महालांत निघून गेला. गरीब बिचारा घोडेस्वार! आपण अशुभवार्ता धरून जात आहोंत हें त्यास काय माहीत? आणि जरी माहीत असलें तरी त्याच्याकडे काय दोष? पण याचा विचार चिडलेल्या मालदेवास कसा सुचणार?

मालदेव एखाद्या उचललेल्या सर्पाप्रमाणेंच ठीस् ठीस् करीत आपल्या महालांत आला! त्यानें पुन: एकवार तें पत्र वाचलें. जणूं काय, त्यास पूर्वीच्या वाचनानें त्याचा कांहीं उलगडाच पडला नव्हता.तो दांत खात व ओंठ चावीत जोगजोगानें इकडून तिकडे येरझार करूं लागला. डोळ्यांनीं तो कोणाला तरी दटावीत होता. अगदीं संतापानें एका अदृश्य व्यक्तीशीं तो बोलत असावा असें स्पष्ट दिसलें. हळूं हळूं त्याचा तो क्रोध तोंडावाटें बाहेर पडूं लागला.तो म्हणूं लागला-"या गाढवाला ह्याच वेळीं हें पत्र पाठवावेंसें वाटावें अं? हमीर मेर लोकांना मदत करणार आणि म्हणूनच त्यांनीं पुन: बंडावा केला. असें— ठीक–ठीक. करा म्हणावें बंड–जाव! मदत बीदत कुछ नहीं मिलेगी! बदमाश! एका यःकश्चित् लुच्च्या लोकांच्या पुंडाव्याला भिऊन पत्र पाठवितो (वेडावून) लौकर मदत पाठवा म्हणे! तुझ्या बापानें इथं ठेविली आहे फौज! राण्याला चिरडल्याखेरीज मी कोणाकडेही लक्ष देणार नाहीं. पण तो तरी काय हिकमती पहा. या पंधरा दिवसांत मला वाटत होतं, आज तो चालून येईल, उद्यां तो आपला वकील पाठवील–पण चोरानें हें सर्व टाकून मेर लोकांना चिथवलंन होय? बरें आहे पाहून घेईन." असें म्हणून त्यानें पुन: एकवार त्या पत्राकडे पाहिलें. तो दचकला. त्याला कांहीं शंका आली. तो त्या पत्राकडे पाहात ओरडला, "सांपडलें–अरे बदमाष, सांपडलास! तरी म्हटलें महिन्या दोन महिन्यांपूर्वी मेर बंडखोरांचा पुरता पराभव करून त्यांचा

अगदीं बीमोड करून मी आलों अन् पुनः त्यांनीं उचल खाल्ली कशी ? अशीं खोटीं मार्टीं पत्रें पाठवून मला भेडावणार होय ! ह्यः मालदेवास तूं इतका का भोळा समजतोस? " असें ह्मणून तो मोठ्यांदां हंसला. इतक्यांत दाराबाहेर कोणीसें खाकरलें. मालदेवानें मागें वळून पाहिलें तों त्याचा नोकर. मालदेवास या वेळीं कोणीं नको होतें. त्यानें खेंकसून विचारिलें, " काय आहे ? " आपल्या मालकाचा रंग पाहून तो बिचारा घाबरला. तो हळूंच ह्मणाला, " तो स्वार कांहीं उत्तर मागतो आहे." मालदेव उसळून ह्मणाला, " तो उत्तर मागतोय ? जाव, त्याला एकदम पकडून कैदेंत टाका. शत्रुकडील तो हेर आहे हेर ! जा-जा-तोंडाकडे पाहात उभा राहूं नकोस. त्याच्याजवळ कोणी आहे कां नाहीं? नसेल ना-काय मूर्ख लोक तुह्मी-जा अगोदर जा ! तो पळून जाण्याचा प्रयत्न करील-जा-जा त्यास एकदम पकडून ठेवा. मागून त्याचा विचार करूं." आपल्या मालकाचा तो हुकूम ऐकतांच तो अगदीं स्तंभित झाला. तो आश्चर्य करीतच तेथून निघून गेला. तो गेल्यावर मालदेवानें आंतून दाराला कडी लावून घेतली. तो एका कोचावर जाऊन पडला. पुन्हा एकवार त्यानें तें पत्र पाहिलें.अगदीं निरखून पाहिलें.त्याबरोबर त्यास कांहीं विचार पडलासा दिसलें. तो ह्मणाला, " खरें कीं खोटें ? समजा, हें पत्र राण्यानेंच मला भेडावण्याकरितां ह्मणून पाठविलें असेल; पण यापासून त्यास फायदा काय ? कांहीं नाहीं. त्या स्वारासच सर्व हकीकत विचारिली पाहिजे." असें ह्मणून तो उठला. पुनः त्यानें एकवार त्या पत्राकडे पाहिलें. तो थबकला व पुनः विचार करूं लागला. थोड्याच वेळांत त्याचा कांहीं निश्चय ठरला ! तो दाराजवळ गेला. त्यानें कडी काढून दार उघडलें तों पुढें बनवीर उभा ! मालदेव त्याची किती उत्सुकतेनें वाट पाहात होता. पण त्यास तशा वेळीं एकदम पाहतांच मालदेवास आश्चर्य वाटलें व एकपरी त्याचें तें येणें अवेळीं व अशुभदायक असें वाटलें. तसें कां वाटलें हें कांहीं बरोबर सांगतां येणार नाहीं; पण त्यास बनवीराच्या त्या एकाएकीं येण्यानें आनंद खास झाला नाहीं. त्यानें एकदम प्रश्न केला-" कोण बनवीर, तूं केव्हां आलास ? " ह्यावर बन-

बीराची मुद्रा प्रफुल्लित व्हावयास पाहिजे होती. पण तसें कांहीं झालें नाहीं. तो हळूंच ह्मणाला, " आंत–आंत चला सर्व सांगतों."

" हा दुसरा अपशकून " मालदेव ह्मणाला व ते दोघेही आंत आले. बनबीरानें दार लावून घेतलें. तो दार लावून वळतो तोंच मालदेव कांहीं तिरस्कारानें, कांहीं क्रोधानें ह्मणाला, " बोल, अपयश घेऊनच परत आलास ना ? "

बनबीरास आपल्या पित्याचें तें वर्तन अगदीं आवडलें नाहीं. तो कठोर स्वरांत उत्तरला, " कुमार्गानें चढवलेली प्रयत्नाची हंडी यशाचें शिंक्यावर कोठून टिकणार ? "

मालदेवानें दचकून घोगऱ्या स्वरांत विचारिलें, " ह्मणजे ? "

" ह्मणजे काय ? " बनबीर अगदीं शांत स्वरानें बोलूं लागला, " मी हमीराचा वकील आहें."



** ** **

* ** *

हमीरानें आपल्या घोड्याचें नांव ठेविलें होतें ' चितोर. ' त्याची खिजमत करण्याकरितां एखादा नोकर ठेविण्याइतकी राणाजींची स्थिति होती, पण हें काम तो स्वतःच करी. हरदेवाला आपल्या धन्याचा हा साधेपणा अगदीं आवडत नसे. तो ह्मणे, " किती झालें तरी आपण राजकुलतिलक. बाप्पारावळचे वंशज. आपण आपल्या इतमामाप्रमाणें वागलें पाहिजे." राणाजी यावर त्याचें समाधान करी—" हरदेवा, तुझें ह्मणणें रास्त आहे. पण ती स्थिति मला प्राप्त होऊं दे. जोंपर्यंत मला माझ्या पूर्वजांचें वैभव परत मिळालेलें नाहीं तोंपर्यंत बापदाद्यांच्या नांवावर फुकाचा मानमरातब मला नको आहे. माझे पूर्वज मोठे होते. माझें कुल उच्च प्रतीचें आहे. अगदीं आमचा अंश थेट श्रीरामचन्द्रापासूनचा असेल. पण त्याचा आतां कांहीं उपयोग आहे काय ? माझे पूर्वज चितोरगडावर राहात होते; पण आज मला तर केळवाड्यासारख्या खेड्यांत राहावें लागत आहे ना ? माझे पूर्वज चितोरगडावरील महालांत नांदत होते, आज माझ्या कपाळीं केळवाड्यांतील एक झोंपडीच आली आहे ना ? माझे पूर्वज सुग्रास अन्न खात होते, पण आज माझ्या वाट्यास सातूचाच तुकडा आला आहे ना ? मग परिस्थितींत जर बदल झाला नाहीं तर मानमरातबाच्या बाबतींत तरी मला चैन पाहिजे कशाला ? हरदेवा, सौख्यलालसा ही मनुष्याला स्वाभाविक आहे. ' तूं सुख भोग ' असें त्यास दुसऱ्यानें सांगण्याची जरूर नाहीं. तो आपण होऊन आपल्याला सौख्य व्हावें ह्मणून धडपड करीत असतो. एवढेंच नव्हे तर दुसऱ्याला दुःख झालें तरी पत्करलें, पण मला सुख लागलें पाहिजे ही दुष्ट भावनाही त्यास स्वाभाविक आहे. पण ज्याचें मन सुसंस्कृत झालें आहे, ज्याला चांगलें-वाईट, न्यायान्याय, धर्माधर्म कळूं लागलीं आहेत, त्यास फुकाच्या मानमरातबाचा अगदीं तिटकारा असतो. निदान मला तरी खास आहे. आणि ह्मणूनच मी अशा तऱ्हेनें वागतों. ज्या दिवशीं मी चितोडचा अधिपति होईन, राजस्थानांतील सर्व राजेरजवाडे मला आपला सम्राट्

समजतील, त्या दिवशीं मी आपोआपच सम्राटासारखा मानानें वागेन; पण सध्याच्या स्थितींत मी स्वतःस तुझ्यासारखा एक साधा रजपूत समजतो." राणाजीच्या या भाषणानें हरदेव गप्प बसे. मात्र त्यास राणाजीच्या त्या स्थितीबद्दल वाईट वाटे यांत शंका नाहीं. असो.

दोन प्रहरची वेळ होती. राणा हमीर एका ओढ्याचे कांठीं आपल्या चितोरास धूत व घाशीत होता. या वेळीं त्याचे आसपास कोणीं नव्हतें. आसपासच नव्हे, आसमंतांत दूरपर्यंत कोणी नव्हतें ह्मटलें तरी चालेल. केळवाड्यापासून सुमारें पाव कोसावर असलेल्या एका डोंगराच्या खबडींत हें स्थान होतें. राण्याला ज्या वेळीं एकान्त वास हवासा वाटे त्या वेळीं तो आपल्या घोड्याला घेऊन येथें येई व तासांचे तास आपले पुढील बेत जुळवीत बसे. येथें आल्यावर तो सर्व वेळा घोड्याला धूत घाशीत असे असें नाहीं. कधीं त्यास चरण्यास दूर सोडून देई, कधीं एखाद्या झाडाला बांधून घाली अथवा कधीं त्यावर बसून या झाडाखालून त्या झाडाखालीं फिरत असे. पण सहसा त्यास विशेष गोडी ह्मणजे चितोरला दूर कोठें तरी चरण्यास सोडून आपण एखाद्या झाडाखालीं पुष्कळसे धोंडे जमवून बसावें आणि मग त्या धोंड्यांचे दोन भाग करून एक शत्रुसैन्य आणि स्वतःचें सैन्य अशी भावना धरून लढाई खेळत बसावें. ह्या पोरखेळांत तो इतका दंग होई कीं, त्यास पुष्कळ वेळा आजूबाजूचें ध्यान राहात नसे. हरदेवास त्याचा हा पोरकटपणा पाहून मोठें नवल वाटे व पुष्कळ वेळा तो याबद्दल मालकाचा उपहास करी. असो.

आज हमीरानें प्रथम थोडा वेळ घोड्याची सेवा केली आणि नंतर त्यास उन्हांत चरण्यास सोडून देऊन तो आपल्या नेहमींच्या वृक्षाखालीं गेला. येथें त्याचे निर्जीव 'मैतर' इतस्ततः पडले होते. त्यांचेकडे पाहात तो किंचित् हंसून ह्मणाला, "माझ्या पाषाण मित्रांनों, इतके दिवस मी तुमचे मदतीनें युद्धशास्त्र शिकलों. आजपासून बरोबर पंधरा दिवसांचे आंत चितोरवर माझ्या पूर्वजांचें निशाण फडकावें अशी माझी इच्छा आहे व प्रतिज्ञा आहे. त्या वेळीं तुमच्यापासून घेतलेल्या ज्ञानाचा उपयोग होईल काय? द्रोणाचार्य आपले गुरु होत नाहींत. ह्मणून एक-

लव्यानें त्यांचा पुतळा स्थापून त्यास आपलें गुरु मानिलें आणि धनुर्विद्या आपलीशी केली. माझ्याजवळ असलेल्या सैन्यानें ज्या वेळीं माझी लटक्या लढाईची कल्पना फेटाळून लाविली त्या वेळीं मला आपली दुधाची तहान ताकावर भागवावी लागली. ह्मणून ह्मणतों, गडच्यानों, एकलव्याप्रमाणें मलाही तुमच्यापासून घेतलेली युद्धविद्या फलदायक होईल ना ? आपल्यापेक्षां बलिष्ठ शत्रु चिरडावयाचा असला ह्मणजे पुष्कळ विचार करकरून त्या कामास हात घालावा, संधि येईपर्यंत आपण निर्जीवांसारखें पडावें अशी माझी समजूत आहे आणि ह्मणूनच मी इतके दिवस स्वस्थ बसलों. मला आतां वाटतें माझी संधि आली आहे. या संधींत येथें एकांतांत येऊन केलेल्या तपस्येचा कांहीं उपयोग झाला पाहिजे. पाषाणखंडानों. तुह्मी आपला आशीर्वाद या कामीं द्या बरें ? जड आणि चेतन या दोन्हींमध्यें भेद नाहीं. ईश्वर सर्वत्र आहे. जगांतील सर्व वस्तु ईश्वरांश आहेत असें मीं गुरुजींच्या तोंडून पुष्कळ वेळां ऐकिलें आहे. तें खरें असेल तर तुमच्यामध्येंही ईश्वरांश नाहीं असें मी कसें ह्मणूं ? कदाचित्–कदाचित् तुह्मी चितोराकरितां प्राण देणारे रजपूत वीर तर नसाल ? माझ्याजवळ असलेले वीर अविचारी आहेत असें समजून मला युद्धविद्या शिकविण्याकरितां तुह्मी आपली स्वर्गांतील जागा सोडून पाषाणरूपानेंच येथें तर आला नसाल ? कोणीं सांगावें–ह्मणून ह्मणतों पाषाणखंडांनों, मी आतां प्रत्यक्ष कृतीला सुरुवात करणार, याकरितां तुमचा मला आशीर्वाद पाहिजे—" अशा प्रकारें तो बोलत उभा होता तोंच त्याचा घोडा खिंकाळू लागला ह्मणून त्यानें दचकून त्या दिशेला पाहिलें. तों हरदेव आपल्या घोड्यावर बसून त्याचेकडे येत होता. राणाजी त्याच्याकडे पाहून हंसला व ह्मणाला, " हे वेढोबा आले माझा उपहास करायला. माझ्या सर्व मित्रांना, हितचिंतकांना, सैन्याला एकदम लढाई पाहिजे. वेड्यांना असें कळत नाहीं कीं हें काम धिमेपणाचें आहे." इतकें तो पुटपुटला तोंच हरदेव तेथें आला. तो घोड्यावरून खालीं उडी टाकीत ह्मणाला, " अद्यापिही तेच एकांतांतील विचार, तीच दगडांची कडकी लढाई-महाराज, आतां हा पोरखेळ केव्हां संपणार बरें ?"

राणाजी त्यास एकदम ह्मणाला, " अवघ्या पंधरा दिवसांत चितोडावर माझें निशाण फडफडलें पाहिजे. " " प्रत्यक्ष कृति न करितां ? "

राणाजी हंसत हंसत त्याचे मुद्रेकडे पाहूं लागला. हरदेव पुढें ह्मणाला, " आतां आपल्या धिमेपणापुढें हात टेकण्याची वेळ आली. मालदेवानें अपमान करून आज पंधरा दिवस होऊन गेले. अद्यापिही राणाजीला 'कसें करूं, काय करूं' हा मंत्र सुटत नाहीं ह्मणावयाचा ? "

तरीही राणाजीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. हरदेव पुढें बोलूं लागला, " अशीच स्थिति आणखी कांहीं दिवस राहिल्यास आपल्या फौजेचा आपल्या शौर्यावरील विश्वास कायमचा उडण्याचा संभव नाहीं काय ? "

राणाजीनें शांतपणें विचारिलें, " आपलें एकंदर सैन्य किती आहे, हरदेव ? "

हरदेव एकदम ह्मणाला, " समजलों या प्रश्नाचा मतलब. अद्यापिही आपल्यास स्वतःच्या सैन्यबलाविषयीं शंका वाटते असेंच ना ? पण महाराज, आपल्या पांच हजार सैन्यापुढें शत्रुचें पन्नास हजार सैन्यही तुच्छ आहे."

" कशावरून ? "

हरदेव त्याच्या या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून ह्मणाला, " शिवाय राजस्थानांतील ठाकरांनीं मदत देण्याचीं वचनें दिलीं आहेत तीं निराळींच-"

" प्रसंगीं ते लोक उपयोगी पडतीलच हें खरें कशावरून ? " राण्यानें पुनः विचारलें.

तो प्रश्न ऐकून हरदेव गोंधळला. तो ह्मणाला, " मग आपला विचार तरी काय ? स्वतःच्या सैन्यबलाविषयीं शंका, हितचिंतकांनीं दिलेल्या वचनाविषयीं अविश्वास, प्रत्यक्ष कृतीला मुळींच सुरुवात नाहीं. राणाजी, मग काय या दगडांच्या लढाया करूनच चितोर आपल्या हातीं येईल असें वाटतें ? "

राणाजी त्याचा हात धरून ह्मणाला, " हरदेव, ये. त्या घोड्याला सोड चरायला. आज मला आपली जीभ स्वैर सोडिली पाहिजे. "

राण्याचें तें अखेरचें वाक्य ऐकतांच हरदेव आश्चर्यचकित होऊन त्यांचेकडे पाहूं लागला. त्यानें आपला घोडा सोडून दिला आणि ते दोघेही झाडाखालीं जाऊन बसले. बसल्यानंतर बराच वेळ राणा हरदेवाच्या चरत असलेल्या घोड्याकडे पहात होता. नंतर तो ह्मणाला, "मालदेवानें केलेल्या अपमानाचा बदला मी अद्यापपर्यंत कां घेतला नाहीं याचें तुह्माला आश्चर्य वाटत असेल; पण माझ्या स्थितींत असलेल्या विचारी माणसानें माझ्यासारखेंच केलें असतें. हरदेवा, आपल्या सैन्यबलाचा योग्य अभिमान असणें केव्हांही चांगलें, पण दुरभिमानी असणें मात्र परिणामीं हितकर होणार नाहीं. माझी पांच हजार फौज निवडक आहे खरी, पण तिला अद्याप लढण्याचा प्रसंग कोठेंही आला नाहीं. तिची परीक्षा अद्याप व्हावयाची आहे. असें असतां प्रथमपासूनच ती शत्रूच्या पन्नासहजार लोकांना भारी आहे, असें कसें समजावयाचें ? कदाचित् आपली ही कल्पना, आपला हा अभिमान फोल होण्याचा संभव नाहीं काय ? दुसरी गोष्ट, आप्तेष्टांच्या मदतीची. आप्तेष्टांनीं मदत देण्याची इच्छा प्रदर्शित केल्यास अथवा कांहींनीं वचनेंही दिल्यास त्याबद्दल त्यांचे आभार मानावे व 'सवडीप्रमाणें तुमची मदत घेऊं तोंपर्यंत तुमचा प्रेमाशीर्वादच आह्माला द्या' हें ह्मणणेंच योग्य. त्यांच्या वचनावर भिस्त ठेवून संकटांत उडी घालणें शहाणपणाचें होणार नाहीं. न जाणों प्रसंगीं त्यांना आपलें वचन पाळतां येणार नाहीं. अशा वेळीं प्रथमपासून त्यांच्यावर अवलंबून राहून वेळेवर त्यांनीं मदत न केल्यास त्यांना दोष देण्यांत अर्थ तो कोणता ? 'आपला आपण' हा न्यायच मुळीं हितावह व श्रेष्ठप्रतीचा आहे. सुखाचे वेळीं अगदीं अपरिचित माणसासही आपलासा करून त्यास आपल्या सुखाचा वांटेकरी करणें जितकें थोरपणाचें आहे तितकेंच संकटप्रसंगीं प्रत्यक्ष भावाच्या मदतीची अपेक्षा न करतां किंवा त्यास तोशीस पडूं न देतां त्या संकटास स्वतः तोंड देणें थोरपणाचें आहे. आपल्या यशापयशाचे आपले आपण मालक असतों. यश घेण्यास सर्व तयार असतात. अपयशाची नेहमीं चालढकल होत असते. या गोष्टी मनांत आणूनच मी आतांपर्यंत वागलों व पुढेंही वागेन." राणाजी थोडा वेळ थांबला. त्यानें हरदेवाच्या

मुद्रेकडे पाहिलें. राण्याचे ते उदात्त विचार ऐकून हरदेव अगदीं थक्क झाला. हरदेवाला स्वतःच्या ज्ञानाची मोठी घमेंड होती; पण राण्याचे ते दूरदर्शीपणाचे विचार ऐकतांच त्यास स्वतःच्या कोत्या मनाची लाज वाटूं लागली. तो ओशाळलेल्या चेहऱ्यानें पण आदरानें राण्याचे मुद्रेकडे पहात होता. राणा पुढें बोलूं लागला, "हरदेवा, नायक होण्यापेक्षां अनुयायी होणें फार चांगलें. तुला आश्चर्य वाटेल; पण निदान मीं जो जो विचार केला किंवा करीत आहें त्यावरून मला तर असें वाटतें. जगांत सर्वांवर आपला ताबा मिरविण्याकरितां चाललेली धडपड, नायक होण्याची मानवाची महत्वाकांक्षा चालू आहे, याचें कारण काय? गरीब बिचारे अज्ञान प्राणी! त्यांना नायक या शब्दाचा अर्थ, त्या पदावर चढल्यावर शिरावर येणारी जबाबदारी याची बरोबर कल्पना नसते. पण खरी स्थिति अशी आहे कीं, नायक हा सत्ताधारी व्यक्ति नसून आज्ञाधारी सेवक आहे. हरदेव हा फक्त राण्याचाच सेवक आहे. पण राणा हमीर आज आपल्या फौजेचा सेवक आहे. हरदेवा, कल्पना कर, चितोरगडावरून निसटून येण्यांत मला अपयश आलें असतें, आपण सर्व नाश पावलों असतों तर माझ्या शिपायांच्या बायका-पोरांनीं कोणाच्या नांवानें खडे फोडिले असते बरें? आज तुम्हीं आपले तनमन मला जें अर्पण केलें आहे, त्यांची काळजी वाहणें माझें काम नाहीं काय? मालदेवानें माझा अपमान केला. तेव्हां तुम्हाला व्यक्तिशः त्याचें वाईट वाटण्याचें कारण नाहीं. पण तुम्ही आपल्या नायकाचा अपमान तो आपला अपमान समजून आपला जीव धोक्यांत घालणार! अर्थात् तुमच्या या औदार्याचा विचार मला करावयास नको काय? अलबत केला पाहिजे. कल्पना कर, चितोरगडावरून निघून आल्याबरोबर पुनः आपण ससैन्य मालदेवावर चाल केली असती. मालदेवास दिल्लीकडून चांगली मदत आहे. तो या-वेळीं तिकडून मदत मागणारच. आपण जाऊन गडाला वेढा दिला असतां आणि मागून दिल्लीची फौज आपल्या पाठीवर आली असती म्हणजे आपण काय केलें असतें? केवळ नाशच आपल्या वांट्यास आला असता ना? तें अपयश कोणाकडे जाणार? केवळ माझ्या सेवेप्रीत्यर्थ प्राण

देणारा तूं प्राण देण्यास तयार झाल्यास तुझ्या प्राणाची किंमत मला आपल्या प्राणापेक्षांही जास्त समजावयास नको काय? तसें जर मीं नाहीं केलें तर मला अनुयायी तरी मिळतील काय? ज्याप्रमाणें आपल्या हातांतील तलवार आपण वेळेवर तिनें आपल्या उपयोगी पडावें ह्मणून नेहमीं पाजळून जपून ठेवतों, त्याचप्रमाणें तुमची गोष्ट. तुमची निगा-दास्त ठेवणें, तुमची योग्यता जाणणें हें माझें पहिलें कर्तव्य आहे. त्या-बाबतींत जर मीं हयगय केली, तुमचा पाहिजेल तसा व पाहिजेल त्या कामाला उपयोग करण्याचें मनांत आणिलें तर देवापुढें मी जाब काय द्यावयाचा?" पुनः राणाजी थांबला. हरदेव त्याचें हें भाषण ऐकून अगदीं मुग्ध झाला. तो अत्यंत आदरपूर्वक ह्मणाला, "आह्मी किती मूर्ख आहों! आपले असे विचार असतील हें आमच्या स्वप्नींही नव्हतें." राणाजी एकदम ह्मणाला, "बाबारे, तसें असलेंच पाहिजे. आपल्या नायकाविषयीं त्याच्या प्रत्येक अनुयायास एक प्रकारचें कोडें वाटलें पाहिजे. ईश्वराविषयीं आपण भीति बाळगतों, त्याला नमन करतों याचें कारण आपल्या मानवी बुद्धीला त्याचें कोडें आहे हेंच होय. प्रत्येक नायकानें आपलें खरें स्वरूप आपल्या अतिशय एकनिष्ठ सेवकासही न समजेल अशी खबरदारी घेतली पाहिजे. अगदीं तसा प्रसंगच येऊन ठेपल्यास एखाद्यास तात्पुरतें आपलें स्वरूप दाखविण्यास हरकत नाहीं. महाभारतांतील तो प्रसंग तुला आठवतो काय? भगवान् श्रीकृष्ण आपलें विश्वरूप अर्जुनास दाखविल्यानंतर काय ह्मणतात, 'मया प्रसन्नेन तवार्जु-नेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात्। तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मेत्वदन्येन न दृष्टपूर्वं.*' पुढें ते ह्मणतात 'अतिशय उग्र तप केल्यानेंही माझें हें विश्वस्वरूप पहावयास मिळत नाहीं.' श्रीकृष्णाच्या या वाणींत कांहींना कांहीं अर्थ आहे. अर्जुन त्यांचा अगदीं जिवश्च कंठश्च स्नेही; पण त्यास सुद्धां त्यांनीं प्रसंग पडल्यावेरीज आपलें रूप दाखविलें नाहीं. भगवानांनीं तरी अर्जुनाला स्वस्वरूप दाखविण्याचा प्रसंग कसा साधला? अर्जुनाच्या

---

* राणा हमीर चांगला संस्कृतज्ञ आणि विद्वान् होता असा ऐतिहासिक पुरावा आहे.

व्याकूळ स्थितींत प्रथम त्यास उपदेश केला. नंतर आपलें सामर्थ्य किती आहे हें वर्णन करून सांगितलें व अशाप्रकारें आपल्यावरील अर्जुनाचें प्रेम व भक्ति अगदीं कळसाला पोंचविल्यावर आपलें विराटस्वरूप त्यास दाखवून चकित केलें. देवाच्या या कृतीपासून नायक होऊं इच्छिणारानें किती तरी बोध घेण्यासारखा आहे–" पुनः राणा थांबला. हरदेव सारखा त्याचे मुद्रेकडे पाहून त्याचें भाषण लक्ष्यपूर्वक ऐकत होता. त्यावेळेपुरतें तरी त्यास राणाजी प्रत्यक्ष श्रीकृष्ण वाटत होता कीं काय कोण जाणें!

इतक्यांत दुरून त्यांचेकडे एक गुराखी येतांना दिसला. दोघांनाही आश्चर्य वाटलें. ते त्याकडे लक्ष्यपूर्वक पाहूं लागले. गुराखी जवळ आला व त्यानें एक चिटोरें राणाजीचे हातीं दिलें. "कोणी दिलें?" राण्यानें तें घेत विचारलें.

गुराखी ह्मणाला, "एक तोंड झांकलेला घोडेस्वार माझ्याजवळ येऊन ह्मणाला, "अमक्या झाडाखालीं असे असे दोघेजण बसले आहेत. त्यांपैकीं अमक्या मनुष्यास हें नेऊन दे." असें ह्मणून त्यानें मला कांहीं बक्षीस दिलें व तो निघून गेला."

गुराख्याचें उत्तर ऐकून त्या दोघांनाही मोठें नवल वाटलें. राणाजी त्या चिटोऱ्याकडे पाहात ह्मणाला, "हें मलाच द्यावें हें खरें का?"

गुराख्यानें होकारार्थीं मान हालविली. राण्यानें त्यास जाण्यास सांगितलें. तो गेल्यावर त्यानें तें चिटोरें उलगडून वाचलें. त्यांत असा मजकूर होता–

"मी एक तरुण अतिशय शूर असा रजपूत वीर आहें. मला आपलेजवळ सेवा करण्यास राहावयाचें आहें. पण आपला धनी आपल्यापेक्षांही शूर आहे कीं नाहीं हें मला पाहिलें पाहिजे. याकरितां आपल्याशीं तलवारीनें द्वंद्वयुद्ध खेळण्याची माझी इच्छा आहे. मला आपण हरविलेंत तर मी आपला जन्माचा दास होऊन राहीन. मीं आपणास हरविलें तर मी मुकाट्यानें आपल्या ठिकाणीं चालता होईन. आपला दास व्हावें ही माझी अत्युत्कट इच्छा असल्यामुळें

आज रात्रीं होणाऱ्या युद्धांत आपल्यालाच यश मिळावें अशी मी देवाला प्रार्थना करितों. युद्धाची वेळ चंद्रोदया-नंतर आणि स्थळ आपण आतां बसला आहांत तेंच. "

राणाजी आश्चर्यानें त्या चिटोऱ्याकडे पाहात उद्गारला, "किती चमत्कारिक पत्र ? "

* * * * * * * *

* * *

" मी हमीराचा वकील आहें " हें बनवीराचें तोंडचें वाक्य एकतांच मालदेव अगदीं स्तंभित झाला ! किती वेळ तसा तो आश्चर्यचकित मुद्रेनें आपल्या पुत्राच्या तोंडाकडे पाहात उभा होता. आपला पुत्र आणि तो आपल्या शत्रूचा वकील होऊन येतो. किती आश्चर्याची गोष्ट ! यापेक्षां बनबीरानें जर असें सांगितलें कीं, बाहेर आकाशांत दोन सूर्य उगवले आहेत, अथवा काल रात्रीं एकानें चंद्रावर वार केल्यामुळें त्याचीं चार शकलें झालीं आहेत, तर ह्या अद्भुत व अशक्य गोष्टीसुद्धां त्यास पटल्या असत्या व त्याबद्दल त्यास विशेष आश्चर्य वाटलें नसतें; कारण मद्य-प्राशनानंतर मालदेवानें अशाप्रकारचे चमत्कार पाहिल्याचें त्यास स्मरत होतें; पण त्या मद्यमदाच्या गुंगींतही बनबीर हमीराचा वकील झाला ही गोष्ट त्यास पटली नसती. असें असून प्रत्यक्ष बनबीरच आपल्या तोंडानें सांगतो कीं, " मी हमीराचा वकील आहें " याचा अर्थ काय ? ह्मणून तर तो आपल्या पुत्राकडे टक लाऊन पाहूं लागला. बनबीरानें मद्यप्राशन केलें असून त्यांतच तो कांहीं बरळत असावा असें त्यास वाटलें कीं काय कोण जाणें.

मालदेवाप्रमाणें बनबीरही त्याच्याकडे शांत चित्तानें पाहात उभा होता. बराच वेळ गेल्यानंतर मालदेवानें कोचावर अंग टाकीत विचारिलें, " बनबीर, एखादा मादक पदार्थ तर तूं आज घेतला नाहींस ना ? "

" कां बरें ? " बनबीरानें उभ्याउभ्याच आळ्या घालून प्रश्न केला.

" मग आतां तूं जें कांहीं सांगितलेंस, तें तूं अगदीं शुद्धींत असून बोललास असें मी समजूं तर ? "

" यांत काय संशय ? "

मालदेवानें ओष्ठदंश केला व ह्मटलें, " ह्मणजे माझ्या पोटच्या पोरांनींच माझ्या गळ्यावर विश्वासघाताची सुरी ठेविली ह्मणायची ? "

बनवीर कांहीं बोलला नाहीं, पण त्याच्या कपाळावरील आठ्यांची संख्या वाढली.

मालदेव पुढें ह्मणाला, " मग तूं आपलें काळें तोंड घेऊन येथें आलास कशाला ? "

" आपल्यास जागें करण्याला."

तुटलेल्या धनुष्याप्रमाणें मालदेव उसळला. त्यानें क्रुद्ध होऊन विचारिलें, " मला जागें करायला ? कां माझी विटंबना करायला ? "—

बनवीर शांतपणें मध्येंच ह्मणाला, " बाबा, आपण व्यर्थ संतापत आहां. माझें बोलणें आपण मुळींच ऐकून घेतलें नाहीं—"

" हं–सांग–सांग तर–आपल्या पित्याशीं कसकसा विश्वासघात केलास तो तरी मला ऐकूं दे." " वारंवार माझ्याविषयीं विश्वासघात हा शब्द आपण योजूं नये. मीं आपल्याशीं कसलाही विश्वासघात केला नाहीं—"

" अरे, प्रत्यक्ष शत्रूचें वकीलपत्र घेऊन तूं मजकडे आलास आणि पुन: ह्मणतोस—"

" बाबा, माझ्या बोलण्याचा आपण विपर्यास करितां आहां." बनवीर मध्येंच ह्मणाला, " ज्याप्रमाणें मी आपल्या कडूनें हमीराकडे पाळत ठेवण्यास गेलों होतों त्याचप्रमाणें त्याचेकडून कांहीं लाचलुचपत खाऊन आपणावर पाळत ठेवण्यास आलों आहें, असें जर आपणास वाटत असेल तर ती आपली समजूत अगदीं चुकीची आहे. राणाजीच्या हालचालीवर नजर ठेवण्याकरितां मी गेलों खरा, पण त्यानें मला ओळखलें. वास्तविक

राणाजीच्या ठिकाणीं दुसरा कोणी असता तर त्यानें मला मारून टाकलें असतें. निदान कैदेंत तर खास टाकलें असतें. शत्रूच्या गुप्त हेराची अशीच संभावना होते. पण राणाजीनें मला आदरानें आपल्याजवळ ठेऊन घेऊन सर्व सांगितलें. आपली तयारी कशी आहे, चितोरवर चाल करून आल्यास चितोर खालसा करण्यास किती थोडा वेळ लागेल हें त्यानें सर्व सांगितलें—"

" आणि तूं तें सर्व ऐकून घेतलेंस—तुला तें सर्व खरं वाटलें असेंच ना ?" मालदेवानें तिरस्कारानें पुढें झटलें. " छ्य:. काय चमत्कार आहे ! माझ्यामागें चांगलें राज्य सांभाळाल."

बनबीरानें झटलें, " विश्वासघातानें घेतलेला चितोर त्याच्या मालकास परत देण्याइतकी सद्बुद्धि देवानें आह्मांला दिली ह्मणजे पुष्कळ आहे."

विंचवाच्या डंखाप्रमाणें हें वाक्य मालदेवास लागलें. तो कांहीं बोलणार तोंच बनबीर पुढें बोलूं लागला, " बाबा, राण्याशीं आपण कसा व्यवहार केलात तो लक्षांत घ्या. मी त्याच्या हातांत सांपडूनही त्यानें मजबरोबर किती उदारपणाचें वर्तन केलें. त्याच्या ह्मणण्याप्रमाणें जर आपण चितोर त्याचे स्वाधीन कराल, तर तो तुह्माला कधींही परके मानणार नाहीं. मागील सर्व गोष्टी विसरून जाण्याइतका तो उदार आहे."

" चितोर मी त्यास परत देऊं ?"

" खुशीनें न दिल्यास सक्तीनें द्यावा लागेल. असें क्रोधानें माझ्याकडे पाहूं नका. हमीर आतां निर्बल नाहीं. सरळ मार्गानें तुह्मी न ऐकल्यास वाकड्या मार्गानें तो तुह्मास चितोर सोडण्यास भाग पाडील."

" मी जिवंत असेंपर्यंत हें शक्य नाहीं."

" ही दर्पोक्ती व्यर्थ आहे." बनबीर ह्मणाला. " आपण नेहमीं हक्क नसतां चितोरगडावर मजा माराव्या आणि त्याच्या वारसानें नेहमीं केळवाड्याच्या झोपडींत राहून व सातूचा तुकडा खाऊन आपला काळ कंठावा अशी ईश्वराची इच्छा असणें शक्य नाहीं."

ईश्वराची इच्छा नसेल, पण माझी इच्छा तशी आहे, समजलास. आणि म्हणूनच त्या पोरानें त्या खेड्यांत राहून, मिळाल्यास तुकडा खाऊन व आपल्या झोंपडीलाच वाडा समजून राहिलें पाहिजे. चितोर-गड घेण्याची महत्वाकांक्षा त्यानें सोडून दिली पाहिजे. बनबीर त्याच्या भाषणाला किंवा शौर्याला भाळला असेल. मालदेवास तसें वाटणें काल-त्रयीं शक्य नाहीं. ही गर्वोक्ती होत नसेल तर मी असें स्पष्ट म्हणूं शकतों कीं, हमीराच्या भाग्याचीं सूत्रें ईश्वरापेक्षां माझेच हातीं आहेत."

बनबीर तुच्छतेनें हंसला. त्यानें आपल्या खिशांतून एक लिपाफा मालदेवापुढें टाकीत म्हटलें, "तें पहान् मग आपला अभिमान किती पोकळ आहे तो पहा."

बनबीराचें तें हंसणें, लिपाफा देणें आणि नंतर वरील बोलणें—मालदेवास सर्वच चमत्कारिक वाटलें. त्यानें लिपाफा हातांत घेत म्हटलें, "याचा मतलब."

"मतलब काय असायचाय," बनबीर एकेक शब्द बोलत म्हणाला, "भुलैया मेर लोकांस जाऊन मिळाली असून तिनें आपल्याविरुद्ध बंड करण्याचा विचार केलेला दिसतो."

कधीं कधीं शब्दही विद्युत्पाताचें काम करीत असतात. ह्या म्हण-ण्याचा अनुभव घ्यावयाचा असेल तर या वेळीं मालदेवाकडे पाहावें. बनबीराचें तें अगदीं नवीन वर्तमान ऐकून तो जेथल्या तेथेंच अगदीं थिजल्यासारखा झाला. बनबीर त्याच्या मनस्थितीकडे लक्ष्य न देतां पुढें सांगूं लागला. "किल्ल्याखालीं आलों असतां मला एका मनुष्यानें लिपाफा दिला. मी त्या मनुष्यास आपल्याबरोबर घेऊन आलों आहें. आतां राण्यानें स्वतः जरी चाल केली नाहीं तरी तो मेर लोकांस मदत करणार आणि त्याच्याकडे आपण गुंतलों असतां तो ती संधि फुकट जाऊं देणार नाहीं. तेव्हां आपण हमीराशीं सलोखा करावा हेंच बरें." शेवटचें वाक्य ऐकेपर्यंत मालदेवाचें त्या बोलण्याकडे लक्ष्य होतें कीं नव्हतें कोण जाणें; पण अखेरचें वाक्य ऐकतांच तो म्हणाला, "पुनः असे शब्द तोंडावाटेंसुद्धां काढूं नकोस. त्या सापाला जो मीं डवचला

आहे, तें स्वतःची शक्ति त्याला चिरडण्य इतकी आहे ह्मणूनच. तुमचा उपदेश मला नको आहे. तुमच्या हातून—निदान तुझ्या हातून तरी—बनवीरावर कांहीं होणार नाहीं हें स्पष्ट दिसतें आहे. तो गंभीर काय करतो आहे तेंच पाहाणें आहे.” असें ह्मणून त्यानें लिफाफ्यास हात घातला. बनवीर मुकाट्यानें तेथून जाऊं लागला. मालदेव त्यास ह्मणाला. “तुला माझ्या नजरेखालीं राहिलें पाहिजे.” बनवीर तिरस्कारानें नाक चढवून तेथून निघून गेला.

तो गेल्यावर मालदेव बराच वेळ त्या लिफाफ्याकडे पाहात होता. बनवीरानें तो पूर्वींच फोडला होता. त्यांतील पत्र काढीत मालदेव पुटपुटला, “एकंदरींत मेर लोकांनीं बंड केलें ही गोष्ट खरी एकूण? आणि ती * * ( भुलैया ) त्यांना जाऊन मिळाली काय? ठीक आहे. तडाक्यांत सांपडल्यावर नाक—कान कापून धिंडका काढीन तरच खरा. पण मग मंगलेचें”—पत्र उलगडीत त्याकडे पाहून दचकून अरे! हें पत्र तर मंगलेचें दिसतें हो, तिचेंच अक्षर—”

अगदीं उतावीळपणानें मालदेवानें तें पत्र वाचण्यास सुरवात केली.

बाबा, आपली त्या दिवशींची भेटच अखेरची व्हावी ना?” पहिलें वाक्य वाचतांच मालदेव आश्चर्यानें डोळे फाडून त्या पत्राकडे पाहात ह्मणाला, “एँ! याचा काय मतलब?” पुनः तो वाचूं लागला.

> दुर्दैव, दुसरें काय! तुमच्या संकटांत तुह्माला कांहींच मदत होऊं नये याबद्दल फार वाईट वाटतें. ( आहे, हिला कांहीं आहे बापाची चाड. ) “पण बाबा, आपण त्यांच्याशीं सलोखा करा ना?—” पत्रावर तिरस्कारानें बोटें मारून “कारस्थांनीं एकमत केलें आहे कीं काय? ह्मणे सलोखा करा ना” रागानें पत्र फाडीत “जा ह्मणावं कारटे, मर जा कुठं असशील तेथें. बापाचा शाप घेऊन मर. अरे, पण पत्र सर्व वाचलें पाहिजे.” फाडलेलें पत्र जुळवून वाचतो. ) “बाबा, मीं भुलैयाला शासन करण्यास गेलें, पण उलट तिच्या तडाक्यांतच सांपडलें. तिनें थापा देऊन

मेर लोकांच्या कळपांत आणून सोडिलें. येथें त्यांच्या मुख्यानें मला पकडून कैदेंत टाकलें आहे आणि आपला सूड घेण्याकरितां ह्मणून ते माझा—बाबा, आतां तुमची कुठली भेट? ते वध करणार आहेत. तुमची मदत येईपर्यंत मी जिवंत राहीन कीं नाहीं कोणाला ठाऊक. हें पत्र तरी तुह्मांला कसें मिळेल ? मला जेवण आणून देणाऱ्या एका मोलकरणीनें तें आपणाकडे पोंचतें करण्याचें वचन दिलें आहे. ती आपलें वचन पाळेल कीं नाहीं कोणास माहीत ?—"

" असें, एकूण मंगलाबाई—मेर लोकांकडे आहेत. कदाचित् आतां ती मेलीही असेल. बरें झालें. आमच्या जांवयांना ही बातमी पाठविली पाहिजे. " असें ह्मणून तो हंसला. मंगलेच्या पत्राचा त्याच्या मनावर कांहींही परिणाम झालेला दिसला नाहीं. त्यानें तें पत्र फाडून फेंकून दिलें. नंतर महालांत इकडे तिकडे फिरत तो ह्मणाला, " आतां आपला हात प्रथम मेर लोकांनाच दाखविला पाहिजे. पण राण्याचें काय करावयाचें ? ( विचार करून ) हां—सलोख्याचें बोलणें लावावयाचें. मेर लोकांचा नायनाट होईपर्यंत राण्याला सलोख्याच्या तुकड्यावर घोळविला पाहिजे. असेंच. त्याशिवाय गत्यंतर नाहीं." असें ह्मणून त्यानें आनंदानें हात चोळले. पुनः तो बोलूं लागला, " आतां रणभीर तेवढा आला पाहिजे. त्याच्यावांचून बराचसा खोळंबा आहे. बनवीराचें समजलें. मंगलाबाईचेंही कळून चुकलें. हे तिसरे दिवटे काय करतात हें पाहाणें आहे—" असें तो ह्मणतो न ह्मणतो तोंच त्यानें बाहेरच्या बाजूस रणभीराचा आवाज ऐकिला. " एँ ! रणभीरही आलेला दिसतो " असें ह्मणत ह्मणत तो बाहेर आला. बाहेरच्या दालनांत रणभीर बनवीराशीं कांहीं बोलत उभा होता. मालदेव दारांत येतो तोंच त्याचे कानावर हें वाक्य पडलें. आवाज रणभीराचा होता. " दिल्लीकडून मदत—मुळींच मिळत नाहीं ! "

---

* *       * *       * *

* *       * *       * *

त्या चिटोऱ्यांत काय मजकूर आहे तें कळण्याविषयीं हरदेवास प्रथमपासूनच विलक्षण उत्सुकता होती. त्यांत राणाजींचें शेवटचें वाक्य ऐकून तर ती फार वाढली. आपली ही इच्छा राणाजी पूर्ण केल्याखेरीज राहणार नाहींत. कारण आज ते खुशींत आहेत. यापूर्वी कधींही न सांगितलेले विचार जर ते आज खुल्या दिलानें सांगत आहेत तर चिटोऱ्यांतील मजकूर सांगण्यास हरकत ती कोणती? असा विचार करून तो अतिशय उत्सुकतेनें आपल्या धन्याचे मुद्रेकडे पहात होता. राणाजीनें तें वाचल्यानंतर पुनः त्याची घडी केली व दूरवर शून्यदृष्टीनें पहात स्वारी विचारांत गुंग झाली. हरदेव मोठ्या आशेनें, कधीं त्या घडी केलेल्या चिटोऱ्याकडे व कधीं आपल्या मालकाच्या मुद्रेकडे, पहात होता. इतक्यांत राणाजीचा कांहीं विचार ठरला. त्यानें मान हालवून हरदेवाकडे पाहून ह्मटलें, "हं, तेव्हां तुला मी काय सांगत होतों बरं?–"

हरदेवाची मोठी निराशा झाली! राणाजी वर सांगितलेलें वाक्य इतक्या कांहीं शांतवृत्तीनें बोलला कीं, जणूं काय, त्यांच्या संभाषणांत त्यांस कसलाही व्यत्यय आला नव्हता. इतकेंच काय पण हरदेव त्या चिटोऱ्याकडे अधाशीपणानें पहातो आहे, हें जाणूनही त्यानें तें चिटोरें मुकाट्यानें आपल्या खिशांत ठेविलें. तें ठेवतांना निदान "या चिटोऱ्यांतील मजकूर तुला सांगण्यासारखा नाहीं.' असें तरी त्यानें ह्मणावयाचें होतें, पण तेवढें बोलण्याची तसदी त्यानें घेतली नाहीं. आपल्या खिशांतील नेहमीं असणारी एखादी वस्तु ज्याप्रमाणें आपण सहज कांहीं कामाला काढून पुनः खिशांत ठेवतों त्याचप्रमाणें राणाजीनें तें चिटोरें खिशांत ठेवतांना केलें. त्यामुळें हरदेवाचें मन बरेंच अस्वस्थ झालें. राणाजीचें लक्ष याकडे होतें कीं नाहीं कोण जाणे. तो बोलूं लागला, "तेव्हां समजलेंना मी असा कां वागतों तो. आतां तूं ह्मणशील कीं, पुढें आपला काय विचार आहे? माझें पुढचें सर्व धोरण ठरून गेलें असल्यामुळें व त्याप्रमाणें सर्व घडत जाणार अशी पक्की खात्री वाटत असल्या-

मुळें तें तुझ्याजवळ बोलून दाखविण्यास हरकत नाहीं. तुह्मी नको ह्मणत असतांही मी चितोरगडावर गेलों. त्यामुळें माझें इतर कांहीं नुकसान झालें असलें तरी प्रसंगीं आपण मालदेवास खात्रीनें पराजीत करूं एवढें मला कळून चुकलें. हा फायदा कांहीं लहान नाहीं. आतां एवढी खात्री पटूनही मी मालदेवावर एकदम चाल कां केली नाहीं? बाबारे, ही राजनीति आहे. आपल्या शत्रूचे शत्रु ते आपले मित्र मानावे असा नियम आहे. त्याप्रमाणें यावेळीं मालदेवाचा एखादा शत्रु जागृत होईल तर किती बहार होईल असें मला वाटूं लागलें व त्याप्रमाणें मी कांहीं प्रयत्नांत होतों तोंच मेर लोकांनीं पुनः बंड केलें. बोल, आतां अशा स्थितींत मालदेव लौकर वठणीवर येईल कीं, यापूर्वीं आपण एकदम जाऊन त्याच्यावर धाड घातली असती तर तो नरम येता? पुनः यावर तूं अशी शंका घेशील कीं, मेर लोकांनीं बंड करून बरेच दिवस लोटले असूनही अद्याप चितोरगडाकडे चाल करून जाण्याची माझी तयारी कां नाहीं? यालाही माझें असें उत्तर आहे कीं, मालदेवाकडून कोणीना कोणी हेर आपल्या पाळतीवर येण्याचा संभव आहे असें मला वाटत होतें व त्याप्रमाणें—"

"बनवीर पकडला गेला—" हरदेव मध्येंच ह्मणाला. राजनीतीचें हें विकट कोडें राणाजींचे तोंडून सुटत असतांना ऐकून तो चितोऱ्याची बात क्षणभर विसरला ह्मणण्यास हरकत नाहीं. तो पुढें ह्मणाला, "पण महाराज, आपण त्यास सोडायचें नव्हतें. आपल्या पुत्राला सोडविण्याकरितां मालदेवानें आपल्या अटी कबूल केल्या असत्या—"

यावर राणाजी हंसला. तो ह्मणाला, "विश्वासघातकी मालदेव अशानें नरम येईल असें तुला वाटतें काय? असें असेल. मालदेवाविषयीं तुला बरोबर कल्पना झाली नाहीं. मालदेवाच्या गळ्यांत बरोबर अडकेल असा फांस टाकावयाचा ह्मणजे त्याच्या पुत्राला पुनः त्याचेकडे पाठविणें हाच होय—"

"तें कसें काय?" हरदेवानें आश्चर्यानें विचारिलें.

“ हरदेव, तूं स्वतःला अनुभवी समजतोस, पण राजनीतिमध्यें तूं अद्याप बराच कच्चा आहेस असें ह्मणावें लागतें. बनवीरला मोठेपणाच कां इष्ट तें ऐक. मालदेव माझा नाश करूं इच्छितो, पण तो उघडपणें नाहीं. हळू हळू न कळतां त्यानें माझ्या गळ्याला तात लावण्याचा विचार केला आहे. अर्थात् हें त्यास फार दूरवर विचार करून करावें लागत आहे. तो आपल्यामा धूर्त समजून मला भोळा समजत आहे, हें त्यांतल्यात्यांत विशेष आहे. त्याचा पहिला डाव हुकल्यावर तो अगदीं निराश झाला असला पाहिजे. पण पुनः त्यानें आपलें जाळें विणण्यास सुरवात केली. बनवीराला त्यानें मजकडे पाठविलें. गुप्तपणें तो कांहीं बातमी आणील अशी त्यास मोठी आशा असली पाहिजे. पण इकडे बनवीरास मीं ओळखिलें. तो ‘ आतां आपलें काय होतें आणि काय नाहीं ’ या विचारानें अगदीं घाबरून गेला. पण मीं त्यास उदारपणानें वागविलें. तो जी गुप्त बातमी ह्मणून काढावयास आला होता ती त्यास मीं होऊन दिली. त्याचा परिणाम असा झाला कीं, बनवीर माझ्या उदारपणाचा गुलाम झाला. आतां तो बापाकडे पोंचल्यावर माझ्या तर्फेनेंच वकिली करणार यांत मुळींच शंका नाहीं. त्या वेळीं—प्रत्यक्ष आपला पुत्रच शत्रूची स्तुति करतो हें ऐकून—मालदेवाची काय स्थिति होईल? त्यामुळें त्यास अशीही शंका येणार नाहीं काय कीं, प्रत्यक्ष बनवीर तर शत्रूला नाहींना मिळणार? ही शंका त्याचे मनांत आली कीं, पितापुत्र परस्परांविषयीं साशंक झालेच पाहिजेत. बस्स्! स्वजनाविषयीं कुशंका मनांत येणें ह्मणजे त्या कुलाचा नाश जवळ येत चालला ह्मणून समजावें. बनवीराला मीं परत पाठविला, तर मालदेवानें मजला उडवून देण्याकरितां तयार केलेल्या दारूच्या तळघरावर मीं हा विस्तवच ठेविला आहे असें समज. त्यामुळें जो धडाका उसळणार त्यांत मालदेवाचीच आहुति पडणार! कां, माझी ही कल्पना बरोबर आहे कीं नाहीं ? ” हरदेवाला मान डोलवणें भाग होतें. राणाजीच्या राजनीतिकुशलतेपुढें आपल्या ज्ञानाचा, अनुभवाचा, दूरदर्शित्वाचा कांहीं पाड नाहीं हें त्यास तेव्हांच समजून चुकलें. “ मग आतां मालदेवाशीं लढण्याचा प्रसंग येणार नाहीं असें समजावयाचें काय ? ” हरदेवानें प्रश्न केला. या प्रश्नांत थोडी व्याजोक्तीची छटा होती. राणाजींनें

ती तेव्हांच ताडली. तो ह्मणाला, " त्याचें कांहीं नक्की सांगतां येणार नाहीं. पण आतां पुढें माझी कल्पना अशी आहे कीं, मालदेव प्रथम मेर लोकांना दडपण्याचा प्रयत्न करील व त्या कार्यास वेळ सांपडण्याकरितां तो माझ्याशीं तहाची वाटाघाट सुरू करील."

ती आपण फेटाळून लावणार. होय ना ? " हरदेवानें प्रश्न केला. आपण राण्याचे मनांतील भाव अगदीं बरोबर ताडला असें त्यास वाटलें. पण राणाजीच्या हंसण्यानें त्याचा विरस झाला. राणाजी ह्मणाला—"

" नाहीं. त्याचें उलट मीही तहाचें बोलणें लावणार—"

" तहांत चितोरगड परत मिळेल असें वाटतें काय ? "

" अरे, तहाच्या अटी जमविण्यापर्यंत जातो कोण ? "

" ह्मणजे काय ? "

" ह्मणजे काय काय ? " राणाजी हंसत हंसत ह्मणाला–" तह लावण्याचें मालदेवाचें ज्याप्रमाणें नुसतें सोंग त्याचप्रमाणें माझेंही. माझ्या या बोलण्याचा तुला सहज उलगडा पडणार नाहीं. आतां मालदेवाकडून वकील आला कीं, आपण ससैन्य चितोरगडाकडे रवाना व्हावयाचें आणि तहाचें बोलणें अगदीं शांतपणें सुरू करायचें. " पण तहाच्या बोलण्याकरितां ससैन्य जाणें मालदेवास शंकास्पद वाटणार नाहीं काय?"

"छे:, उलट त्यास आनंद होईल. दिल्लीकडील सैन्य आपल्या पाठीवर आणण्याचा तो विचार करील. तोंपर्यंत आपण मेर लोकांवर मालदेवानें कोणास पाठविलें, किती सैन्यांसह पाठविलें याचा तपास करावयाचा. बनवीराविषयीं तो साशंक असल्यामुळें मेर लोकांवर तो रणभीरास पाठवील. बनवीर गडावर राहिला तरी तोही बापाच्या वर्तनामुळें चिडल्या कारणानें युद्धांतून अलग रहील. तेव्हां राहिला फक्त एकटा मालदेव; त्यास मेर लोकांचा बंदोबस्त झाल्याखेरीज आणि दिल्लीकडील मदत मिळाल्याखेरीज माझ्याशीं युद्ध करण्याचें धाडस करवणार नाहीं. अशी संधि येऊन ठेपली कीं, आपल्यास मदत देणाऱ्या ठाकरांना दिल्लीच्या फौजेच्या तोंडावर ठेऊन मालदेवाला चेपावयाचा ! त्या ठाकरांचीं वचनें पोकळ आहेत कीं भरीव हें त्या वेळीं सहज समजणारें आहे.

त्यांतून सगळ्यांनींच माघार घेतल्यास पाहतां येईल. तेवढी गोष्ट आपण दैवावर सोंपवूं–" किंवा दिल्लीकडून फौज न मिळेल अशी तजवीज करूं."

"आपली राजनीति अपूर्व आहे !"

"ह्या दगडापासून मी शिकलों. आतां तरी समजलें ना मी एकान्तांत येऊन काय करीत असतों तें ?" राणाजी हंसत हंसत ह्मणाला व तो उठला. त्यानें हरदेवास जाण्यास सुचविलें. हरदेवही मुकाट्यानें आपल्या घोड्याकडे गेला. चिटोऱ्याची बाब तो अजिबात विसरला. तो घोड्यावर बसला व बराच दूर गेला. जातां जातां त्यानें चिटोरें आणून दिलेल्या गुराख्यास पाहिलें व त्यास तो प्रकार आठवला. परत राणाजीकडे येऊन त्या चिटोऱ्यांत काय आहे तें विचारावें, असें एकवार त्याचे मनांत आलें व त्यानें आपला घोडा वळविला, पण पुनः त्यास वाटलें कदाचित् राणाजीस हें आवडणार नाहीं. त्यानें कांहीं विचार केला व तो त्या गुराख्याजवळ गेला. त्यानें त्या गुराख्यास त्या चिटोऱ्यासंबंधीं व तें देणारासंबंधीं कांहीं उलट सुलट प्रश्न विचारिले. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस निराश होऊन तो केळवाड्याकडे वळला. त्या चिटोऱ्यांत कांहीं चमत्कारिक आहे, असें त्यास राण्याच्या त्या उद्गारावरून वाटलें; पण तें काय असावें याचा त्यास कांहीं उलगडा पडला नाहीं. मात्र त्यास राणाजीच्या शांत मनःस्थितीचें कौतुक वाटलें. असो.

इकडे राणाजी हरदेव निघून गेल्यानंतर त्याचेकडे पाहात उभा होता. त्यानें त्याची सर्व हालचाल पाहिली व त्याचें कारणही पण त्यास समजलें. तो हंसला व स्वगत ह्मणाला, "स्वारीला चिटोऱ्याविषयीं बरीच चटक लागलेली दिसते. पण हें त्यास आजच कळतां उपयोगीं नाहीं. नाहीं तर तो रात्रीं मजबरोबर येण्याचा हट्ट घेतल्यावांचून राहणार नाहीं. एकदां आमचे हे भावी सेवक कोण तें कळूं द्या. मग पाहूं." असें ह्मणून त्यानें तें चिटोरें पुनः बाहेर काढलें व वाचलें. अगदीं लक्ष्यपूर्वक वाचलें. जणूं काय, त्या पत्रावरून पत्र लिहिणारी व्यक्ति कशी असेल याचाच तो विचार करीत होता. विचार करितां करितां त्यास कांहीं वाटलें. पुनः त्यानें त्या पत्राकडे निरखून पाहिलें. तो पुटपुटला, "पत्राचें अक्षर ओळखीचें वाटतें."

**    **    **

*

**    **    **

चंद्राच्या वैभवाला उतरती कळा लागण्याचे दिवस सुरू असल्यामुळें तो सृष्टीमुख पाहण्यास रोज थोडा तरी उशीर करी. त्यामुळें आज ( राण्याची संकेत रात्र ) चंद्रोदय मध्यान्हीचे पुढें होणार होता. त्यामुळें राणाजीला त्वरा करण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. त्याचे सर्व व्यवहार रोजच्याप्रमाणेंच सुरू होते. फरक इतकाच, आज त्याचें मन मात्र तितकें स्वस्थ नव्हतें. याचें कारण त्या पत्राचें अक्षर त्यास ओळखीचें वाटूनही आपण तें पूर्वी कोठें, कसें आणि केव्हां पाहिलें, याचें त्यास मुळींच स्मरण होईना. वेळ सांपडतांच त्यानें पुनः पुनः तें चिटोरें काढून त्याकडे लक्ष्यपूर्वक पाहावें व आपल्या स्मरणशक्तीस ताण द्यावा. त्या पत्राविषयीं त्यास घोंटाळा पडण्याचें आणखी एक कारण होतें. राणाजी स्वतः जरी निष्कपटी होता तरी त्यानें मालदेवासारख्याशीं राजनीतीचे फांसे टाकण्यास प्रारंभ केल्यामुळें त्यास प्रत्येक गोष्टीविषयीं शंका घेणें जरूर होतें व त्याप्रमाणें तो अलीकडे या पंधरा दिवसांत प्रत्येक गोष्ट जपून विचारपूर्वक करीत असे. अशा स्थितींत तें द्वंद्वयुद्धाचें आव्हानपत्र येणें ह्मणजे त्यांत कांहीं कपटाचा अंश असणें उघड आहे. पण राणाजीचें मन मात्र त्या पत्राविषयीं तशी शंका घेईना. उलट या पत्रापासून, या द्वंद्वयुद्धापासून आपला कांहीं तरी फायदा होणार आहे. या पत्रांत कपट असें कांहीं नाहीं, असेंच त्याच्या मनानें घेतलें व त्यामुळें त्याचें त्यालाच त्या गोष्टीचें नवल वाटूं लागून तो घोंटाळ्यांत पडला होता. ही त्याची मनःस्थिति फक्त हरदेवाचे लक्ष्यांत आली होती व याला कारण तें चिटोरें असलें पाहिजे हेंही तो जाणून होता. तोही आपल्यापरी कांहीं विचार करीत होता.,

**वाचकहो, ही पहा पूर्व दिशेला शुभ्र छटा येऊं लागली. तेव्हां राणाजीचे अगोदर आपण संकेतस्थानीं जाऊं. ही पहा कोणी एक व्यक्ति**

कोणाची तरी वाट पाहात उभी आहे. युद्धाचे संकेतस्थानीं येऊन तिला बराच वेळ झाला असावा, असें दिसत होतें. कारण त्या वृक्षाखालील जागा अगदीं स्वच्छ केलेली दिसत होती. राणाजीचें युद्ध-शास्त्र गुरूंना—पाषाण-खंडांला—दूर नेऊन एके ठिकाणीं ठेविलें होतें. हें काम त्या व्यक्तीचेंच. वृक्षाखालून केळवाड्याकडील दिशेला जमीन उंच उंच होत जाऊन एका टेंकडीचें स्वरूप तिला आलें होतें. या टेंकडीच्या पलीकडेच केळवाडा गांव बसलें होतें. टेंकडीवरून या वृक्षापर्यंत लहान लहान खुरट्या झुडुपांखेरीज कांहीं नसल्यामुळें टेंकडीच्या माथ्यापर्यंतचा सर्व प्रदेश एकदम दृष्टीक्षेपांत येत होता. हळू हळू धुंद झालेल्या पूर्व क्षितिजावर पिंवळट क्षयी चंद्रबिंब दिसूं लागलें ! या वेळीं त्याचा प्रकाश ह्मणण्या-सारख्या नसल्यामुळें आसमंतांतील प्रदेश खुलून दिसण्याऐवजीं जास्तच भेसूर दिसूं लागला. या वेळीं मध्यरात्र उलटून गेली होती. जिकडे तिकडे शांत होतें. एखादे वेळीं कसला तरी आवाज होऊन ती शांतता भंग होत होती. आमची ती व्यक्ति टेंकडीच्या माथ्याकडे लक्ष लावून पाहात होती. चंद्रबिंब वर वर येत चाललें होतें तसतसें त्यास एक प्रकारचें तेज येत चाललें होतें. जणूं काय, आपला क्षयी देह पाहून आपला उपहास करण्यास कोणी मानव जागृत नाहीं असें पाहून चंद्रास आनंदच होत होता. हळू हळू टेंकडीच्या माथ्यावर कांहीं हालचाल दिसली. प्रथम शिरस्त्राणासारखें कांहीं, नंतर बाहुपर्यंतचा भाग, नंतर पोटापर्यंतचा भाग, नंतर घोड्याचा पृष्ठ भाग. असें होतां होतां, एक घोडेस्वार स्पष्ट दिसूं लागला. तो घोडेस्वार मोठ्या झपाट्यानें आपला घोडा पिटाळीत होता. तें पाहतांच या व्यक्तीनें आपल्या घोड्यावरून खालीं उडी मारिली व घोडा दूर एका झुडपाला बांधिला. या व्यक्तीनें खालपासून वरपर्यंत युद्धाचे वेळचा पोषाख केला होता. चेहऱ्याचें रक्षण करण्याकरितां नेत्रां-खेरीज सर्व तोंडभर लोखंडी जाळी धारण केली होती. अंगांत चिलखत होतें. एकंदर शरीरयष्टीवरून तो किंचित् लहान पण बाणेदार दिसत होता. आपल्या घोड्याचे पाठीवर थाप देऊन तो स्वतःच तयार केलेल्या छोट्या रणांगणावर येऊन पोंचतो न पोंचतो तोंच घोडा पिटाळीत येणारा स्वार तेथें येऊन पोंचला. आतां चांदणें अगदीं स्वच्छ पडलें

होतें. त्यामुळें प्रत्येक वस्तूचें चांगलें ज्ञान होण्यास हरकत नव्हती. तो स्वार त्या बाणेदार व्यक्तीकडे पाहात घोड्यावरून खालीं उडी टाकणार तोंच त्या व्यक्तीनें एकदम पुढें होऊन विचारिलें, " कोण, हरदेव ? आपण इथें कां ? " त्या व्यक्तीचा तो प्रश्न ऐकतांच हरदेव–तो स्वार हरदेवच होता–चपापला. " तिक–राणाजींनीं–आपली रवानगी केली काय ? " त्या व्यक्तीनें पुनः प्रश्न केला. हरदेव प्रथम तर गोंधळलाच, पण पुढें त्यानें आपली मनःस्थिति सांवरली. तो ह्मणाला, " मी हरदेव नव्हे–राणाजी हमीर ह्मणतात तोच मी." ती बाणेदार व्यक्ति उपहासानें मोठ्यांदा हंसली ! तें हंसणें ऐकून हरदेव जास्तच गोंधळला. आणि त्यास गोंधळण्यास, आश्चर्यचकित होण्यास कारणें तरी किती होतीं ? प्रथम त्या व्यक्तीनें आपण युद्धाचे पोषाखांत आणि तोही राणाजींचा–असतां ओळखलें कसें ? दुसरें त्या व्यक्तीचा आवाजही त्याला कसासाच वाटला. तिसरें, आपलें नांवही हिला काय माहीत ? अशा प्रकारें विचार करीत करीतच त्यानें घोड्याखालीं उडी टाकिली. ती व्यक्ति पुढें बोलूं लागली. " आपण त्याचा पोषाख करून आलां आहां. पण अशानें मी फसणार नाहीं. मला त्यांच्याखेरीज इतराशीं युद्ध कर्तव्य नाहीं."

राणाजींची तशी इच्छा असली तरी ? "

" ह्मणजे, आपण राणाजी नव्हे हें खरं ना ? "

" होय–तें आतां मी कशाला लपवूं ?—"

" मग हरदेव महाराज, सांगा पाहूं–आपण जे येथें आलां आहां ते राणाजींचे सांगण्यावरूनच काय ? " हरदेव गप्प बसला.

" नाहीं ना ?–ह्मणा नाहीं. आपल्यावरील युद्ध दुसऱ्यावर टाळण्याइतके ते ह्मणजे राणाजी भित्रे खास नाहींत. आपण मात्र आपली राजनिष्ठा दाखविण्याचे मिषानें त्यांच्या कीर्तीला कलंक लागेल असें वर्तन केलेंत—"

" तें कसें काय ? " हरदेवानें दचकून विचारिलें.

" तें कसें काय ? माझें पत्र राणाजींनीं आपणास दाखविलें होतें काय? मुळींच नाहीं. औषध तें त्यांच्या पश्चात् पाहिलेत. बरें, पाहिलेत तें पाहिलेत.

आपण त्यांना स्पष्ट मी तुमच्याबरोबर येतों असें विचारावयास पाहिजे होतें, पण तें पहा–" ती व्यक्ति एकदम टेंकडीकडे बोट दाखवून ह्मणाली, "तें तेथें काय दिसतें आहे? कोणी तरी घोडेस्वार दिसतो आहे ना? तें कोण असावें?"

"राणाजी–" हरदेवानें चाचरत ह्मटलें.

"मग हरदेव–" ती व्यक्ति ह्मणाली, "चढा तर घोड्यावर आणि एकदम येथून चालते व्हा. नाहीं तर राणाजींच्या आज्ञेविरुद्ध आपण येथें आलां आहां हें त्यास समजल्यास ते आपल्यास कांहीं तरी कडक शासन करतील." हरदेवानें थोडासा कांहीं विचार केला. आणि त्याचे लक्ष्यांत सर्व कांहीं आलें. तो मुकाट्यानें पुनः घोड्यावर स्वार झाला व त्यानें एका बाजूच्या वाटेनें आपला घोडा पिटाळला. तो हाकेच्या टप्प्यांतून गेलेला पाहतांच ती बाणेदार व्यक्ति मोठ्यांदा हंसली. ती ह्मणाली, "हरदेव महाराज, थोड्या वेळापुरतें आपणास महाराजाजवळून दूर सारलेंच पाहिजे. हें एक बरें निमित्त झालें. ह्यः ह्यः ह्यः. दैव अनुकूल असलें ह्मणजे असें कांहीं तरी घडतें." हें तिचें बोलणें पुरें होतें न होतें तोंच तो दुसरा स्वार तेथें येऊन पोंचला. त्यानें प्रथम कांहीं न बोलतां घोड्यावरून खालीं उडी टाकिली व घोडा दूर एका झुडपास बांधून तो त्या व्यक्तीजवळ आला. तो जवळ येतांच या व्यक्तीनें लवून मुजरा करीत ह्मटलें, "राणाजींचा विजय असो!" आवाज ऐकतांच राणाजी चपापला. थोडा वेळ तो त्या युद्धाच्या परिधानानें भूषित अशा व्यक्तीकडे पाहात उभा राहिला! थोडा वेळ परस्पर परस्परांकडे पाहात उभे होते. नंतर राणाजीनें आदरपूर्वक विचारिलें, "वीरपुरुषा, मला येण्यास उशीर तर नाहीं लागला?"

ती व्यक्ति हंसली व ह्मणाली, "माझें चिटोरें आपणाजवळ आत्तां आहे काय?"

तो प्रश्न ऐकून राणाजीस आश्चर्य वाटलें. त्यानें आपल्या कमरपट्याकडे हात नेत ह्मटलें, "असेल कदाचित्–पण आतां त्याचें कारण काय?"

" कारण असें–" ती व्यक्ति ह्मणाली, " त्या पत्रांत मीं आपल्यास एकट्यालाच बोलाविलें होतें, कीं बरोबर कोणी आपला एकनिष्ठ सेवकही आणावा असें लिहिलें होतें ? "

" ह्मणजे ? ह्या प्रश्नाचा मी मतलब नाहीं समजलों."

" विशेष कांहीं नाहीं. आपला एक सेवक आत्तां येथें आला होता–"

" काय ह्मटलेंत ? माझा एक नोकर येथें आला होता ?–" राणाजी क्रोधयुक्त वाणीनें ह्मणाला. " हें शक्यच नाहीं."

" कां बरें, इतकें त्यांत अशक्य काय आहे ? "

"पण माझी आज्ञा तशी नव्हती."

" पण एखाद्या एकनिष्ठ सेवकाला आपण एकटें जाणें धोक्याचें वाटून–"

" मी इकडे येणार आहें हें कोणालाही माहीत नाहीं–" राणाजीचा क्रोध वाढत चालला.

त्या व्यक्तीनें तें जाणलें असावें. ती ह्मणाली, " आपल्याला क्रोध आलेला दिसतो. पण त्याचें इतकें लक्ष्यांत आणूं नये. सर्वच वेळा नोकर आपली आज्ञा मानतातच असें नाहीं."

" मी याचा मतलब नाहीं समजत. मला तरी असले नोकर मुळींच आवडत नाहींत. माझी अवज्ञा करणारास मी नेहमीं कडक शासन करितों."

" मग मला आश्चर्य वाटतें, तो येथें आला कसा ? "

" पण तो कोण ? " राणाजीस कांहीं शंका येऊं लागली.

" माझें चिटोरें आलेलें कोणास माहीत नव्हतें ना ? " या प्रश्नांत नकार होता तरी त्याचा स्वर ' हें माझें चिटोरें कोणाला तरी माहीत असलेंच पाहिजे " असा होता.

राणाजीनें थोडा वेळ विचार करून ह्मटलें, " होय–माझ्या एका नोकराला तें माहीत होतें; पण त्यांत काय मजकूर आहे हें त्यास माहीत नव्हतें, आणि माहीत असलें तरी तो माझ्या आज्ञेखेरीज इकडे कधींही येणार नाहीं. याची मला पक्की खात्री आहे."

यावर ती व्यक्ति किंचित उपहासानें हंसली. ती ह्मणाली—"पुष्कळ वेळां असं होतं, आपण एखाद्या मनुष्याविषयीं कल्पना करतो एक आणि त्या मनुष्याचं अंतरंग असतं वेगळंच."

"ह्मणजे काय ? हरदेव येथें आला होता असें मी समजूं काय ?"

"तें काय मला माहीत ह्मणा, पण मला या वेळीं माझ्या एका मित्राच्या बहिणीची आठवण होते. असं झालं, त्या मुलीच्या नवऱ्यावर कांहीं आलं संकट, त्यांत आपल्या नवऱ्यास सहाय्य करावं अशी अगदीं तिची मनापासून इच्छा. नवऱ्याला ती आवडत नव्हती ह्मणा वा दुसऱ्या कांहीं कारणामुळें ह्मणा—नवऱ्याला वाटलं आपल्या घाताला हीच मदत करते आहे. झालं, तेव्हांपासून त्या नवऱ्यानं तिला टाकली आहे. असं आहे." त्या व्यक्तीच्या या बोलण्याकडे राणाजीचें लक्ष होतें कीं नव्हतें कोण जाणें ? त्यानें विचारिलें, "हा आपण कसला दृष्टान्त दिलांत ?

"ती व्यक्ति हंसून ह्मणाली, "आपल्याला तो पटत नसल्यास माझें कांहीं ह्मणणें नाहीं."

राणाजीनें विचार करून प्रश्न केला—"आलेल्या नोकरानें पोषाख वगैरे कसा काय केला होता ?"

"मला वाटतें त्यानें आपलेंच चिलखत—नव्हे सर्वच पोषाख—घातला होता"

"मग तो हरदेवच तर. कांहीं कारणामुळें मींच त्यास आपला पोषाख दिला होता." नंतर राणाजीनें प्रश्न केला; "पण काय हो, त्यानें घातलेला पोषाख माझाच होता हें कशावरून ?"

यावर ती व्यक्ति कांहीं बोलली. तिला उत्तर दे[illegible] कीं काय कोण जाणें.

थोडा वेळ राणाजी स्वस्थ बसला. नंतर तो ह्मणाला, "वीर पुरुषा, तुझ्या सांगण्यावर मला अविश्वास करवत नाहीं; पण त्याबरोबर हरदेवानें माझी आज्ञा मोडली असेल असेंही वाटत नाहीं. तेव्हां तुला स्पष्ट

सांगतों कीं, जर तुझें ह्मणणें अक्षरशः खरें असेल तर हरदेवाला मी शासन करीनच; पण तुझ्या सांगण्यामध्यें जर कांहीं लबाडी असेल तर त्याबद्दल तुला कडक शासन भोगावें लागेल."

ती व्यक्ति लवून ह्मणाली, " आपली आज्ञा मान्य आहे."

थोडा वेळ कोणीं कांहीं बोललें नाहीं. आतां चंद्रकांती पूर्वींपेक्षांही स्वच्छ आणि शान्तीदायक झाली होती. राणाजीनें एकवार चंद्राकडे पाहिलें. नंतर त्यानें त्या व्यक्तीस विचारिलें, " युद्धाला सुरुवात करावयाची ना ? " नंतर तो खालीं जमिनीकडे पाहून ह्मणाला, " अरे वा ! तुह्मीं ही भूमि मुद्दाम तयार केलेली दिसते. असें ह्मणून त्यानें आपली तरवार म्यानासह पट्ट्यांतून काढून हातांत घेतली. त्या व्यक्तीनेंही तसेंच केलें. राणाजीनें तलवार म्यानांतून काढून म्यान जवळच्या एका दगडावर ठेविलें. त्याच्या प्रतिपक्ष्यानेंही तेंच केलें. नंतर दोघेही तयार केलेल्या भूमीच्या मध्यभागीं येऊन उभे राहिले. थोडा वेळ दोघेही परस्परांकडे पाहात उभे होते. राण्यानें विचारिलें, " प्राणावर बेतली तरी युद्ध चालू ठेवावयाचें काय ? "

" नाहीं—हें युद्ध प्राण घेण्याचे हेतूनें मुळींच नाहीं. युद्धाचें आव्हान मजकडून आहे. अर्थात् माझी खरी इच्छा ह्मणजे आपली युद्धकला अजमावून पाहावी एवढीच. मला दमल्यासारखें वाटल्यास मी प्रांजलपणें ती गोष्ट कबूल करीन." या बोलण्यांत इतका कांहीं सरळपणा होता कीं, राणाजी अगदीं मुग्ध झाला.तो ह्मणाला,"मग मीही पण हार खाल्ल्यास ती गोष्ट करीन." पुनः थोडा वेळ दोघींही परस्परांकडे पाहात उभीं होतीं. जणूं काय दोघांनाही युद्धाला सुरुवात करण्याची पंचाईत पडलेली दिसत होती.

ती व्यक्ति ह्मणाली,"मीं आपणाला युद्धाला बोलाविलें खरें पण युद्धाला मन धजावत नाहीं. असें कां व्हावें बरें ? " त्या व्यक्तीचें तें बोलणें ऐकून राणाजीला मोठें नवल वाटलें. कारण त्यालाही असेंच कांहींसें वाटत होतें. तो ह्मणाला, " मग खरें बोलायचें तर मलाही हें द्वंद्वयुद्ध करावेंसें वाटत नाहीं. मी कांहीं स्वभावतःच भित्रा नाहीं." पुनः दोघींही परस्परां-

कडे पाहूं लागलीं. काय आश्चर्य आहे? राणाजीला युद्धाचा प्रसंग ह्मणजे किती आनंददायक! पण आज त्याचें मन युद्धाला ह्मणे धजावत नव्हतें.

ती व्यक्ति ह्मणाली, "आपल्या सेवेंत राहावें व आपली योग्यता पाहण्यापेक्षां माझें युद्धकौशल्य आपणास दाखवावें याच हेतूनें मीं आपणास चिठ्ठी लिहिलें. आपण माझी परीक्षा घेतल्याखेरीज कांहीं नोकरीस ठेवणार नाहीं. सध्यांचा प्रसंग तसाच जरा नाजूक आहे."

राणाजीला त्याच्या बोलण्यापासून आश्चर्य वाटूं लागलें. ही व्यक्ति कोण, आपल्यासंबंधीं हिला इतकी माहिती कुठली, आणि हिच्याशीं युद्धप्रसंग करण्यांत आपणास शंका का वाटावी? इत्यादि किती तरी विचार त्याचे मनांत येऊन त्यास घोटाळ्यांत घालूं लागले. त्या तशा स्थितींत त्यास पंधरा दिवसांपूर्वीं चितोरगडावरील भुलैयाच्या महालांतील घडलेल्या प्रसंगाची आठवण झाली. पण त्या वेळीं त्याचें मन साशंक होतें.

बराच वेळ गेल्यावर राणाजी ह्मणाला, "आपण आपला खुलासेवार परिचय दिल्यास आपल्या योग्यतेप्रमाणें आह्माकडे आपणास स्थान मिळेल."

"तिथेंच तर सगळें अडतें आहे. मी स्वतःच्या नांवाखेरीज आपणास कांहींएक सांगणार नाहीं. एवढेंच काय, पण मी आपल्या सैन्यांत पाहिजेल तितके दिवस राहीन अथवा मध्येंच चालतां होईन. मर्जी वाटल्यास पुनः येईन. मात्र आपली इमानें इतबारें सेवा करण्याचा खात्रीनें प्रयत्न करीन."

राणाजी त्याचें बोलणें लक्ष्यपूर्वक ऐकत होता; पण त्यावरून त्यास कांहीं बोध होण्याऐवजीं उलटा जास्त घोंटाळा मात्र पडला. तो गोंधळून ह्मणाला, "मला आपल्या बोलण्याचा कांहीं उलगडा पडत नाहीं."

"नाहींच पडायचा. आणि उलगडा पडूं नये." ती व्यक्ति ठासून ह्मणाली, "अशीच माझीही पण इच्छा आहे. विजयादशमीला आपली विजयपताका चितोरावर फडकली कीं, माझें किंवा सर्व गोष्टींचें कोडें आपणास सुटेल." "ह्मणजे माझ्या मनांतील विचार–माझी प्रतिज्ञा–

आपणास कशी कळली ? " राणाजीनें एकदम विचारिलें. " आपल्या हृदयांत मीं प्रवेश केला—किंवा माझ्या हृदयांत आपण प्रवेश केला—असेल, पण आपली ती इच्छा मला समजली खरी. आणि त्याप्रमाणें घडून येईल."

राणाजी अगदीं भांबावून गेला. आपल्यासमोर असलेली व्यक्ति पिशाच्च तर नाहीं ? अशीही त्यास शंका आली. ती व्यक्ति ह्मणाली, "महाराज, आपण निदान एकदोन पट्ट्याचे हात तरी खेळूं या. तेवढ्यावरून परस्परांस परस्परांच्या शौर्याची तरी ओळख होईल आणि एकदां तशी ओळख झाली ह्मणजे मग शंकेला जागा राहणार नाहीं." असें ह्मणून तिनें आपल्या तलवारीची धार पुसली. राणाजीला अद्याप कशाचाही उलगडा पडला नव्हता. तरी त्यानें ते सर्व विचार बाजूला सारून तो युद्धाला तयार झाला !

दोघांच्याही तलवारी चंद्रप्रकाशांत चमकल्या. त्यांनीं पवित्रा केला व युद्धास सुरुवात झाली. सुमारें अर्धा तास एक दुसऱ्यास आपलें असि-चातुर्य दाखवीत होता ! त्या अपरिचित व्यक्तीचें युद्धकलानैपुण्य पाहून राणाजी अगदीं मुग्ध झाला. त्यानें एकदम आपली तरवार आटोपती घेऊन ह्मटलें, " शाबास, असा वीर जर माझ्या पक्षाला मिळेल तर काय बहार होईल ? "

" मग—" ती व्यक्ति आपली तलवार राणाजीच्या पायाजवळ टाकून ह्मणाली, " आजपासून ही मीं आपली तलवार आपल्या सेवेला वाहिली."

आपलें नांव काय बरें ? " राणाजीनें आदरपूर्वक विचारिलें.

ती व्यक्ति हंसली व उत्तरली, " माझें नांव हमीरदास ! "

" हमीरदास—? " राणाजी आश्चर्यानें ह्मणाला, " मला नाहीं हें खरें वाटत."

हमीरदास शांतपणें ह्मणाला, " वीरांगाना किंवा वीर पुरुष खोटें बोलत नसतात."

---

* *　　* *　　* *
　*　　　*
* *　　* *　　* *

राणाजी हमीरदासाचें तें वाक्य ऐकून किंचित् ओशाळला. वीर कसा असावा अथवा वीर पुरुष कोणाला ह्मणावें हें तो पूर्णपणें जाणून होता. हमीरदास वीर आहे हें त्यानें आतांच त्यास प्रत्यक्ष दर्शविलें होतें. असें असतां तो खोटें नांव सांगील हें शक्यच नव्हतें. पण कसेंही असलें तरी राणाजीस तें नांव ऐकून त्यांत कांहीं रहस्य आहे असें वाटलें व ह्मणूनच त्यानें आपली शंका प्रदर्शित केली, पण हमीरदासानें ती एका वाक्यानें हाणून पाडिली! त्यावर राणाजी काय बोलणार? तो मुकाट्यानें त्याच्या जाळीनें झांकलेल्या मुद्रेकडे पाहूं लागला. चितोरगडावरही त्यास गोंधळल्यासारखें झालें होतें; पण त्यावेळीं क्रोध व तिरस्कार यांची त्यांत भर व आजच्या रहस्यामुळें त्याचे मनांत कौतुक, प्रेम व आदर यांचा उद्भव झाला होता.

हमीरदासानेंही थोडा वेळ विचार केला व ह्मटलें, " मग माझी सेवा घेण्याचें मान्य आहे ना ?" असें ह्मणत त्यानें राणाजीचे पायाशीं ठेवलेली आपली तलवार उचलली. राणाजीला काय उत्तर द्यावें हेंच सुचेना. तेव्हां हमीरदासच बोलूं लागला, " आपल्याला माझ्याविषयीं बरेंच आश्चर्य वाटेल; कारण मला आपल्याला कांहीं अटी सांगावयाच्या आहेत. सेवकानें धन्याला अटी घालणें जरा चमत्कारिक तर खरेंच, पण मला तसें केलेंच पाहिजे. त्या अटी मान्य करणें प्रथमदर्शनीं आपणास शंकास्पद वाटेल; परंतु त्या आपण मान्य केल्यास व मला सेवेंत घेतल्यास माझी एकनिष्ठ सेवा पाहून आपणास मजपासून समाधानच होईल." हमीरदासाच्या बोलण्यांत असा कांहीं एकप्रकारचा सरळपणा आणि मोहकपणा होता कीं, राणाजीला त्याचें ह्मणणें मान्य करावेसें वाटूं लागलें. त्यानें विचारिलें, " आपल्या अशा कोणत्या अटी आहेत बरें?"

हमीरदास सांगूं लागला, " पहिली अट, मी केव्हांही आणि कोणत्याही स्थितींत सध्यां आपण पाहतां आहां याच वेशांत राहणार त्यामुळें माझी मुद्रा आपणास स्पष्ट तऱ्हेनें केव्हांही दिसणार नाहीं. तेव्हां ती

पाहण्याविषयीं आपण केव्हांही उत्कंठित होऊं नये. कारण त्यापासून आपणास कांहीही फायदा नाहीं. " काय चमत्कारिक अट !

" माझी दुसरी अट—माझी भोजनाची वगैरे व्यवस्था मी कोठेंही करीन. त्याचीही आपण चौकशी करूं नये. त्याकरितां मी फक्त दोन तास आपणापासून गैरहजर राहीन. माझी तिसरी अट, चितोरगडावर आपलें निशाण विजयादशमीला फडकलेंच पाहिजे अशी माझी महत्वाकांक्षा आहे. तेव्हां त्या खटपटींतही मी असणार. पण मी काय काय प्रयत्न करणार हें आपणास कांहीं काळपर्यंत कळविणार नाहीं व तेवढ्याकरितां मी पाहिजेल त्यावेळीं आपल्या फौजेंतून निघून जाईन. तर तशी मला परवानगी असावी. बस्स, एवढ्याच माझी अटी. त्या आपण विश्वासपूर्वक पाळल्या पाहिजेत. मी आपल्याशीं आपल्याच पायाची शपथ घेऊन सांगतों कीं, मनःपूर्वक एकनिष्ठ राहीन. पण माझ्या या ह्मणण्याची सत्यता चितोरगड हस्तगत झाल्याशिवाय कळणार नाहीं. "

राणाजीला त्यास काय उत्तर द्यावें हेंच समजेना. हमीरदासाविषयीं त्यास इतका मोह उत्पन्न झाला कीं, त्यानें एकदम ह्मटलें, " आपल्या अटी मान्य आहेत. "

" मग चलायचं तर आतां केळवाड्यास." हमीरदास आनंदानें ह्मणाला. नंतर त्यानें आपलें म्यान उचलून आपली तलवार त्यांत घालून पट्ट्यांत अडकविली. राणाजीनेंही त्याचें अनुकरण केलें. नंतर दोघेही घोड्यावर बसले व केळवाड्यास चालते झाले. मार्गानें कोणी कांहीं बोललें नाहीं. असो.

केळवाड्यास पोंचतांच राणाजीनें हमीरदासास एक लहानगी खोली राहण्यास दिली व तो स्वतः आपल्या शयनस्थानाकडे वळला. तेथें गेल्यावर तो बिछान्यावर पडला खरा, पण त्यास निद्रा येइना. हमीरदासाच्या चमत्कारिक अटी त्याचे मनांत घोळत होत्या व आपण त्या मान्य करून त्यास ठेवून घेतलें हें बरें झालें काय, असेंच त्याचे मनांत येत होतें. त्यानें पुष्कळ पुष्कळ विचार केला. तो ह्मणाला, " कांहीं असो, या माणसाविषयीं आपणास भूरळ पडली आहे खरी. अवघ्या पंधरा दिवसांची

गोष्ट. आमचा हा अविचारीपणा आह्मास घातक न होवो ह्मणजे झालें." असा अखेरचा विचार करून तो स्वस्थ पडला व पहाटेची वेळ होत आल्यामुळें खिडकींतून येणाऱ्या गार वाऱ्यानें त्याचे डोळ्यावर झांपड पडत चालली.

सूर्योदय झाल्यानंतर पुष्कळ वेळानें राणा हमीर जागा झाला. तो उठून बाहेर आला तों दाराचे तोंडाशींच हमीरदास व हरदेव परस्परां-कडे तोंड करून मुकाट्यानें उभे होते. हरदेव साशंक नजरेनें हमीर-दासाकडे पाहात होता. हरदेवाला पाहींपर्यंत राणाजी हरदेवानें आपली अवज्ञा केली ही गोष्ट साफ विसरला होता. आणि हमीरदासाच्या रह-स्यांत ती गोष्ट कोणाचे लक्ष्यांत राहणार? पण हरदेवाला पाहतांच त्यास गतरात्रींतील हमीरदासाच्या पहिल्या भाषणप्रसंगाची आठवण झाली. तावडतोब त्यानें हरदेवाकडे कठोर नजरेनें पाहात विचारिलें, " हरदेव, काल तूं मध्यान्हीच्या नंतर कोठें होतास? गस्तीचें काम मीं तुझ्यावर सोंपविलें होतें. तें बरोबर केलेंस काय?" यावर हरदेव उत्तर देण्यास कांहीं तरी गुटमुळेल असें राणाजीस (कदाचित् हमीरदासासही) वाटलें; पण हरदेवानें एकदम ह्मटलें, " कां बरें?" राणाजीस आश्चर्य वाटलें. त्यानें साशंक नजरेनें एकवार हमीरदासाकडे पाहून हरदेवास ह्मटलें, " मग काम चोख केलेंस? त्यांत कांहीं कसूर नाहींना झाली?"

" नाहीं—मुळींच नाहीं."

" ह्मणजे याचा काय मतलब?" राणाजी आळीपाळीनें हरदेव आणि हमीरदास यांचेकडे पाहात ह्मणाला.

" मग खरें कोण बोलतें?"

अखेरचें वाक्य ऐकतांच हरदेव दचकला. हमीरदासाच्या वृत्तींत मुळींच फरक नव्हता. राणाजी त्याचेकडे पाहून ह्मणाला, " काय हो, हरदेव तर खरें बोलतो?"

" ते खोटें बोलतात हें मीं आपणास कधीं सांगितलें होतें?" हमीर-दासानें उत्तर दिलें.

राणाजी चकित झाला. त्याला तें उपरोधिक बोलणें मुळींच समजलें नाहीं. तो ह्मणाला, " त्यानें गस्तीचें काम केलें आहे. "

हमीरदास निष्काळजीपणें ह्मणाला, " केलें असेल. "

राणाजी ओष्ठदंश करून ह्मणाला, " वीर पुरुषा, तुझ्याविषयीं मला एकप्रकारची भुरळ पडली आहे हें खास. पण तूं अशाप्रकारें चाळवण्या दाखविशील तर ध्यानांत असूं दे, माझ्याशीं गांठ आहे. "

हमीरदास नम्र झाला. तो ह्मणाला, " महाराज, आपण विनाकारण मला दूषण देतां आहां. हरदेव खोटें बोलतात किंवा त्यांनीं कालगस्तीचें काम बरोबर केलें नाहीं, असें मीं आपणास केव्हां सांगितलें? माझें ह्मणणें एवढेंच कीं, काल रात्रीं ते आपल्या संकेतस्थानीं आले होते. " हमीरदासाचें तें शांत व सरळ उत्तर ऐकून राणाजीस आपली चूक पदरांत घेणें भाग पडलें. तो हरदेवाकडे वळून ह्मणाला, " काय हरदेव, काल रात्रीं चंद्रोदयाचे सुमारास तूं कोठें होतास? "

हरदेवाची मुद्रा काळवंडली. तें पाहतांच राणाजी क्रोधानें ह्मणाला, " मग काय मी असें समजूं, हरदेवानें माझी अवज्ञा केली? "

हरदेवानें लाजेनें मान खालीं घातली. तो वर न पाहतांच ह्मणाला, " महाराजांच्या संरक्षणाविषयीं साशंक होऊनच मीं तें चिटोरें पाहण्याचें धाडस केलें–"

" आणि माझी आज्ञा नसतां तूं तिकडे गेलास असेंच ना? हरदेव, जा. एक महिनाभर तूं माझ्या फौजेंतून चालता हो. " हरदेवाचे डोळे पांढरे होण्याची वेळ आली. त्यानें क्षमायाचना करण्याचा प्रयत्न केला तोंच राणाजी त्यास ह्मणाला, " नाहीं. या अपराधाची मुळींच क्षमा होणार नाहीं. शिक्षा अमलांत आलीच पाहिजे. जाव–एक क्षणभरही तूं केळवाड्यास थांबूं नकोस. "

" मग मीं कोठें जावें बरें? " मला येथेंच कैदेंत ठेवानात? " हरदेवानें गयावया करून ह्मटलें.

" कैदेंत ठेवण्यासारखा अपराध असता तर मीं कैदेंत ठेविलें असतें. महिनाभर तूं माझ्या नजरेसमोर नसावेंस अशी माझी इच्छा आहे. "

" हरदेव मुकाट्यानें उभा राहिला. त्यानें विचारिलें, " महिन्या-नंतर तरी मला पायाजवळ येण्याची आज्ञा आहे ना ? "

राणाजीनें कांहीं विचार केला व ह्मटलें, " हो—महिन्यानें तूं मला येऊन भेट. तोंपर्यंत माझ्या नजरेस पडतां उपयोगी नाहीं. "

हरदेवानें ह्मटलें, " आपली आज्ञा मान्य आहे. माझ्यावर एवढी अवकृपा होईल असें मला वाटलें नव्हतें; पण त्याचें कारण मी समजलों. ( यावेळीं त्यानें हमीरदासाकडे पाहिलें. ) कांहीं हरकत नाहीं. झालेल्या अपराधाबद्दल ही कठोर शिक्षा मला भोगलीच पाहिजे; पण महाराज, सावध असा बरें?" असें ह्मणुन तो तेथून जाऊं लागला. राणाजी त्यास थांबवून ह्मणाला, " या मनुष्याविषयीं तुला कांहीं संशय आला आहे हें मी जाणून आहें व याचेवर तुझा थोडाबहुत दांतही असावा. पण या महिन्यांत तूं याचेविषयीं कांहीं मनांत आणूं नयेस. "

" ही अट आपण न घातलीत तर बरें होईल. "

" नाहीं. ही अट अवश्य पाहिजे. "

" आपली मर्जी. " असें ह्मणून हरदेव मुकाट्यानें निघून गेला.

राणाजीनें हरदेवाचे जागेवर हमीरदासाची योजना केली. तें काम देतांना त्यानें हमीरदासास बजावलें. " आपल्या अटी मान्य करूनही आपणास मी महत्वाची जागा देत आहें. ध्यानांत ठेवा, कपटाचा थोडासा डाव दिसला तर आपले हाल कुत्राही खाणार नाहीं. " हमीरदासानें एकनिष्ठपणाची पुनः शपथ वाहिली.

यानंतर कांहीं दिवस लोटले ! हमीरदास त्याच पोषाखांत आपल्यावर सोंपविलेली कामगिरी अगदीं यथायोग्य बजावीत होता. राणाजीनें त्याच्यावर अगदीं बारकाईनें पाळत ठेविली होती, पण त्यामुळें हमीरदासाविषयीं कसलाही संशय न वाटतां त्याचेविषयीं राणाजीचे मनांत उत्पन्न झालेला मोह मात्र वाढला.

———

**　　**　　**

*　*　*

**　　**　　**

आतां आपण थोडा वेळ चितोरगडावर जाऊं.

" दिल्लीकडून मदत मिळत नाहीं. " हें रणभीराच्या तोंडचें वाक्य ऐकतांच मालदेव चकित झाला. आपण ऐकलें तें अगदीं बरोबर ऐकलें कीं, त्यांत कांहीं चूक आहे याची त्यास भ्रांत पडली व म्हणून तो एकदम पुढें होऊन म्हणाला, " काय—काय म्हणालास ? दिल्लीकडून मदत मिळत नाहीं ? कां बरें ? " रणभीर आपल्या पित्याकडे तोंड वळवून म्हणाला, " बाबा, राणा हमीर आपण समजतों तितका भोळा नाहीं. त्यानें तिकडेही आपलें राजसूत्र लाविलें आहे. "

मालदेवाला त्याच्या बोलण्याचा कांहीं उलगडा पडला नाहीं. तो आश्चर्यानें त्याचे मुद्रेकडे पाहूं लागला. तें पाहून रणभीर म्हणाला, " चला आपण आंत चला, मी आपल्यास सर्व सांगतों. "

मालदेव पुनः महालांत येण्यास वळला. रणभीर त्याचे मागोमाग येऊं लागला. मालदेवाची बनबीरावर नजर होती. तो वळून म्हणाला, " बनबीर, चालू राजकारणांत तुझा घेणें धोक्याचें आहे. तूं आंत येऊं नकोस. " बनबीर कपाळाला आंठ्या घालून म्हणाला, " मी स्वतःच आपल्या कपटकारस्थानांत पडूं इच्छित नाहीं. आपण निश्चिंत असावें. "

त्यांचा तो संवाद ऐकून रणभीर चकित झाला. तो एकवार आपल्या पित्याकडे व एकवार आपल्या भावाकडे वळून म्हणाला, " म्हणजे, याचा अर्थ काय ? घरांतच दुफळी ?— "

बनबीर तेथून जात म्हणाला, " दुर्दैवानें बाबांना माझा भलताच संशय आला आहे. " तो तेथून निघून गेला. रणभीरानें आपल्या पित्यास विचारिलें, " बाबा, ही काय भानगड आहे ? "

मालदेवानें त्यास महालांत नेलें आणि बनबीराविषयीं घडलेली एकंदर हकीगत* सांगितली. रणभीरानें ती लक्ष्यपूर्वक ऐकून घेतली व

झटलें, " बाबा, स्पष्ट बोलतों याची क्षमा असूं द्या; पण बनबीराला दुखविण्यांत आपण चुकतां आहां. " मालदेवाची स्थिति यावेळीं मोठी चमत्कारिक होती. कोणीकडूनही आपल्यास हितावह असें कांहीं घडत नाहीं हें पाहतांच तो अगदीं भांबावून गेला होता व त्यास प्रत्येका-विषयीं संशय येऊं लागला होता. रणभीरही आपल्यास दोष देतो हें पाहून त्यास त्याचाही संशय आला. तो एकदम ओरडून ह्मणाला, "बाहेर-च्यांनीं व घरच्यांनीं दोघांनींही एकदम गळा कापण्यास सुरुवात केली, हें ठीकच आहे. " रणभीराला आपल्या पित्याचा स्वभाव माहीत होता. त्यानें शांतपणें झटलें, " बाबा, यावेळीं क्रोधाचा उपयोग नसून शांत विचाराचा आहे. आपण जर शांतपणें ऐकून घ्याल, विचार कराल तर आलेल्या प्रसंगांतून निभावून जाण्यासारखा कांहीं उपायही शोधतां येईल. केवळ आपसाआपसांत चडफडल्यानें आणि त्रागा केल्यानें काम होणार नाहीं. आह्मी आपलीं मुलें आहोंत. आपल्या पित्याचें अहित चिंतण्या-इतके कृतघ्न आह्मी आहोंत काय ? यापूर्वीं आपल्यास आह्मीं कोण त्याही कार्यांत मदत केली नाहीं काय ? त्याकडे आपण लक्ष न देतां केवळ वर वर पाहून जर तुह्मी आह्मांला निष्कारण दोष देऊं लागलां तर आपल्याला मदत करण्यास आह्मांस हुरूप कसा येईल ?" रणभीराचें हें शांत भाषण चांगलें परिणामकारक झालें. त्यामुळें मालदेव बराच शांत झाला. तो ह्मणाला, " रणभीर कांहीं ह्मण—पण यावेळीं माझ्या मनानें ठाव सोडल्यासारखें झालें आहे. वाटतें चितोरगड आपल्या हातां-तून जाणार—"

" छ्यः बाबा ! " रणभीर दर्पोक्तीनें ह्मणाला, " रणभीरा बनबीरा-सारखे दोन सिंहासारखे पुत्र जिवंत असतां आपल्या मनांत ही कल्पना ? छी—छी—आपण ही कल्पना अगदीं टाकून द्या. "

रणभीराचें हें उत्साहपूर्ण भाषण ऐकतांच मालदेव त्याच्या पाठीवर प्रेमानें थाप मारून ह्मणाला, " शाबास, तूं माझा पुत्र खरा !

रणभीर ह्मणाला, " बनबीराला आपण वाकूताडन केलें नसतें तर त्यानेंही आपणास असेंच सांगितलें असतें. "

मालदेव ह्मणाला, "तें जाऊंदे–तूं दिल्लीकडील काय झालें तें सांग."

" नाहीं–प्रथम बनबीराच्या वर्तनाचा मला खुलासा केला पाहिजे. कारण पुनः त्याचे हातून क्षुल्लक चूक झाली तरी आपण त्याचेकडे वांकड्या नजरेनें पाहणार–"

"नाहीं रे–मी समजलों. मी माझीच चुक समजतों. तूं दिल्लीकडील-"

" दिल्लीकडचें कांहीं विशेष नाहीं. मी दिल्लीला पोंचतांच प्रथम कांहीं दिवस बादशाहानें माझी भेटच घेतली नाहीं–"

" मग त्यासंबंधीं तूं इकडे कांहींच कळविलें नाहींस? "

" ह्मणजे ? " रणभीरानें आश्चर्यानें विचारिलें, " माझें पत्र आपणास पोंचलें नाहीं ? "

" नाहीं–हां, पण समजलों–हें त्या केळवाड्याचे पोराचें काम. "

रणभीर विचार करीत ह्मणाला, " असें दिसतें. तें असो. बादशाहानें भेटीनंतर सांगितलें, सध्यां फौज पाठवितां येत नाहीं. अंतस्थ मला असें कळलें कीं, राणा हमीरानें आंतून कांहीं जरब दिलेली दिसते."

मालदेव आश्चर्यानें उसळून ह्मणाला, " बादशाहास जरब! त्या पोरानें बादशाहास जरब दिली ?" रणभीर गंभीरपणें ह्मणाला, "राण्याची तयारी चांगली दिसते. आणि ह्मणूनच मी आपणास ह्मणतों कीं, क्रोधानें भलतें सलतें न करितां आपण विचार केला पाहिजे. "

" आतां विचार कसला बोडक्याचा करावयाचा ? " मालदेव त्रासून ह्मणाला, " मेर लोकांनीं पुनः बंड केलें, ती * * ( भुलैया ) त्यांना जाऊन मिळाली. मंगळा त्यांचे कैदेंत पडली. दिल्लीकडून मदत मिळत नाहीं. शत्रु बळावत चालला. आतां कसला विचार करूं ह्मणतोस ? "

" मग त्रागा करून काय फायदा होणार ? संताप केल्यानें उपाय सांपडेल काय ? "

" मग मी काय करूं ह्मणतोस ? बनबीराप्रमाणें तुमचेंही ह्मणणें आहे काय कीं, त्या कारट्याला बोलावून त्याचे हातीं चितोरगड देऊं? "

" आपण शांत व्हाल तर सर्व कांहीं होईल. "

" मी झालों शांत—बोला काय तें ? "

" आतां यावेळीं कांहीं नाहीं. मेर लोकांच्या बंडाविषयीं लखोटा घेऊन आलेल्या स्वारास ' मदत लौकरच पाठवितों ' असें लिहून रवाना करा. मागून आपण पाहूं काय करायचें तें. " असें ह्मणून रणभीर तेथून एकदम निघून गेला.

या गोष्टीला सुमारें आठ दिवस लोटले. या आठ दिवसांत दोघा पितापुत्रांचें—बनबीर आपण होऊनच अलग राहूं लागला होता—सारखेंच खलबत चाललें होतें. रणभीर आपल्या पित्याला ह्मणाला, " सध्यांचा प्रसंग नाजूक तर खराच, पण आपल्या दोन शत्रूंमध्यें परस्पर आपण कलागत लावून दिल्यास आपलें काम होण्यासारखें आहे. राणा हमीर बोलण्यांत फार मिठा आहे. आपली छाप लोकावर कशी बसवावी, हें तो चांगलें जाणतो आहे. तेव्हां बनबीराला दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तो अद्याप लहान आहे. शत्रूचा हेर उघडकीला आला, कीं त्यास देहान्त प्रायश्चित द्यावयाचें एवढीच राजनीति तो जाणतो. त्यामुळें राणा हमीर त्यास उदार वाटून तो त्याच्यासारखें बोलूं लागला. त्यांत शंका घेण्याचें कारण नाहीं. दिल्लीकडील मदत आपणास मिळेल, ही आशा व्यर्थ आहे. एक तर पातशाहा आहे अजारी. त्यानें पूर्वी केलेल्या जुलुमाला लोक अतिशय त्रासले आहेत. तेव्हां त्याच्या हुकुमाला कोण जुमानतो ? राण्यानें जें आतांच डोकें वर काढलें त्याचें कारण हेंच होय. त्याच्या दृष्टीनें त्यानें कयास बांधला आहे तो सर्व ठीक आहे. आपण मात्र एकजुटीनें राहिलों व किल्ल्यावर फितुर न झाला तर त्यास पालथा घालूं. आतां मेर लोक हे आपले शत्रु—निदान मुख्य शत्रु—नव्हेत असें समजून त्यांना हातीं धरून त्यांचा शह राणा हमीरास दिला कीं आपलें काम भागलें. राणा हमीर व मेर एक आहेत, असें आपण धरूं याच नको. असें आपण समजूं लागलों व त्याची वदंता बाहेर फुटली कीं, ते एक नसल्यास एक होतील आणि आपल्यास जड जाईल. तेव्हां आतां मी मेर लोकांवर जातों आणि त्यांच्या मुख्याशीं तहाचें बोलणें लावून त्यांना आपलेसें करण्याची खटपट करतों. तेवढ्यानें ते बधले तर ठीकच आहे. कदाचित् ते शेफार-

ण्याचाही संभव आहे; पण मी त्यांना आणतों वठणीवर. आपण बनवीराच्या मदतीनें चितोड सांभाळा ह्मणजे झालें. आपण मेर लोकांवर जाल अशी राणाजीची समजूत आहे. आपण येथें राहिल्यानें त्यास सहजच जरब बसेल." अशा प्रकारचें त्यांचें आणखीही पुष्कळ खलबत झालें. दुसरे दिवशीं रणभीर मेर लोकांवर जाणार तोंच एक चमत्कार घडला ! त्या संध्याकाळीं एकाएकीं मंगलकुमारी गडावर आली. तिच्या एकंदर स्थितीवरून ती बराच लांबचा प्रवास करून आलेली दिसली. तिला थोडी विश्रांति मिळतांच मालदेवानें तिला तिची खरी हकीकत विचारिली. रणभीर बनवीरही तेथें होतेच. मंगलकुमारी दुःखानें सांगूं लागली, "आपल्याला माझें पत्र पोंचलें असेलच. पत्र लिहिते वेळीं कांहीं मला मी पुनः चितोरगडावर येईन अशी आशा नव्हती. मला जेवण आणणाऱ्या मोलकरणीला मीं वश करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण व्यर्थ. ती ह्मणाली, 'मीं तुमचं पत्र पोंचवलं; तुम्हाला सोडवणं माझ्या हातून कसं होणार ? तुह्मी रोज माझ्यामागं उगीच कटकट लावूं नका. कुणी ऐकलं तर माझ्या पोटावर पाय येतील." अखेरीस मीं मग कपटाचाच डाव खेळण्याचा निश्चय केला. एके दिवशीं संधि साधून मीं मोलकरणीवर झडप घातली. तिच्या तोंडांत बोळा कोंबून तिला बांधून घातली व तिचे कपडे करून मी तेथून निसटलें. आजचा पांचवा दिवस सुटका होऊन."

"शाबास—असं पाहिजे" बनवीर ह्मणाला.

"आणि ती चाडाळीण कुठं आहे ?" मालदेवानें प्रश्न केला.

"कोण, भुलैया का ? मेली एकदांची. आहे मेराच्या नायकाजवळ. केव्हां केव्हां ती माझ्याकडे येऊन खिजवीत असे—"

"माझ्या हातांत येऊं दे—नाक कान कापीन * * *" रणभीर तिरस्कारानें ह्मणाला.

"ह्मणजे ? मेर लोकांवर तूं का जाणार ?" मंगलेनें रणभीरास प्रश्न केला.

रणभीरानें आपली सर्व मसलत सांगितली. मंगलेची मुद्रा विचारी दिसूं लागली.

" काय, आमचा विचार तुला पसंत नाहीं?—"

" असं कसं होईल दादा?—" मंगला कांहीं विचार करीत ह्मणाली, "पण मीं कांहीं दुसराच विचार केला होता."

" तो काय बरें ? तो सोपा आणि हिताचा असल्यास तसें करूं—"

मंगलेनें एकवार इकडे तिकडे पाहिलें. जणूं काय तेवढ्यानेंही तिचें समाधान झालें नाहीं. ती उठून बाहेर गेली. आणि दाराबाहेर—आसपास—कोणी नाहीं अशी पक्की खात्री करून घेतल्यावर ती आंत आली. नंतर तिनें दार लावून घेतलें व ती आपल्या पूर्व जागीं येऊन बसली व हळूच ह्मटलें, " मेर लोकांचें पुढील सर्व धोरण मला माहीत आहे. कारण माझ्या कैदखान्यासमोरच त्यांच्या बैठकी होत." असं ह्मणून तिनें बऱ्याच गोष्टी हळू हळू आपल्या बापाभावास सांगितल्या. त्या ऐकून सर्वांसच मोठा विचार पडला. तेव्हा मंगला ह्मणाली, " मला असें वाटतें, बाबांनीं जावें मेर लोकांवर. कारण ते फार चढले आहेत. त्यांना वाटतें, केळवाड्याकडे मालदेवजींचें लक्ष लागलें आहे. ते कसचे आपल्याकडे येतात ? रणभीरदादा जाईल तर त्यांना जास्तच आढ्यता येईल. तेव्हां बाबांनींच जाऊन त्यास चकित करावें व असें बोलणें लावावें कीं, भुलैयेला स्वाधीन करा ह्मणजे तह करून तंटा करून मिटवून टाकूं. प्रथम ते या गोष्टीस कबूल होणार नाहींत. कदाचित् भुलैया कोण—काय—आह्मांला माहीत नाहीं असेंही ह्मणतील; पण त्या लोकांत खरा जोर फार थोडा आहे. तेव्हां बाबांनीं त्या नायकास 'एका बाईच्या नादीं लागून तुह्मी आपलें व आपल्या जातीचें विनाकारण नुकसान करतां आहां.' असें सांगून पाठवून लढाईची तंबी दिल्यास ते लोक येतील वठणीवर. इकडे आपण मेर लोकांवर गेलां आहां हें बाहेर फोडावयाचें नाहीं. पंधरा दिवसांत मेरांकडील तंटा उरकेल. तोंपर्यंत रणभीरदादा व मी गड सांभाळतों. बनबीरदादानें प्रयत्न करण्याकरितां ह्मणून दिल्लीला एकवार जाऊन यावें. कदाचित् या वेळीं काम होण्याचा संभव आहे." असें ह्मणून तिनें आणखीही बऱ्याच युक्त्या सुचविल्या. त्यांपैकीं बऱ्याच सर्वानुमतें पसंत पडल्या. माळदेव त्याच दिवशीं कांहीं फौज घेऊन

मेरांच्याकडे गेला. बनबीर दिल्लीला गेला. रणभीरानें आपल्या राजनीति-कुशल भगिनीच्या सहाय्यानें चितोरचा बंदोबस्त केला व त्याच वेळीं सामोपचाराचें बोलणें लावण्याकरितां राणाजीकडे वकीलही पाठविण्यांत आला.

---

* *    * *    * *    * *

* *    * *    * *    * *

पुनः तेंच संगीत ! पुनः तेंच भक्तिरसपूर्ण गान ! !

**राम कहने का–गोविंद कहने का, मजा जिसकी जबान पैं आगया !**

भुलैंया कान देऊन ऐकत होती. ती त्या दिशेला त्वरेनें जात म्हणाली, " गुरु महाराज, पुनः आपण सांपडलांत. आतां आज उपदेश घेतल्याखेरीज–घनःशाम कुठें राहतात याचा पत्ता विचारल्याखेरीज–नाहीं जाऊं देणार." असें कांहीं पुटपुटून ती त्या दिशेला धावली.

त्या दिवशीं त्या गोरखपंथी साधूला पाहिल्याबरोबर भुलैंयेची त्याजवर भक्ति जडली. आपण पाहतों आहोंत हा साधु कोणी चांगला सत्पुरुष दिसतो. तेव्हां त्यांची सेवा करून आपल्या परमार्थाचा मार्ग खुला करावा असा तिनें निश्चय केला व त्याप्रमाणें ती त्याचें भजन संपेपर्यंत त्याच्यापुढें उभी राहिली. कर्मधर्मसंयोगानें भुलैंयेला फार वेळ तिष्ठावें लागलें नाहीं. लौकरच साधु महाराजांनीं आपले नेत्र उघडले. आपल्यापुढें एक सुंदर तरुणी हात जोडून उभी आहे, हें पाहतांच त्यांस आश्चर्य वाटलें. त्यांनीं शांत स्वरांत प्रश्न केला, " क्या है माई ! "

आपल्यास ' माई ' म्हटलेलें पाहून भुलैंयेला कसेंसें वाटलें. बाकी साधु बैरागी सर्वच स्त्रियांना ' माई ' असें संबोधितात हें तिला माहीत होतें. ती नम्रपणें म्हणाली, " गुरु महाराज ! मला उपदेश पाहिजे." हें तिचें वाक्य संपतें न संपतें तोंच त्या साधूला विलक्षण हंसूं आलें. तो खदखदा हंसून म्हणाला, " मी तुला उपदेश देऊं ? ह्यः ह्यः ह्यः " भुलैंया अगदीं बावरून गेली. आपण बोलण्यांत कांहीं चुकलों कीं काय याचा

तिला भ्रम पडला. ती आणखी कांहीं बोलणार तों साधूनें आपली झोळी खाकेंत अडकवून व एकतारी खांद्यावर टाकून तेथून गमन केलें. प्रथम त्याची चाल सावकाश होती; पण भुलैया आपलें मागून येत आहे हें पाहतांच त्यानें आपल्या पायास जास्त गति दिली. भुलैया त्याचे पाठो- पाठ होतीच. तें पाहतांच त्यानें पळण्यास प्रारंभ केला व थोड्याच वेळांत त्यानें भुलैयेस चकविलें. तो दिसेनासा झालेला पाहतांच भुलैया अगदीं निराश झाली. ते दिवशीं तिनें संध्याकाळपर्यंत त्या साधूचा तपास केला. तिनें शेतांत काम करणाऱ्या शेतकऱ्यांस विचारिलें, गुरा- ख्यांना विचारिलें, आसपासच्या खेडेगांवांत जाऊन तपास केला, पण व्यर्थ. जिकडे तिकडे एक नकार. कोणीही असा साधु पाहिला नव्हता. भुलैयेस त्याबद्दल दुःख तर झालेंच, पण आश्चर्यही वाटलें. प्रत्यक्ष देव तर साधू वेषानें माझी कसोटी पाहण्याकरितां आले नव्हते ना? असेंच तिच्या मनानें घेतलें व त्या कसोटीला आपण उतरावयाचें असा तिनें निश्चय केला.

या गोष्टीला चार दिवस लोटले भुलैया सारखी त्या साधूच्या शोधांत भटकत होती. दोन वेळ अथवा कधीं कधीं एक वेळ पोटाला अवश्यक अन्न मिळविण्याकरितां तिनें एखाद्या खेड्यांत जावें व तेवढें काम आट पलें कीं, आपल्या बंशीधराला उराशीं धरून " राम कहने का–गोविंद कहने का–" हें गाणें गुणगुणत डोंगर, खोरीं, माळ पाहात हिंडावें. तिला या वेळीं कशाचेंही भय वाटत नव्हतें. कशाचीही काळजी वाटत नव्हती. फक्त अन्न मिळविण्याकरितांच ती लोकवस्तीजवळ जात असे. बाकी सर्व वेळ ती निर्जन प्रदेशांतून हिंडण्यांत घालवी. लोकांना तिची चांगली माहिती झाली होती. तिचें तें गाणें त्यांना फार फार आवडे. पण तें त्यांना कधीं कधीं ऐकावयास सांपडे. तरी ते तिला कसलाही त्रास देत नसत व कांहीं विचारत नसत. फक्त प्रत्येकाला आपल्या येथील अन्न तिनें खावें असें वाटे. तिलाही पण सर्वांविषयीं मोठें प्रेम वाटे. तिचें सर्व लक्ष्य त्या साधूकडे लागल्यामुळें ती फार थोडा वेळ शुद्धीवर असे; पण एखादे वेळीं ती शुद्धीवर येई व त्या वेळीं ती सर्वांशीं गोड बोलत असे. कोणी आग्रह केल्यास ती आपलें गाणेंही ह्मणत असे. असो.

एके रात्रीं भुलैंया आकाशांतील एका ठळक ताऱ्याकडे पहात त्या साधूची मूर्ति लक्षांत आणून आपलें आवडतें गाणें गुणगुणत बसली होती, तोंच आपल्या सुरांतच कोणी तरी तेंच गाणें ह्मणत असावें असें तिला वाटलें. ती कान देऊन ऐकूं लागली तों खरेंच, कोणी गात होतें.

**राम कहने का, गोविंद कहने का**
**मजा जिसकी जबां पें आगया ।**

भुलैयेनें त्या गाण्याचा स्वर बरोबर ओळखला. तिचीं गात्रें हर्षगद्गद झालीं. ती ताडकन् उडाली व त्या दिशेला वळली. तेथून थोड्या अंतरावरच तोच साधू आपल्या एकतारीवर गात बसला होता. भुलैया दबत दबत त्याचे जवळ गेली व तिनें त्याचे पाय धरले ! तरी साधूला कांहीं भान नव्हतें. आपल्या गाण्यांतच तो गुंग होता ! मात्र आजचें गाणें भुलैयेला फारच मोहक वाटलें. तिनें आपलें मस्तक त्याच्या पायां-वर ठेवलें. त्या गाण्यामुळें ह्मणा अथवा दुसऱ्या कांहीं कारणानें ह्मणा, तिला हळ हळू गुंगी येत चालली. तिच्या कानांत मात्र त्या गाण्याचा स्वर घुमत होता. त्याच्या पायाशीं घातलेला तिचा विळखा ढिला पडला व तिची चेतना नाहींशी झाली !

प्रातःकालच्या गार वाऱ्यानें भुलैया शुद्धीवर आली. पाहाते तों काय ? ज्या ठिकाणीं साधु बसला होता, त्या धोंड्यावर बंशीधराची मूर्ति दिसत होती. साधु नाहींसा झाला होता. पुनः ते दिवशीं संध्याकाळ-पर्यंत भुलैयेनें आसपासचा बराच प्रदेश तुडविला, पण तिला फळ मिळालें नाहीं.

अशाप्रकारें महिना होत आला. पाहिजे त्यावेळीं तें गाणें तिला ऐकूं येई. त्या साधूची नजरभेट होई व पुनः तो एकाएकीं नाहींसा होई. अशा त्यांच्या चार पांच भेटी झाल्या. आजची त्याची सहावी भेट.

प्रातःकाळची वेळ होती. या भागांत वृक्षाची गर्दी नसल्यामुळें व पर्वत, शिखरें दूर असल्यामुळें कोंवळ्या सूर्यकिरणांस प्रवेश होण्यास फारसा अडथळा नव्हता. भुलैया गाण्याचे अनुरोधानें एका वडाचे झाडा-खालीं जाऊन पोंचली. साधु महाराज आपल्या एकतारीवर गात होते.

भुलैया त्यांचेपुढें जातांच त्यांनीं आपले नेत्र उघडले. हिला पाहतांच त्यांनीं आपलें भजन बंद केलें. थोडा वेळ तिच्याकडे पाहून त्यांनीं ह्मटलें, " कां बाई ? तूं माझे पाठीमागें कां लागली आहेस ? "

" माझ्या मनांतलें आपल्यास कांहीं ठाऊक नाहीं काय ? " भुलैयेनें प्रश्न केला.

साधु हंसत ह्मणाला, " उपदेश पाहिजे–ह्यः ह्यः ह्यः "

भलैया कांहींशी क्रुद्ध होऊन ह्मणाली, आज मला आपण मार्ग दाखविला नाहीं तर मी आपल्या पायाशीं प्राण देईन. "

" तें बघ–" साधु एका दिशेकडे बोट दाखवून ह्मणाला, " तें काय आहे ? "

भुलैयेनें तिकडे पाहिलें. एक हरिण उड्या मारीत चाललें होतें. ती वळून आश्चर्यानें त्याच्या मुद्रेकडे पाहूं लागली. साधु ह्मणाला, " तुला उपदेश पाहिजेना ? जा तर त्या हरिणाला पकडून आण. "

"हरिणाचा आणि उपदेशाचा काय संबंध ?" ती आश्चर्यानें ह्मणाली, " मी तें कसें पकडूं शकेन ? " " मग बाई, हरिणापेक्षाही चपळ अशा मनाला तूं आपल्या ताब्यांत कुठून आणूं शकणार ? आणि जोंपर्यंत मन इकडे तिकडे भटकत आहे तोंपर्यंत देव तरी कसा दिसणार ? " भुलैयेला चटकन् सर्व उलगडा पडला ! ती खालीं मान घालून कांहीं विचार करूं लागली. थोड्या वेळानें ती नम्रतेनें ह्मणाली, " महाराज, मी अज्ञान. आपल्या सांकेतिक बोलण्याचा मला कसा उलगडा पडणार ? आपण कृपा करून त्या योग्यतेला मला पोंचवा ह्मणजे झालें. " असें ह्मणून ती त्याच्या पायाजवळ जाऊन बसली. साधूनें तिच्या मस्तकावर हात ठेऊन ह्मटलें, " वासनेच्या पेटलेल्या होळींत सदसद्विवेकबुद्धि जळून तिचे कोळसे होतात; तेव्हां प्रथम त्या वासनेला नामशेष कर आणि नंतर नीट नेत्र उघडून त्रिभुवनांत देव कुठें वसत नाहीं तें पहा. असें स्थान–देवावांचून एखादी वस्तु अथवा एखादें स्थान–तुला आढळलें तर तूं पुनः मजकडे ये ! ह्मण राम ! "

साधूनें मस्तकावर हात ठेवतांच भुलैयेची मोठी चमत्कारिक अवस्था झाली! तिचे नेत्र मिटले होते तरी तिच्यापुढें कांहीं चमत्कारिक देखावा दिसत होता. साधु बोलत असलेले शब्द तिला ऐकूं येत होते; पण ते तिला दूर उंचावरून कोणी बोलत आहे असें वाटत होतें. साधूनें 'ह्मण राम' ह्मणतांच ती 'राम' असें ह्मणाली, तों तिच्या अंतःचक्षुपुढील देखाव्यांतील प्रत्येक वस्तु 'राम राम' ह्मणत होती. हळू हळू तिनें नेत्र उघडले! प्रथम तिच्या नजरेस कसला तरी शांतिदायक प्रकाश नजरेस पडला व तो विरळ होती. बाह्यःसृष्टीचें ज्ञान तिला होऊं लागलें. पुनः तो साधु पुरुष नाहींसा झाला होता. पण आतां त्याबद्दल तिला वाईट वाटलें नाहीं. कारण आतां तिचें चित्त एका अननुभूत आनंदानें व्यापृत झालें होतें.

---

** ** **

* * * * *

** ** **

वास्तविक राणाजीला अलीकडे कसलीही काळजी नव्हती. मालदेवापेक्षां आपण सर्वतोपरी श्रेष्ठ आहोंत आणि उघडपणें युद्ध सुरू केल्यास त्यास आपण घात करूं अशी त्यास पूर्ण खात्री होती. शिवाय दिल्लीदरबारची अंतःस्थिति कांहीं समाधानकारक नाहीं हें कळल्यापासून तर त्यास विलक्षण हुरूप आला होता तेव्हां मालदेवाकडील वकील येतांच त्यानें आपल्या निवडक फौजेसह चितोरगडाकडे कूच केलें व थोड्याच दिवसांत तो गडाच्या पायथ्याशीं येऊन पोंचला आणि वकिलाचें बोलणें सुरू झालें. मालदेव मेर लोकांकडे गेल्याचें त्यास अंतस्थ रीतीनें हमीरदायाकडून कळलें होतें.

सर्व गोष्टी साहजिक रीतीनें घडत चालल्या होत्या तरी फावल्यावेळीं राणाजीस एक गोष्ट सारखी डवचत होती. ती गोष्ट ह्मणजे हमीर-

दासाचें रहस्य ! हमीरदास हें राणाजीस एक सुंदर कोडें होतें. राणाजी त्यास वचन देऊन चुकल्यामुळें आपली उत्कंठा तृप्त करून घेण्याकरितां प्रयत्न करणें त्यास शक्य नव्हतें. केवळ आपल्या मनाशींच तो निरनिराळ्याप्रकारें विचार करून ' ही व्यक्ति कोण असावी ?' याचा विचार करीत होता. असो.

इकडे हमीरदास आपल्या अटीप्रमाणेंच वागला. कांहीं दिवस निष्ठापूर्वक राणाजीची सेवा करून मालदेवाचा वकील येण्यापूर्वींच तो राणाजीकडून निघून गेला. नंतर कांहीं दिवस त्याचेकडून कांहींच कळलें नाहीं. राणाजी गडाकडे येऊन पोंचल्यावर त्याचें एक पत्र आलें. त्यांत लिहिलें होतें—" दुर्गाष्टमीला मी निरोप पाठवितों त्याप्रमाणें करावें. त्यापूर्वी गडाला वेढा देण्याचें करूं नये. मनुष्यवध न होतां, गड हातांत येण्याचा संभव आहे. "

आज दुर्गाष्टमी ! परवा दिवशीं गडावर आपला झेंडा लागलाच पाहिजे ही राणाजीची प्रतिज्ञा ! तो मोठ्या उत्सुकतेनें हमीरदासाच्या पत्राची वाट पाहात आपल्या तंबूपुढें हिंडत होता. इतक्यांत एक मनुष्य पत्र घेऊन आला. पत्र हमीरदासाचें होतें. त्याच पत्राबरोबर आणखी एक पत्र होतें. हमीरदासाच्या पत्रांत पुढील मजकूर होता—

> " सोबत पाठविलेलें पत्र एका हुशार स्वाराजवळ देऊन गडावर पाठवावें. त्या स्वारास आपण दिल्लीकडील आहांत असें बतावण्यास शिकवावें. नंतर उद्यां तिसरे प्रहरचे सुमारास एक हजार निवडक फौज आपल्या एखाद्या विश्वासू मनुष्याबरोबर पाठवावी. या फौजेसही आपण दिल्लीकडील आहोंत हें बतावण्यास शिकवावें. या कामीं हरदेवजी असते तर बरें होतें. असो. मला आपली भेट घेऊन बरेच दिवस झाले. कृपा करून आज सायंकाळचे सुमारास गडाच्या पश्चिम बाजूस असलेल्या टेंकडीवर फिरण्याचे निमित्तानें यावें. तेथें आपली भेट होईल. "

पत्र वाचून राणाजीस मोठें चमत्कारिक वाटलें. त्यानें दुसरें पत्र पाहिलें. त्यांत फक्त दोनच ओळी होत्या. त्या अशा:--

"बादशाहाची भेट घेतली. हजार फौज रवाना करण्याचा हुकूम झाला आहे. अष्टमी नवमीपर्यंत येऊन पोंचेल. मीही लौकरच निघतों."

–बनबीर.

राणाजीस जरी या दुसऱ्या पत्रावरून हमीरदासाचा डाव कळला तरी हमीरदासाला चितोरगडावरील सर्व हालचाली कळल्या कशा, याचें त्यास आश्चर्य वाटलें. कारण गडावर काय काय घडत आहे हें कळल्याखेरीज असा डाव टाकणें शक्य नाहीं. दुसरें, दुसऱ्या पत्राचें अक्षरही भिन्न होतें. अर्थात् तें बनबीराचें तरी असलें पाहिजे किंवा त्याच्या अक्षराची हुबेहुब नक्कल तरी केली असली पाहिजे. तिसरें, यावेळीं बनबीर गडावर नसून दिल्लीकडे असला पाहिजे. या इतक्या गोष्टी हमीरदासाला कशा कळल्या किंवा करता आल्या किंवा हमीरदास आणि बनबीर या दोन्ही व्यक्ति एकच तर नसतील! असे विचार त्याच्या मनांत आले. त्यानें पत्र आणिलेल्या मनुष्यास 'बरें आहे म्हणून आपल्या धन्याला सांग' असें सांगून लावून दिलें. नंतर तो आपल्या तंबूत जाऊन बसला आणि विचार करूं लागला. त्यानें तीं पत्रें पुनः पुनः वाचलीं, पण त्याचा त्यास कांहींही उलगडा पडला नाहीं व हमीरदासाचें सुंदर कोडें पूर्वीप्रमाणेंच गूढ राहिलें. कसेंही असो, हमीरदास आज संध्याकाळीं भेटणार एवढ्यानें राण्यास पुष्कळ आनंद झाला. त्यानें हमीरदासाच्या पत्राप्रमाणें दुसरें पत्र देऊन एक स्वार गडावर पाठवून दिला. असो.

तिसऱ्या प्रहरानंतर राणाजी एकटाच आपल्या चितोरवर स्वार होऊन संकेतस्थानाकडे निघाला. प्रतिज्ञा पूर्ण करण्याची अवधी फक्त एका दिवसाची होती, तरी त्याबद्दल आतां त्यास विशेष फिकीर नव्हती. आपला विजय होऊन आपली विजयपताका विजयादशमीला गडावर फडकणार यांत मुळींच शंका नाहीं, अशी त्याची मनोदेवता त्यास

सांगत होती. तो आनंदित चित्तानेंच गडाच्या तटाकडे पाहात उजव्या हातानें आपल्या कोंवळ्या मिशीला पीळ देत चालला होता व त्यावेळीं मनांत विचार करीत होता, " परवाचे दिवशीं मी या गडाचा मालक होणार. ह्मणजे आज किती वर्षांनीं तरी बापाजींची बाप्पांगावळची गादी त्याच्या वंशाकडे येणार आहे. प्रभु एकलिंगजी, तुझी लीला विचित्र आहे. आज किती दिवस आह्मी वणवण करीत हिंडतों आहोंत, वेळेवर अन्न आहे आहे, नाहीं नाहीं, अशी स्थिति भोगतों आहोंत; पण आला-आमच्या सौभाग्याचा काळ जवळच आला आहे. परवाचे दिवशीं मी आपल्या पूर्वजांच्या इच्छा तृप्त करणार! माझ्या स्वर्गस्थ मातेला माझ्या विजयापासून किती तरी आनंद होणार आहे! आणि मला विजय कां नाहीं मिळणार? माझ्या मातेचा आशीर्वाद मुळीं तसा आहे—" इत्यादि कांहीं खेदजनक व कांहीं उत्साहजनक विचार करीत करीतच तो संकेत-स्थानावर जाऊन पोंचला. ही एक साधारणशी टेंकडी असून ती उंच उंच होत होत गडाच्या पर्वतांत जाऊन मिळाली होती. टेंकडीच्या माथ्यावरून दोन चार पाय वाटा इकडे तिकडे गेलेल्या दिसत होत्या. त्यांपैकीं एक गडाकडे वर गेली होती. हिलाच टेंकडीच्या पलीकडल्या बाजूस असलेल्या वाडीची वाट खालून वर वळणें घेत घेत येऊन मिळालेली होती. या दोन वाटा जेथें मिळाल्या होत्या तेथेंच एका वृक्षा-खालीं जाऊन राणाजी घोड्यावरून उतरला. त्यानें घोड्यास चरण्यास सोडून दिलें. आणि स्वतः इकडे तिकडे फिरूं लागला. गडावरील कोणाची आपणावर नजर जाईल व आपल्यावर कांहीं संकट येईल याची त्यास मुळींच भीति नव्हती. अगदीं निःशंकपणें टेंकडीवरून दिसणाऱ्या खालच्या प्रदेशाची शोभा पाहात तो फिरत होता. सूर्यास्ताला आतां थोडाच अवकाश होता. त्यामुळें त्याचीं किरणें कोंवळीं होऊं लागलीं होतीं. खालच्या प्रदेशांत थोड्या अंतरावर झाडामध्यें गुरफटलेलीं शेत-करी लोकांचीं घरें दिसत होतीं. त्याचे आजूबाजूस लोकांचीं लागवड केलेलीं शेतें पांढुरक्या हिरव्या वर्णाचीं दिसत होतीं. गव्हाला लोंब्या येऊं लागल्या होत्या व त्यांचे चकचकीत पांढरे तुरे वाऱ्यानें हालत होते व त्यामुळें पाण्यावरील लाटांचा भास होत होता. मधून मधून आप-

आपल्या घराकडे चाललेल्या गुरांचा हंबरव ऐकूं येत होता व त्यांतच गुराख्यांचा गुरांना दटावण्याचा कर्कश रव ऐकूं येत होता. राणाजी हा प्रकार तटस्थपणें पाहात उभा होता तोंच त्यास जवळच कोंकराचा 'बें बें' हा शब्द ऐकूं आला. त्यानें दचकून वळून पाहिलें तों गडावरून खालीं येणाऱ्या वाटेनें एक तरुणी एका कोंकराला आपल्या वक्षस्थलाशीं धरून हळू हळू येत होती. तिच्या डाव्या हातांत कोंवळें गवत होतें व उजव्या हातानें तिनें त्याची मान प्रेमानें धरून वर उचलली होती. ज्या-वेळीं तें कोंकरूं 'बें' असा स्वर काढी त्यावेळीं ती तरुणीही त्याच्या मुद्रेकडे प्रेमानें पाहून 'बें' असा स्वर काढी आणि त्याचें चुंबन घेई. हा प्रकार पाहून राणाजीला आश्चर्य व कौतुकही वाटलें. तो त्या तरुणीकडे टक लावून पाहूं लागला.

तरुणीचें वय अठरा वर्षांचें तरी असावें. तिनें शेतकरी वर्गाला शोभेल असा पोषाख केला होता. तरी तिचें मूळ स्वरूप सुंदरच होतें. तारुण्याचा बहार सर्व शरीरावर उसळलेला दिसत होता. एक जाड्या-भरड्या सुताचा लेहंगा आणि वर तशाच कापडाची एक ओढणी. ओढ-णीचें एक टोंक डाव्या हाताकडील बाजूस खोंवलें असून डाव्या हाताच्या पलीकडून पदर घेऊन तो डोक्यावर चढविला होता. नंतर तो उजव्या हाताखालून घेऊन वक्षस्थलावरून आडवा नेऊन डाव्या हाताच्या बग-लेंत दाबून धरला होता. तरुणीच्या अंगांत कांचळी दिसत नव्हती. त्या-मुळें डाव्या दंडांत घातलेलें एक चांदीचें आंवळ वेढें दृष्टोत्पत्तीस येत होतें. कांचळी नव्हती तरी इतर सर्व भाग उत्तम तऱ्हेनें झांकण्यांत आला होता. अंगांत कांचळी नसणें व डाव्या दंडांत कडें असणें हीं कौमर्यावस्थेचीं चिन्हें होत.

ती तरुणी जसजशी जवळ येऊं लागली तसतसें राणाजीस तिच्या-विषयीं जास्तच कौतुक वाटूं लागलें आणि तो तिच्याकडे जास्तच निर-खून पाहूं लागला. कोणत्याही वस्तूकडे निरखून पाहिलें ह्मणजे त्यांतील खांचाखोंचा हीं नजरेस येऊं लागतात आणि त्याकडे आपली कौतुक दृष्टीच असेल तर तिचें लोभांत ह्मणजे ती वस्तु आपल्यास असावी या इच्छेंत-पर्यवसान होतें. राणाजी जों जों तिच्याकडे निरखून

पाहूं लागला तों तों दोन नेत्रांपेक्षां आणखी थोडे जास्त नेत्र देवानें आपल्यास दिले असते तर बरें होतें, असें त्यास वाटूं लागलें. त्या तरुणीचें राणाजीकडे अद्यापीही लक्ष्य गेलें नव्हतें. तिचा आपला क्रम. त्या कोंकरास कुरवाळावें आणि त्यानें 'बें' केल्यास आपणही 'बें' करून त्याचें चुंबन घ्यावें. ती जवळ येऊनही अद्याप तिची दृष्टि आपणाकडे जात नाहीं हें कसें काय ? राणाजी मुद्दाम तिच्या वाटेवर जाऊन उभा राहिला. त्यास या वेळीं दुसरें कांहीं दिसत नव्हतें. आणि सुचतही पण नव्हते. ती तरुणी अगदीं जवळ आली. तरीही तिनें राणाजीकडे पाहिलें नाहीं. ती मुकाट्यानें बाजूला वळली व त्यास वगळून पुनः वाटेला लागली. राणाजी म्हणजे एकादें झाड झुडुप आहे, असें तिला वाटलें कीं काय कोण जाणें ? तो प्रकार पाहून राणाजीला मात्र ओशाळल्यासारखें झालें. तो आपलें अस्तित्व जाहीर करण्याकरितां खाकरलाही. तरी त्या तरुणीनें मागें पाहिलें नाहीं. मग मात्र आमच्या नायकास राहवेना. त्यानें धांवत जाऊन तिची वाट आडवली आणि विचारिलें, "ही वाट कुठें जाते ?" आतां कुठें त्या तरुणीनें वर पाहिलें. पण त्या दृष्टींत कोण जहरी विष ? राण्याच्या हृदयास जाऊन तें भिनलें. तरुणी पुनः खालीं पाहूं लागली. तिच्या ओंठावर हास्य दिसत होतें. आपल्या कोंकराकडे पाहून ती मंदस्मित करूं लागली. राणाजीच्या प्रश्नाचें हेंच उत्तर काय ? पण राणाजीलाही तेंच उत्तर पटलें असावें. कारण तो तिच्याकडे अनिमिष नेत्रांनीं पाहात राहिला. पुनः त्या तरुणीनें राण्याकडे पाहिलें. पुनः तेंच मधुर विष ! राणाजीच्या सर्वांगांत तें भिनलें असावें. त्यानें वेड्यासारखें विचारिलें, "तुमचें नांव काय ?"

तरुणी हंसली व तोंडाकडे हात नेऊन नकार दर्शवीत गुणगुणली "हूं हूं–"

काय ? तरुणी मुकी ? राणाजीला मोहून टाकणारी सुंदरी मुकी तर ? त्याच्या मनाला एकदम धक्का बसला. कां बरें ? एक अपरिचित तरुणी जन्मापासून मुकी असली काय किंवा बोलकी असली काय ? राणाजीस वाईट वाटण्याचें कारण ? पण त्यास वाईट वाटलें खरें. त्यानें प्रश्न केला, "आपल्याला बोलतां येत नाहीं ?" तरुणीनें नकार दर्शविला.

राणाजी पुन: कांहीं विचार करूं लागला. इतक्यांत त्या कोंकरानें बें स्वर काढिला. त्याबरोबर तरुणीनेंही ' बें ' करून ' हूं हूं ' करीत तेथून त्वरेनें गमन केलें. राणाजी फक्त पाहात राहिला.

——

* *   * *   * *   * *
*   *
* *   * *   * *   * *

एखादें सुंदरसें पांखरूं आपल्या दृष्टीस पडून आपण माहीत होतों न होतों तोंच तें आपल्यापुढून चट्कन् उडून निघून जावें व त्यामुळें आपणास त्याविषयीं उत्सुकता वाटूनही निराशा वाटावी, त्याचप्रमाणें वरील प्रकार झाला. त्या सुंदरीच्या पाहण्यानें राणाजीची चमत्कारिक अवस्था झाली कीं, ती पुढून निघून चालली असतांही तिला अडविण्याचें किंवा तिच्याशीं कांहीं बोलण्याचें त्यास भान राहिलें नाहीं. ती गेल्यानंतर तिची छबी दिसेनाशीं होईपर्यंत तो त्या दिशेकडे पाहात होता. दूर गेल्यावर एकदांच काय तें त्या तरुणीनें वळून पाहिलें होतें. पण त्या वेळीं ती किती चमत्कारिक तऱ्हेनें हंसली ? त्या हंसण्याचें राणाजीला मोठें नवल वाटलें. त्या हंसण्यांत कांहीं तरी उपरोधिकपणा असावा अशीही त्यास शंका आली. पण तसा उपरोधिकपणा असण्याचें कारण काय ? राणाजीनें तर यापूर्वीं तिला कधीं पाहिलें नव्हतें; निदान त्यास तिला पाहिल्याचें आठवत तरी नव्हतें. असें असतां तिनें असें कांहीं अर्थपूर्ण कां हंसावें ? तो तिच्याशीं कोणत्याही प्रकारें असभ्यपणानें वागला नव्हता. असें असूनही तिचें असें चमत्कारिक वर्तन कां व्हावें ? हाच प्रश्न त्याचे मनास डवचूं लागला. अखेरीस जेव्हां ती तरुणी अगदीं दिसेनाशी झाली त्या वेळीं त्यानें आपली दृष्टी वळविली. त्यानें एक दीर्घ निश्वास सोडला व तो आपल्या घोड्याकडे गेला. आतां सूर्यनारायण अस्ताचलाशीं अगदीं भिडला होता. राणाजी घोड्यावर बसून आपल्या

छावणीकडे वळला. या वेळीं त्यास कसलेंही भान नव्हतें. हमीर दासा-विषयींचें कोडेंही तो पार विसरून गेला. आपलें नांवही त्यास आठवलें असतें कीं नाहीं कोणास माहीत ? एक विचार—ती रमणी ! त्याचें मन त्यास ह्मणूं लागलें, ‘ तिचे नेत्र असे होते, तिचे गाल असे होते, ओंठ असे होते, गळा असा होता, केशकलप असा होता, कपाळ असें होतें.’ एक कीं दोन ? प्रत्येक अवयवांचें वर्णन त्याचें मनें त्यास शिकवूं लागलें. त्याचप्रमाणें त्याची स्मृति त्यास सांगूं लागली, “ तिनें तुझ्याकडे कसें मजेनें पाहिलें, ती कशी मजेनें हंसली, तिचें बें किती मधुर ! ” इत्यादि. चितोरला छावणीची वाट माहीत होती ह्मणून बरें. तो आपला सरळ वाटेनें चालला होता. राणाजीचें कांहीं वाटेकडे लक्ष्य नव्हतें. असो.

छावणीच्या बाजूला तो टेंकडी अर्धी एक उतरला असेल नसेल तोंच त्याचा घोडा खिंकाळूं लागला. त्याबरोबर राणाजीनें दचकून वर पाहिलें. तों थोड्या अंतरावर रणभीर घोड्यावर बसून येत होता. त्याबरोबर आणखी दोन शिपाई कांहीं अंतरावर येत होते. त्यांना पाहतांच राणाजीच्या चित्तसृष्टींतून त्या तरुणीनें पलायन केलें. त्यानें सावध होऊन तलवारीस हात घातला व घोड्याला प्रेमानें चुचकारिलें. घोडा उत्साहानें पुढें चालूं लागला.

रणभीराची आपल्यावर पूर्वींपासून नजर असावी, असें त्यास वाटलें. कारण राणाजीनें त्याचेकडे पाहतांच त्यानें आपल्या स्वारास कांहीं खूण केली. त्याबरोबर ते दोन्ही स्वार झपाट्यानें पुढें होऊन निघून गेले. त्यांच्या जाण्यांत कांहीं डावपेच आहे हें राणाजी समजून चुकला. बहुतकरून आपल्यावर चोंहोंकडून हल्ला करण्याचा विचार आहे असें त्यानें ताडलें. इतक्यांत रणभीर अगदीं जवळ आला. त्यानें नमस्कार करून कांहींसें कुचेष्टेनें ह्मटलें, “ कां जिजाजी ! ( मेहुण्याला ह्मणाला ) इकडे कोणी-कडे गेलां होतां ? ”

“ तहाच्या अटी मान्य न झाल्यास हल्ला कोणीकडून चढवावा हें पाहण्याकरितां आलों होतों.” राणाजीनें कांहीं तिरस्कारानें व कांहीं आढ्यतेनें उत्तर दिलें. यावर रणभीर उपहासानें खदखदां हंसला. तेव्हां

राणाजी ह्मणाला, " आतां हंसण्यासारखीच गोष्ट होणार आहे नाहीं तरी ? "

रणभीरानें डोळे मिचकावित विचारिलें, " केव्हां बरें ? "

" फक्त उद्याचाच दिवस मध्यें. परवांचे दिवशीं गड आपल्यास खाली करून दिला पाहिजे."

" मग मी परत जाऊन आपली बांधाबांध करूं ह्मणतां ? " रणभीर उपरोधिकपणें पुढें ह्मणाला, "बरं झालं बोवा, तुमची भेट झाली ती. हो, नाहीं तर तुह्मीं सणादिवशीं येऊन घाई केली असतींत." असें ह्मणून त्यानें घोडा वळविण्याचें सोंग केलें. नंतर तो कावेबाज पुनः वळून ह्मणाला, " पण काय हो, तुह्माला आह्मी आपण होऊनच गडावर उत्तमशी शांत जागा राहावयास दिली तर ? मग तुमच्या पाठीमागें कसलीही भगभग नाहीं." रणभीराचें बोलण्यांतील मर्म न समजण्याइतका राणाजी भोळा नव्हता. तो शांतपणें ह्मणाला, " रणभीर, हे शब्द मी रणनिमंत्रण समजूं काय ? " रणभीर सर्वत्र बारकाईनें पाहात भोळेपणानें ह्मणाला, " मी आपल्या बोलण्याचा अर्थ नाहीं समजलों." मग मी त्याचा अर्थ अगदीं सोप्या भाषेंत आणि सहज पटेल अशा उदाहरणानें समजावितों अं ? सावध ऐस." असें ह्मणून राणाजीनें तलवार उपसली. रणभीरालाही तेंच पाहिजे होतें. ज्या ठिकाणीं हें वर्तमान घडत होतें, ती जागा कांहींशी सपाटच होती. दोघांनींही पवित्रा करून परस्परांवर घोडे घातले. त्यांचे एकदोन हात झाले असतील नसतील तोंच त्यांना दुसऱ्या कांहीं घोड्यांच्या टापा ऐकूं आल्या. त्याबरोबर राणाजी हात आवरून ह्मणाला, " रणभीर, थांब— धर्मयुद्ध व्हावयाचें असल्यास तुझ्या स्वारांनीं मध्यें पडतां उपयोगीं नाहीं." रणभीरानें आपला हात आवरून ह्मटलें, " नाहीं, तसें होणार नाहीं. चालूं दे. आपण कांहीं निमित्त करून असें थांबूं नका. थकलां असल्यास तसें सांगा." रणभीराच्या ह्या खवचट शब्दांनीं विषाचें काम केलें. तरी राणाजी शांतपणें ह्मणाला—" रणभीर, हे शब्द तूं विचारपूर्वक उच्चारले असतेस तर बरें होतें. कदाचित् या शब्दाबद्दल पश्चात्ताप करण्याची वेळ तुला न येवो ! " असें ह्मणून त्यानें तलवार हवेंत उचलली. पुनः चकमकीस सुरुवात झाली. इतक्यांत ते स्वार जवळ येऊन पोंचले. त्यांनीं ओरडून ह्मटलें, " मेल-

भरांत कोणी नाहीं." राणाजीला त्याचा तेव्हांच उमगा पडला. त्याच्या क्रोधानें एकदम पेट घेतला. त्यांत तेल ओतण्याकरितांच कीं काय, रणभीर त्या स्वारांस ह्मणाला, " मग चढवा हल्ला तर ! " राणाजीनें कडकडा आपला ओंठ चावला. तो ओरडून ह्मणाला, " अरे मशका ! अशा प्रकारें संधि साधून तूं माझा घात करूं इच्छितोस ? पण ही तुझी किती पोकळ घमेंड ! पहा—केळवाड्याचें पाणी पाहात रहा." असें ह्मणून तो आपल्या घोड्यास चुचकारून ह्मणाला, " चितोर ! आतां दाखव आपलें चातुर्य आणि मनुष्यापेक्षां पशुही जास्त शहाणे असतात याचा अनुभव या नामर्दाला दे." हें बोलत असतां त्याची तलवार लपलपत होतीच. त्याचें तिरस्काराचें भाषण ऐकून ते स्वार मात्र मागच्यामागेंच थबकले.

रणभीराचें कपटकारस्थान पाहून राणाजीलाही कारस्थानानें लढणें भाग पडलें. त्यानें रणभीरास नुसत्या घुलकावण्या दाखवून दमवून सोडण्याचें मनांत आणिलें. रणभीरानें आपलें होतें नव्हतें तेवढें शौर्य एकत्र करून राणाजीवर एखादा वार तरी करावा ह्मणून शिकस्त केली; पण राणाजीपुढें त्याचा ठिकाव लागेना व त्याचे स्वार तर मध्यें वाटा घेईनात. बरें, पुनः त्या स्वारांना हुकूम करावा तर तें अगदींच नामर्दपणाचें दिसणार. अशाप्रकारें राणाजीकडून तो खेळविला जात होता तोंच एक तीर सूं सूं करीत येऊन त्यानें राणाजींचें डावें मनघट जाया केलें. " अरे विश्वासघातक्या ! हें तुझें धर्मयुद्ध अं ! " असें ह्मणून त्यानें दांतांनीं आपल्या मनगटांतील तीर उपसून काढला आणि घोड्यास ह्मटलें, " हं चितोर घाल उडी ! " असें ह्मणून त्यानें घोड्यास टांच दिली. त्याबरोबर एखाद्या चेंडूप्रमाणें चितोर हवेंत उसळला आणि तो रणभीरावर जाऊन आदळला ! त्या आघातानें रणभीर खालीं आला. इकडे तो खालीं पडतांच चितोरनें त्याच्या घोड्यावर दुगाण्या झाडून त्यास तेथून हाकून दिलें. रणभीर इतक्या जोरानें आणि वांकड्या तिकड्या तऱ्हेनें जमिनीवर खालीं आदळला होता कीं, त्यास इतर इजा तर पुष्कळ झालीच, पण त्याचा उजवा हात वाकडा होऊन त्याच्या तलवारीची मुठ त्याच्याच बरगडींत जोरानें लागली. राणाजी त्याचे डोक्यावर आपली तलवार नाचवीत ह्मणाला, " रणभीर, आठव आतां तुझें तें हंसणें—तें खवचट

बोलणें ! अरे, तूं आपल्याला वीर ह्मणवतोस आणि या पुण्यप्रतापी प्राचीन गडापुढें आज तूं कपटाचें वर्तन करावेंस अं ? तूं रजपूत ! अल्लाउद्दीनाचे वेळीं घडलेल्या जोहारांतील वीरांचा तूं नातलग आणि आज तुझें हें असलें वर्तन ? धिक्कार ! धिक्कार !! आज तुझें हें वर्तन पाहून मला मी तुझा नातलग असल्याबद्दलही लाज वाटूं लागली आहे. इतकेंच नव्हे तर तुझ्याशीं शत्रुत्व करणेंही मला लाजीरवाणें आहे. माझा शत्रु-राणाहमीराचा-शत्रु-असा भ्याड-कपटानें शत्रूला जिंकणारा-थू: त्या शूरपणावर ! जा-नामर्दा, खुशाल गडावर जा. झाली ही शिक्षा तुला बस्स आहे ! त्या बाणानंतर दुसरा बाण कां आला नाहीं माहीत आहे., अरे, तुझें ध्यान कुठें ! तूं होतास आपल्या जीवाला जपत ! पहा-त्या दिशे-कडे पहा. त्याचा मुडदा तेथें कोणी तरी पाडला आहे बरें. माझ्याकडे असा टकमका काय पाहतोस ? युद्ध खेळण्याची आहे इच्छा ? "

राण्याचें हें उपरोधिक बोलणें रणभीरानें केवळ नाइलाजानें ऐकून घेतलें. त्यास आंतरिक पीडा इतकी होत होती कीं, संभाषणवाटें त्यास आपला क्रोध जाहीर करतांच येईना. उलट क्रोधामुळें त्याच्या यातना वाढल्या व तो केवळ लाल झालेल्या नेत्रांनीं राणाजीकडे पाहात होता. राणाजींचे अखे-रचे बोल ऐकतांच त्याचा त्वेष एकदम बाहेर पडला. तो ताडकन् उस-ळून उठून आपल्या स्वारास ह्मणाला, " चांडाळांनो, तुमचा धनी पडला असतां तुह्मी स्वस्थ पाहात काय उभे राहिलां. तुह्मी भ्यालां काय ? करा हल्ला आणि काढा कापून." इतकें तो कसें तरी बोलला व त्यास झीट आली. त्या स्वारांकडे कांहीं विशेष दोष नव्हता. रणभीराचें कपट आणि राणाजींचें शौर्य पाहून त्यांस वेड्यासारखें झालें होतें; पण माल-काच्या त्या त्वेषाच्या बोलण्यानें ते शुद्धीवर आले. आणि त्यांनीं राणाजी-वर चाल केली. राणाजी तयार होताच. इतक्यांत आणखी एक घोडेस्वार तेथें आला. त्यानें विचारिलें, " महाराज, मी येऊं का मदतीला ? हुकूम असेल तर-" राणाजी आपलें रक्षण करीत त्याच्याकडे पाहात ह्मणाला, " ओहो, कोण हरदेव-हां, तूंच वाटतें त्या बाण मारणाराशीं झगडत होतास. बरें झालें, वेळेवर उपयोगीं पडलास. जा ! मीं तुझा अपराध क्षमा केला ! हें बघ • हरदेव, मीं त्या दोघांना पुरून आहें. तूं छावणींत जा

आणि पडाव उठवून गडाकडे फौज आण. आज चांदणें आहे. आतांच्या आतां गड खालसा झालाच पाहिजे." हें बोलत असतांना त्याची तलवार चालूंच होती. हरदेव आनंदानें घोडा उडवीत तेथून निघून गेला. त्यास हांकून लावल्यापासून तो राणाजीचे कांहीं उपयोगीं पडून पुनः त्याच्या कृपेंत जावें याची वाट पाहात होता. आज त्याची इच्छा पूर्ण झाली. मग त्यास आनंद कां नाहीं होणार ?

रणभीराची आणि राणाजीची दृष्टादृष्ट होऊन हरदेव छावणीकडे जाईपर्यंत अवघा अर्धा तास लागला असेल. एवढ्या आवधींत या सर्व गोष्टी घडल्या. सूर्यास्त केव्हांच झाला होता. संधिप्रकाशानेंही आतां गमन केलें व मध्य आकाशस्थ अष्टमीचा चंद्र खालील युद्धप्रकार कौतुकानें पाहूं लागला. त्या स्वारांनीं आपल्या मालकाचा सूड घेण्याचा पुष्कळ प्रयत्न केला व राणाजी युद्धाचे पोषाखांत नसल्यामुळें त्यासही बऱ्याच जखमा झाल्या ! त्या स्वारांना राणाजी आतां थकेल मग थकेल अशी फार आशा होती. पण ती व्यर्थ होऊं लागली. दोघेही अगदीं थकून गेले. तेव्हां त्यांनीं तलवारी आटोपत्या घेतल्या. त्या स्वारांपैकीं एक ह्मणाला, " आपण आह्मांस भ्याड ह्मणालच. पण आपण युद्धाकरितां फौज बोलवली. तेव्हां आह्मांलाही गडावर जाऊन तयारी केली पाहिजे." यावर राणाजी हंसला. त्यानें त्यांना जातांना आपल्या मालकासही घेऊन जा ह्मणून सांगितलें. रणभीर आतां थोडाबहुत सावध झाला होता; पण त्यास उठण्याचें सामर्थ्य नव्हतें. तो पडल्या पडल्या युद्ध पाहात होता व राणाजीच्या मृत्यूची आकांक्षा करीत होता. अर्थात् शिपायांनीं युद्ध थांबविलेलें पाहतांच त्यास नवल वाटलें व क्रोधही आला. तो शक्य तितकें ओरडून ह्मणाला, "कांरे, दोघे असून त्या पोराला भ्यालांत." राणाजी त्याचेकडे वळून तलवार हलवीत उपाहासानें ह्मणाला, " पुरे पुरे, वीरशिरोमणे, आपला तो पोकळ त्वेष पुरें करा. जा आतां गडावर आणि करा माझ्या स्वागताची तयारी." हें भाषण रणभीराला चांगलेंच झोंबलें, पण त्या झोंबण्याचा कांहीं उपयोग नव्हता. त्या स्वारांपैकीं एकानें त्यास आपल्या घोड्यावर घेतलें आणि ते गडावर गेले.

ज्याप्रमाणें त्या तरुणीला पाहतांच राणाजी पूर्वीचें सर्व विसरून गेला होता त्याचप्रमाणें घडलेल्या एकंदर प्रकारानें त्याचे मनांतून ती तरुणी व तिच्याविषयींचा एकंदर मजकूर निघून गेला. त्यानें थोडा वेळ कांहीं विचार केला. नंतर घोड्याला शाबासकी देऊन व त्याचे अंगावरून प्रेमानें हात फिरवून तो आपल्या छावणीकडे चालता झाला.

** * * * * **
* * *
** * * * * **

राणाजी छावणींत येऊन पोंचला. सर्वत्र कूच करण्यास लागणाऱ्या तयारीची गडबड दिसत होती. आपल्या राजाला सुखरूप पाहतांच हरदेवाला व इतर फौजेला मोठा आनंद झाला. राणाजीनें आपल्या जखमांवर औषध लाविलें व उपहार केला. नंतर त्यानें सर्व फौजेला प्रोत्साहन देऊन सुमारें हजार फौज त्याच ठिकाणीं ठेविली व बाकीच्या फौजेनिशीं गडाकडे चाल केली.

थोड्याच वेळांत तो फौजेसुद्धां येऊन डोंगराच्या पायथ्याशीं थडकला व त्यानें आपला एक हुशार वकील गडावर पाठविला. त्याबरोबर पत्र दिलें होतें तें असें:—

"रणभीर महाराजांचे सेवेंत खालील मजकूर सादर असो. आपल्याला कळविल्याप्रमाणें मी आपल्या फौजेसह आलों आहें. न्यायानें चितोरगडाचा वारस मी आहें. तेव्हां आपण विचारपूर्वक गड स्वाधीन करावा. यांतच आपलें कल्याण आहे. आपण हें सरळ न्यायाचें मान्य केल्यास मी आपल्यास, आपल्यां पित्यास व बंधूस निराळें मानणार नाहीं. आपण माझें नातलग आहां हें मी जाणून आहें व त्याप्रमाणें मी आपला आदरही ठेवीन. हें आपल्यास मान्य नसल्यास युद्धाचा प्रसंग घालणें भाग आहे. श्री एकलिंगजी आपल्यास सद्बुद्धि देवो !"

थोड्याच वेळांत वकील गडावर येऊन पोंचला व रणभिरानें त्याची भेट घेतली. त्याला आतां बरें वाटूं लागलें होतें. कारण त्याचें अंगच काय तें हबकलें होतें. तो गडावर येतांच मंगलेनें त्याची चांगली शुश्रुषा केली व त्यामुळें त्यास पुष्कळ आराम वाटला होता. तोंच हमीराचा वकील जाऊन थडकला. मंगला तेथें होतीच. वकीलाकडून तिनेंच पत्र घेतलें व तें रणभीराकरितां मोठ्यांदा वाचलें. पत्रांतील मजकूर ऐकतांच रणभीर चवताळून उठला व आपल्या बहिणीच्या हातांतील तें पत्र हिसकावून घेऊन त्याच्या चिंधड्या करीत तो त्या वकिलाच्या अंगावर खेकसला, "चले जाव. राण्याला सांग जा मी लढाईस तयार आहें ह्मणून." इतकें आवेशानें बोलून तो पलंगावर पडला. तेव्हां मंगला ह्मणाली, "दादा, असा त्या वकीलावर किंवा पत्रावर राग करून काय होणार बरं ? बाबा इथं नाहींत, बनबीर दिल्लीला, तूं हा असा आजारी—"

"मी आजारी ?" रणभीर पुनः उठून कर्कश स्वरांत ह्मणाला, "मी आजारी ? कोण ह्मणतो ? पाहिजे तर आतां मी लढाईला जाण्यास तयार आहें. आण माझी तलवार." पण इतक्यांत त्याचें अंग ठणकूं लागल्यामुळें तो पुनः पलंगावर पडला. वकील बिचारा कधीं रणभीराकडे व कधीं घुंघट घेतलेल्या मंगलेकडे पाहात होता. रणभीर थकून पलंगावर पडलेला पाहतांच मंगला ह्मणाली, "दादा, अशानं तूं आपल्या प्रकृतीला अपाय करून घेणार बरं—मी सांगतें वकीलांना काय सांगायचें तें." नंतर ती वकीलाकडे वळून ह्मणाली, "चला हो बाहेर. मी त्या पत्राचें देतें उत्तर."

रणभीर पडल्या पडल्याच ओरडून ह्मणाला, "बस्स—बस्स—बाहेर जाण्याचें कांहीं काम नाहीं. सर्व कांहीं माझ्यासमक्ष झालें पाहिजे. केवळ तुझी बायकोचीच अक्कल नको आहे." अखेरचें वाक्य रणभीर इतकें तुटकपणानें बोलला कीं, मंगलेस त्यामुळें दुःख वाटलें व परक्यासमोर त्यानें आपला अपमान केल्याबद्दल तिला रागही आला. ती उद्वेगानें ह्मणाली, "बरं तर." असें ह्मणून ती वकीलाकडे वळून ह्मणाली, "वकीलसाहेब, उद्यां सकाळपर्यंतची आह्मी मुदत मागतों—"

"कोय जरूर ? एकदम लढाईला कां नाहीं सुरुवात करीत ?" रणभीर उसळून ह्मणाला, " मंगले, तुला इतकी युद्धकला येत असून व तूं स्वतः शूर असून त्याचा कांहीं उपयोग नाहींना ? "

" दादा, तें खरें; पण आपल्याला तयारीला कांहींच वेळ नको काय ? "

रणभीरानें कांहीं विचार करून ह्मटलें, " बरं—बरं. जाहो वकीलसाहेब. " तो कांहीं कुचेष्टेच्या स्वरानें ह्मणाला, " आपल्या धन्याला जाऊन सांगा, उद्यां सकाळीं ह्मणावं तुमची खुमखुमी जिरवूं." त्याचें तें भाषण ऐकून वकीलास राग आला. तरी तो हंसला. त्यानें त्या दोघांही बहीणभावंडांना मुजरा करून तेथून गमन केलें !

वकील परत राणाजीकडे आला. राणाजीनें सकाळपर्यंत वाट पाहण्याचा विचार केला. पण रात्रभर डोळ्यांत तेल घालून जागण्याचें ठरविलें.

इकडे रणभीरानें थोडें खाऊन एक चांगली झोंप ताणली. त्यामुळें त्यास पुष्कळ बरें वाटलें. लागलींच तो आपल्या तयारीला लागला. मंगलेनें त्यास ह्मटलें, " दादा, त्यांच्या पत्राचा कांहींच विचार करावयाचा नाहीं काय ? "

" कुणाच्या पत्राचा ? " रणभीरानें तिरस्कारानें प्रश्न केला.

" कुणाच्या ह्मणून काय विचारतोस ? "

" हां—हां तुझ्या नवऱ्याच्या होय ? " रणभीर तुच्छतेनें हंसून ह्मणाला, " ह्यः ह्यः. मंगले, बाबांच्या जिवावर उठणाराला तूं आपला पति कां समजतेस ? "

" कोण—कुणाच्या जिवावर उठलं बरं ? " मंगलेनें ओष्ठदंश करून पुसलें.

" हं, शत्रुला चिरडण्याकरितां असं करावंच लागतं. तुझ्या विवाहाचं नुसतं नाटक होतं नाटक—"

" बस्स दादा. समजलें मी—" असें ह्मणून मंगला तेथून निघून गेली.

रात्रभर रणभीरानें आपली तयारी केली. त्याचें सर्व लक्ष्य दिल्लीच्या

फौजेकडे लागलें होतें. हमीरदासानें राणाजीकडे बनवीराच्या सहीचें पाठविलेलें खोटें पत्र राण्यानें गडावर पोंचतें केलें होतें व त्या कपटाला रणभीर बळी पडला होता.

प्रातःकाल होतो न होतो तोंच राणाजीकडे एक पत्र आलें तें हमीरदासाचें. तें पाहतांच आतां कोठें राणाजीला त्याची आठवण झाली व काल तो भेटायला कां आला नाहीं याचें त्यास आश्चर्य वाटलें. कारण तो मनुष्य म्हटल्याप्रमाणें भेटण्यास चुकणारा नव्हे अशी राणाजींस पूण खात्री होती. तेव्हां त्यानें तें मोठ्या उत्सुकतेनें उलगडून वाचलें. तें असें:—

" आतां आपण युद्धाला सुरुवात करावी हें बरें. मीं गडांत प्रवेश करून घेतला आहे. आपली विशेष मनुष्यहानी न होतां गड खाली होईल अशी तजवीज मी लौकरच करितों. भेटीअंतीं सर्व कळेल."

पत्र वाचून संपतांच राण्यानें युद्धाची भेरी वाजविणारास आज्ञा दिली आणि फौजेस पर्वत चढण्यास हुकूम केला. हुकूम होण्याचा अवकाश. ' एकलिंगजी की जय ' अशी रणगर्जना करून राणाजींचें सैन्य गड चढूं लागलें. गडावर ही वदंता ताबडतोब कळली. त्याचेकडूनही तयारी होतीच. गडावरून तीर सुटूं लागले व त्यांतून आपला बचाव करीत करीत राण्याचें सैन्य तटाशीं जाऊन भिडलें. इतकें होण्यास सुमारें प्रहरभर दिवस वर आला.

तटाशीं जाऊन भिडतांच गडाला चारी बाजूंनीं वेढा देण्याचा राणाजीचा हुकूम सुटला. राणाजीकडील सैन्य आज किती दिवस अशी संधि पाहात होतें. ती आज प्रत्यक्ष आलेली पाहतांच त्यांचा उत्साह काय विचारावा ?

इकडे गडावरील तयारी बेताचीच होती. कारण मेराकडचा बंदोबस्त करून मालदेव लवकरच परत येणार होता. दुसरें, राणाजीला तहाचे बोलण्यावर झुलविण्याचें होतें, पण ते दोन्हीही हेतु फसले ! मालदेवास येतां आलें नाहीं. राण्यानें एकदम येऊन वेढा दिला. अर्थात् आहे त्या सैन्यानेंच रणभीर गड लढवीत होता. त्याला दिल्लीच्या फौजेची

मोठी आशा होती. तो त्याच आशेवर आपल्या फुटकळ फौजेस उत्तेजन देत होता.

ते दिवशीं ह्मणजे नवमीला दिवसभर दोन्ही पक्ष लढत होते. दोहीकडेही दम होता. पण संध्याकाळ झाली तरी तटाला शिड्याही लागेनात आणि उद्यां तर विजयादशमी ! राणाजीला मोठी चिंता वाटूं लागली. काय ? दुर्दैव त्याची प्रतिज्ञा पार पाडूं देणार नाहीं ? रात्रीं युद्ध थांबलें.

इकडे संध्याकाळपर्यंतही दिल्लीकडील फौज न आलेली पाहून रणभीराची मोठी निराशा झाली ! त्यानें दुसरे दिवशीं जोहार करण्याचें योजिलें !

दुसरा दिवस उजाडला ! आज विजयादशमी ! राण्याच्या प्रतिज्ञेचा दिवस ! राणाजीनें पाहिलें, दरवाजावरील बुरुजावर हमीरदास इकडे तिकडे फिरत होता. राणाजींची व त्याची नजरानजर होतांच तो निघून गेला. त्याच्या दर्शनामुळें राणाजीस हुरूप आला. इतक्यांत गडावरील लोक केशरी पोषाखांत दिसले ! त्याबरोबर जोहार होणार हें राणाजीस समजलें व त्यानें आपल्या लोकांस तशी सूचना दिली.

सूर्य क्षितिजावर थोडासा येतो न येतो तोंच गडाचा दरवाजा उघडला गेला ! राणाजीनें स्वतःच गर्जना केली. 'एकलिंगजी की जय !' सर्व सैन्यानें एकच आरोळी ठोकली. हरदेवाजवळ निशाण होतें. तो एकदम पुढें घुसला व बुरुजावर जाऊन उभा राहिला. राण्याचे सैन्यानें पुन्हा विजयघोष केला ! रणभीर हतवीर्य होऊन निघून गेला ! त्यानें लढण्याचा फारसा प्रसंगच घातला नाहीं आणि राणाजीनेंही पण त्यास अडविलें नाहीं.

राणाजींची प्रतिज्ञा पूर्ण झाली ! त्याच्या पूर्वजांचा गड त्यास मिळाला. त्यामुळें जिकडे तिकडे एकच आनंद उसळला !

———

* *    * *    * *    * *
*    *    *    *
* *    * *    * *    * *

यापूर्वी कधींही राणाजीचे सैन्यांत असा आनंद उसळला नव्हता! एका विस्तीर्ण पटांगणांत दरबार भरविण्यांत आला असून ज्याच्या त्याच्या इतमामाप्रमाणें बक्षिसें वाटण्याचें काम राणाजी एका मुद्दाम उभारलेल्या सिंहासनावर बसून करीत होता. आज त्याचा सर्व थाट सम्राटाला शोभण्यासारखा होता. प्रसन्नमुद्रेनें प्रत्येकाचें अभिनंदन करून त्यास पारितोषक द्यावें. घेणारानें बक्षीस घेऊन मुजरा करून बाजूला व्हावें असें चाललें होतें. सिंहासनापासून थोड्या अंतरावर मागील बाजूस हमीरदास आपल्या युद्धाच्या पोषाखांत उभा होता त्याची ही नेहमींची रीत. समारंभांत सभेंत तो असाच एका बाजूला राही. राणाजीकडे राहिल्यापासून त्यास कधींही, कोणाशीं बोलतांना अथवा मंडळींत मिसळतांना कोणीही पाहिलें नव्हतें. त्याचप्रमाणें त्याची मुद्रा, त्याची अंगलट, त्याचें रूप हेंही कोणी–राणाजीनें सुद्धां–पाहिलें नव्हतें. राणाजीनें पाहिले होते ह्मणजे जाळीआडून लुकलुकणारे डोळे! तेवढ्या-वरून रूपाची काय कल्पना होणार? असो.

प्रतापी राणा हमीर चितोरगडाचा अधिपति झाला, ही बातमी सर्वत्र तेव्हांच पसरली! ज्या ठाकरांना, सरदारांना त्याच दिवशीं भेट पाठवून आपली सहानुभूति आणि आदरबुद्धि व्यक्त करण्यास संधि होती, त्यांनीं येऊन आपला आनंद प्रदर्शित केला. राणाजीनेंही त्यांचें योग्य आगत-स्वागत केलें.

राणाजी ठळक ठळक बक्षीसें वाटून उठणार होता. त्याप्रमाणें काम उरकतांच त्यानें मागें पाहिलें व हमीरदासास पुढें येण्याविषयीं खूण केली. हमीरदास नम्रपणें पुढें आला. तेव्हां राणाजी त्यास ह्मणाला, " वीर पुरुषा, अप्रत्यक्ष रीतीनें तुझें आह्मांस फार सहाय्य झालें आहे. हें आह्मी आनंदानें कबूल करतों व त्याबद्दल आह्मी आभारही मानतों.

तेव्हां तुझ्या सेवेचें काय चीज करावें तें सांग. " राणाजीचें हें अभिनंदनपर बोलणें ऐकून हमीरदासास थोडी लज्जा वाटली असावी असें दिसलें. त्यानें खालीं मान केली. तो बराच वेळ स्तब्ध होता. राणाजी पुढें ह्मणाला, " आणि आतां तूं आपला सर्वतोपरी परिचय करून द्यावास अशी आमची इच्छा आहे. " तरीही हमीरदास गप्पच. राणाजी आश्चर्यानें ह्मणाला, " तूं बोलत कां नाहींस? तुझ्या योग्यतेप्रमाणें तुला खात्रीनें पारितोषक मिळेल. " यावेळीं हमीरदासानें वर पाहिलें. तो शांत स्वरांत ह्मणाला, " महाराजांनीं केलेल्या गौरवानेंच माझ्या सेवेचें सार्थक झालें. मी आणखी तें काय मागूं? आपल्या सेवेची पुढेंही अनुज्ञा व्हावी."

राणाजी ह्मणाला, " त्याचें पुढें पाहूं. तुझा परिचय झाल्यावर–"

" एका अटीवर मी परिचय करून देण्यास तयार आहें. "

" ती कोणती ? "

" मला एकान्त पाहिजे. "

राणाजी तात्काळ उठला! हमीरदासाचें कोडें केव्हां उलगडतें ? ही व्यक्ति कोण? हा अशा चमत्कारिक पद्धतीनें आपल्याशीं कां वागला ? इत्यादि शंकांचें आतां निरसन होणार, हें पाहून राणाजीस आनंद झाला. तो सिंहासनावरून खालीं उतरला. त्यानें पुढें होऊन हमीरदासाचा लोखंडी आवरण असलेला हात पकडला आणि तो चालूं लागला. यापूर्वीं हमीरदासाशीं इतकी सलगी त्यानें कधींही केली नव्हती. त्यामुळें हमीरदासास तें कसेंसें वाटलें असावें. कारण तो हळूच ह्मणाला, " आपण चलायचं, मी येतों मागून. " राणाजीनें वळून मागें पाहिलें व त्याचा हात सोडला. दोघेही महालांत गेले. दरबारांतील इतर मंडळीस हा प्रकार पाहून थोडें चमत्कारिक वाटलें. पण ज्याला त्याला आनंदाचा असा दुसरा विषय असल्यामुळें कोणाचें तिकडे फार लक्ष गेलें नाहीं.

जो महाल एका काळीं राणाजीकरितां रंगमहाल ह्मणून तयार केला होता त्याच महालांत राणाजी हमीरदासास घेऊन गेला. महालांत शिरते वेळीं व आंत गेल्यावरही त्यास कांहीं कौतुक व कांहीं आनंद वाटला. सुमारें महिन्यापूर्वीं याच महालांत राणाजीची कोण विटंबना!

पण आज ! आज तो तेथलाच राजा झाला होता ! दैवगति किती विचित्र !

राणाजी आंत येतांच तेथील एका कोचावर बसला व हमीरदासासही त्यानें आदरपूर्वक आपल्या जवळ बसण्यास सांगितलें. पण हमीरदासानें तें मान्य केलें नाहीं. तो थोड्या अंतरावर आदबीनें उभा राहिला. राणाजी-नेंही त्यास बसण्याचा आग्रह न करितां ह्मटलें, "वीरा ! काय असेल तें असो. तुझ्याविषयीं माझ्या मनांत एक प्रकारचा मोह उत्पन्न झाला आहे. तेव्हां तूं कोण हें सांगून मला संशयमुक्त कर. हो खरंच, तुझी एक अट आहे नाहीं कां ? ती कोणती बरें ? "

हमीरदास खालीं मान घालून कांहीं विचार करीत होता. राणाजी लक्ष्यपूर्वक त्याचेकडे पाहात होता. हमीरदास बोलूं लागला, " महाराज ! आपण चितोरगडचे अधिपति झालां, थोडेच दिवसांत आपण सर्वांचे सम्राट आणि राजस्थानचे मुकुटमणी व्हाल तेव्हां आपल्या वयाकडे पाहतां —" हमीरदास गप्प बसला. राणाजीस हें पाहून आश्चर्य वाटलें. हमीरदासानें ह्मटलेल्या दोन तीन वाक्यांचा संबंध कोणीकडे जाणार याचा त्यास कांहींही उलगडा पडला नव्हता. अर्थात् तो लक्ष्यपूर्वक ऐकत होता. तोच त्यानें आपलें भाषण आंखडलें.

राणाजी आश्चर्यानें ह्मणाला, " कां ? थांबलास कां ? "

" माझ्या बोलण्याचा राग तर नाहीं येणार ? "

" तुझ्या बोलण्याचा राग ? " राणाजी गोंधळून ह्मणाला, " तूं आपल्या मुख्य गोष्टीकडे एकदम येणार नाहींस, तर मात्र राग येईल. हं, आटप, सांग लौकर–"

" आज्ञा. " हमीरदास सांगूं लागला, " या राज्याला पट्टाभिषिक्त-राज्ञीची जरूर आहे. "

" ह्मणजे याचा काय अर्थ ? "

" काय, आपण विवाह नाहीं करणार ? हमीरदासानेंच उलट प्रश्न केला.

राणाजी अगदीं पुरता वेडा झाला. आपल्यासमोर असलेली व्यक्ति पिशाच्च तर नाहीं अशीही त्यास शंका आली. तो कांहींसा क्रुद्ध होऊन ह्मणाला, " यापुढें तूं प्रत्येक गोष्ट उघडपणानें बोल. नाहीं तर बलात्कारानें तुला मी उघडा करीन. "

" महाराजांना राग येण्याचें कारण नाहीं. आपली इच्छाच आहे तर स्पष्ट सांगतों. महाराजांना विवाह करावा लागणारच. तेव्हां त्यांनीं कृपा करून माझ्या एका तरुण भगिनीचा अंगिकार करावा आणि ही गोष्ट महाराजांनीं मान्य केल्यास मी आपली स्पष्ट ओळख देण्यास तयार आहें." हमीरदासानें जें कांहीं सांगितलें तें स्पष्ट शब्दांतच आणि राणाजीनेंही पण ऐकलें तें स्पष्टच. परंतु त्यापासून राणाजीस कांहींही उलगडा पडला नाहीं. गूढ तें गूढच राहिलें. तो अगदीं गोंधळून गेला. बराच वेळ तो अगदीं स्तब्ध होता. नंतर तो हमीरदासास ह्मणाला, " तुझें प्रत्येक कृत्य आणि प्रत्येक भाषण गूढ उत्पन्न करणारें आहे. अद्यापिही तुझें हृद्गत मला मुळींच कळलें नाहीं. विवाहाची कल्पना माझे डोक्यांत कधींच आली नाहीं. तेव्हां तूं घटकाभर जा. थोड्या वेळानें मी तुला हाक मारतों. मला तुझ्या संबंधीं सूक्ष्मतऱ्हेनें विचार केला पाहिजे. जा तूं. "

हमीरदास ह्मणाला, " माझ्यामुळें महाराजास त्रासच होत असल्यास माझें कांहींच ह्मणणें नाहीं. उलट मला आज्ञा असल्यास मी आपला एकदम चालता होतों. "

" छे छे, तसें नव्हे. पण मला विचार करूं दे. तुझ्यासंबंधीं मला मोहिनी पडल्यासारखें झालें आहे. " यावर हमीरदास बरेच मोठ्यांदा हसला ! तें हंसणें ऐकतांच राणाजी दचकला. तो एकदम ह्मणाला, " हां–हां. हें हंसणें मीं केव्हां तरी ऐकलेलें आहे." पण तितक्यांत हमीरदास तेथून निघून गेला.

राणाजी कोचावर मागें रेलला आणि विचार करूं लागला. त्याला एवढें खास वाटलें कीं, हमीरदास आपल्या परिचयाचा खास आहे. तो दोन रूपांनीं आपल्याशीं व्यवहार करीत असावा. पण तीं दोन रूपें कोणतीं ? असें विचार करितां करितां आणि विचारावरून विचार

सुचतां सुचतां त्यास आपल्या विचित्र विवाहाची, भुलैयाची, त्या दासीची, इत्यादि सर्व गोष्टींचें स्मरण झालें व अगदीं अखेरीस तो त्या तरुणीवर–बें करणाऱ्या तरुणीवर–येऊन थांबला व त्यास एक शंका आली. तो मनांत ह्मणाला, " दुर्गाष्टमी दिवशीं हमीरदासानें त्या टेंकडीवर मला बोलावलें होतें आणि तेथें तो आला नाहीं; पण त्याऐवजीं ती तरुणी आढळली! तेव्हां ती माझ्या नजरेस पाडण्याची त्यानें व्यवस्था केली असेल काय? ती तरुणी हमीरदासाची बहीण असेल काय? असंच कांहीं असलें पाहिजे. कारण तिच्या हंसण्यांत आणि आतांच्या हमीरदासाच्या हंसण्यांत फार साम्य. अशी शंका येतांच त्यानें एका नोकराकरवीं हमीरदासास पुनः बोलाविलें. तो येतांच राणाजीनें त्यास विचारिलें, " हमीरदास, तुझी बहीण अतिशय सुंदर पण मुकी आहे नाहीं?" हमीरदास आश्चर्यानें ह्मणाला, " माझी बहीण मुकी? नाहीं. ती अतिशय सुंदर आहे. पण मुकी नाहीं. उलट फार बोलकी आहे. "

राणाजी स्वतःशींच ह्मणाला, " हं! तरी मला वाटलेंच. तिनें ते दिवशीं सोंगच केलें तें. ठीक आहे. आज संध्याकाळीं मी पुनः जातों त्या टेंकडीवर! या स्वारीला हें सांगून ठेवावें. ह्मणजे हे तिला पुनः तिकडून पाठविण्याची व्यवस्था करतील. " असें आपल्याशीं ह्मणून नंतर तो उघडपणें ह्मणाला, " हमीरदास, मघाशीं तूं आपल्या बहिणीविषयीं मला जें कांहीं सांगितलेंस त्याचा मी विचार करून ठेवतों. आज संध्याकाळीं तूं मला त्या टेंकडीवर भेट. "

हमीरदास हंसून ह्मणाला, " संध्याकाळीं मी आलों तर येईन. मला उद्यां आपला विचार कळला तरी चालेल. मला कांहीं घाई नाहीं."

राणाजी पुनः स्वतःशींच ह्मणाला, " हं! आतां ही स्वारी बहिणीला खास पाठविणार आणि आज मी तिला बोलावयास लावणार. लबाड कुठली? मुक्याचें सोंग घेती. " असें ह्मणून तो स्वतःशींच हंसला. हमीरदास त्याकडे पाहात होता. पुनः त्यास राणाजीनें जाण्यास सांगितलें.

हमीरदास गेल्यानंतर राणाजी सारखा त्या तरुणीसंबंधीं विचार करीत होता. यापूर्वीं ह्मणजे त्यानें तरुण स्त्रिया पाहिल्या नव्हत्या असें

नाहीं; पण त्या तरुणीनें मात्र राणाजीच्या मनावर चांगलाच परिणाम केला होता. तिच्यासंबंधीं विचार करतां करतां तो इतका रंगला कीं, त्यास इतर कसलेंही भान राहिलें नाहीं. वास्तविक थोड्या वेळापूर्वीं त्यास गेल्या महिन्यांत घडलेल्या सर्व ठोकळ गोष्टी आवडल्या होत्या. अर्थात् मालदेवाच्या मुलीचें पुढें काय झालें ? भुलैया कोठें गेली असावी ? मालदेवाचा पुढें कसा काय बंदोबस्त करावयाचा ? दिल्लीकडील फौज आल्यास काय करावयाचें इत्यादि गोष्टींचा विचार त्यास करावयास पाहिजे होता; पण त्या सर्वांवर विस्मृतीचें पाणी फिरलें व राणाजीस ती मुग्ध तरुणीच सगळीकडे दिसूं लागली ! संध्याकाळ केव्हां होते असें त्यास झालें होतें. अर्थात् ती वेळ येतांच तो आपल्या घोड्यावर बसून अतिशय त्वरेनें त्या टेकडीवर गेला. पाहतो तों एका झाडाखालीं ती तरुणी आपल्या कोंकराशीं खेळत बसली होती.

---

* * * * * * * * * * * * * * * * * * * * *

मोरे आंगनवा गोविंदा, प्यारे ! आय जारे ।
प्यारे ! आय जारे ।
प्यारे ! आय जारे ।
बाँकि लटक पर, अटक रह्यो री मन ।
छबी अनूप सोहन तोरि चितवन ।
मोहन, मदन लजावन, छब मुस काय जारे ।
छब मुस काय जारे ॥ मोरे० ॥
जान असार, ये संसार, तुझसे प्यार, किनो यार
बारंवार हू बलिहार–सगरा, झगरा, मथुरा *
हियका मिटाय जारे
प्यारे आय जारे ॥ मोरे० ॥

---

* या कथानकांत भुलैयेच्या तोंडीं घातलेलीं सर्व पदें जयपूर ( राजपुताना ) येथील ' मथुरा ' नामक एका अर्वाचीन हिंदी कवियित्रीचीं आहेत. या कवियित्रीचीं पदें मोठीं प्रसादयुक्त आहेत.

लाच्छत चद्रमा.

आज कविरत्नांना पाझर फोडण्यास लावून काव्यरसाचा उद्रेक करणारी शरत् पौर्णिमा! आपल्या दुग्धधवल व स्निग्ध कांतीनें सृष्टि-सुंदरीला झाकून मानवी मनांना उत्फुल्ल करणारा भगवान रोहिणीनाथ शांत वृत्तीनें भुलैयेचें वरील भक्तिरसपरिपूर्ण गान ऐकत होता! लता-पल्लवांनीं सुशोभित केलेल्या एका दगडी सिंहासनावर आपल्या बंशी-धरास अधिष्ठित करून भुलैया त्याचे समोर बसली होती व ताली नादानें साथ धरून गात होती. प्रहर रात्र झाली असेल नसेल. ज्या भागांत भुलैया होती तो भाग अगदीं शांत होता. रात्रिंचर किड्यांचा किर-किराटही ऐकूं येत नव्हता. जणूं काय त्या भागांतील अखिल वस्तू त्या गावांत तन्मय झाल्या होत्या. एखादे वेळीं वाऱ्याची झुळक आल्यास येई. त्यामुळें वृक्षवेली क्वचितच हालत होत्या. वायूच्या लहरीनें त्यांचें शिरकंपन झाल्यास ते त्या गानामुळें मुग्ध होऊनच डोलत आहेत कीं काय असें वाटत होतें. स्वत: भुलैयेला याचें कांहीं एक भान नव्हतें. शरत् पौर्णिमेला ठाकूरजींना चांदण्यांत बसवून गाणें, कथाकीर्तन करण्याची राजस्थानांत चालच. त्याच चालीला अनुसरून भुलैयेनें त्या निर्जन प्रदेशांत आपल्या बंशीधरास सिंहासनावर बसविलें होतें. आणि त्यापुढें ती गात बसली होती. ईश्वरविषयक प्रेमानें तिचें हृदय अगदीं विव्हल होऊन गेलें होतें. तिनें घोळून घोळून पद म्हणावें आणि नंतर गद्गदलेल्या स्वरांत म्हणावें, "नाथ! क्या अभितक मेरी पुकार न सुनी? क्या आप कभीही मेरे आंगन में (हृदयांत) न आवोगे! प्यारे गिरधरजी, अजा मिळने आपको ऐसा क्या दिया जो आप उसने एक दफा पुकारते ही उसको आपके पास ले गये? क्या अभीतक मैं पापी हूं? मला बता ओ तो? नहीं लालजी. ये बात अच्छी नहीं! भला आपका नाम लेते कभी पाप रह जाता है? हे श्रीकृष्ण! हे मथुरेश! हे अनाथो के नाथ! सुनो–सुनो एक बारही सुनो! सिर्फ एकही दफा आपनी वो बाँकी छब दिखावो! हे बंशीधरजी. एकही दफे आपने बंसीकी एक तान सुनावो. क्या नहीं सुनावोगे! तो क्या फिर गाऊं? अच्छा, सुनो तो–" असें बडबडून तिनें पुन्हां गाऊं लागावें.

जगांत नानाप्रकारचे आनंद आहेत. पण निर्मलमनानें ईश्वर-गुणसंकीर्तनांत जो आनंद आहे त्याची तोड नाहीं ! भुलैया तोच आनंद लुटित होती. तिच्या या वेळच्या मानसिक स्थितीचें विश्लेषण करणें आमच्या सामर्थ्याबाहेरचें आहे.

अशा प्रकारें ती अत्यानंदांत लीन होती, तोंच त्या आनंदांत विष कालविण्याकरितांच कीं काय कोण जाणें, पराभूत झालेला रणभीर आपल्या पित्यासह तेथें आला. वास्तविक त्यांच्या वाटेवर भुलैयेचें स्थान नव्हतें. पण गायनामुळें त्यांना इकडे यावेसें वाटलें. आतां ते येथें एकाएकीं कसे आले तें पाहूं.

मंगलेच्या युक्तीप्रमाणें मालदेव मेर लोकांवर गेला खरा; पण या वेळीं त्या लोकांची तयारी चांगली असल्यामुळें उलट मालदेवाचाच पराभव झाला व त्यास तहाचें बोलणें लावणें भाग पडलें. इतकें होतें तों इकडे रणभीरही अपयश घेऊन आपल्या पित्याकडे गेला. अशा प्रकारें यांचा पडता काळ आलेला पाहून त्यांच्या फौजेनेंही त्यास सोडलें. कांहीं थोड्या लोकांसह दोघेही पितापुत्र, पुनः चितोडास जाऊन हमीरास प्रसन्न करावें आणि आपली डळमळीत जागा स्थिर करावी आणि नंतर बनबीर दिल्लीला आहेच त्याचे मदतीनें दिल्लीची मदत मागवून पुनः राणाजीला चापावा असा पोक्त विचार करून परत येत होते. गडावरील जोहाराचे गडबडींत मंगला पडली असें रणभीरास कोणीसें सांगितलें होतें; पण त्यास तें खरें वाटलें नाहीं. ती बहुतेक राण्याचे तडाक्यांत सांपडून त्याच्या कैदेंत असावी अशी त्यांची कल्पना होती. पण गड एकाएकीं खालसा कसा झाला, याचें दोघांनाही आश्चर्य वाटत होतें. मालदेवाची कल्पना बनबीरानें पितृद्रोह केला; पण रणभीरास कांहीं हें खरें वाटलें नाहीं. फितुरीमुळें गड हातचा गेला हें खरें; परंतु तो फितुर बनबीराकडून झाला असेल असें त्यास वाटेना. मग दुसरा फितुरी कोण ? अशा शंका-कुशंका काढीत ते गडाकडे येत असतां आज त्यांचा मुक्काम भुलैया असलेल्या स्थानापासून जवळच्या एका खेड्यांत पडला. तेथें त्यांना भुलैयेचें सुश्राव्य गायन ऐकूं गेलें. गांवांतील लोकांनाही तें ऐकूं येत होतें; पण त्यांच्या धर्मभोळ्या समजुतीमुळें कोणाचीही उत्कंठा ' हें

कोण गातें ? चला जाऊन पाहूं ' येथपर्यंत आली नाहीं; रणभीर-मालदेवास मात्र तसें वाटलें व तात्काळ ते पायींच तिकडे निघाले व थोडा वेळ शोध काढतां काढतां अपेक्षित स्थानीं येऊन पोंचले. असो.

भुलैंयेला पाहतांच दोघेही अगदीं आश्चर्यचकित झाले ! दोघे किती वेळ तरी तटस्थ वृत्तीनें तिच्याकडे पाहात होते. रणभीरास तर तात्काळ, तिचा तो भगवा पोषाख, तिची ती शांतिदायक मुद्रा, तिचें तें भक्तिरसपूर्ण गान आणि तिची ती तन्मयता पाहून, तिच्याविषयीं भक्ति वाटूं लागली. पण मालदेवास मात्र तसें कांहीं वाटलें नाहीं. तो स्वभावतः दुष्ट. त्यांत त्यास जगाचा बराच अनुभव. त्याची भक्ति आणि तीही एकाएकीं त्याच्याजवळ असलेल्या स्त्रिवर केवळ बाह्य देखाव्याला पाहून कशी बसावी ? त्यास तर हंसूं येऊं लागलें. तें पाहून रणभीराला कांहीं आश्चर्य वाटलें व कांहीं वाईट वाटलें.

इकडे भुलैंयेला त्या दोघांच्या आगमनाची मुळींच खबर नव्हती. ती पुनः गातां गातां थांबली व ह्मणाली, " हे गोविंद ! हे राधारमण ! आप कहां गये ? आवो–आवो ! अब हृदय तुह्मारी विरह सहन नहीं कर सकता–" असें ह्मणून तिनें बंशीधरापुढें डोकें टेकलें व ती हुंदके देऊं लागली ! दोन व्यक्ति हा प्रकार पाहात होत्या. पण दोघींच्याही मनांत किती भिन्न विचार ? रणभीर मनांत ह्मणाला, "भुलैंया–आज तूं धन्य आहेस ! मानवी देहांत वावरणाऱ्या किती प्राण्यांना ईश्वरविषयक विरह असह्य वाटत असेल ? रड–भुलैंया–आपल्या त्या मुर्तीपुढें डोकें ठेऊन तूं अशीच रड ! तुझ्या अश्रूंची किंमत फार मोठी आहे ! भगवान् तुझ्या त्या अश्रूंची किंमत तुला दिल्यावांचून राहणार नाहींत ! दीनवत्सल प्रभु स्वतः येऊन तुझे ते अश्रु पुसतील ! "

याच वेळीं मालदेव स्वतःशीं ह्मणाला, " भुलैंया ! सोंग तर तूं खूब आणलेंस ! आहे–तुला सर्व साधतें बरें कां ? या अशा वेषांतही तुझें सौंदर्य कसें खुलून दिसतें. यावरून मी तुला सुंदर ह्मणत असें तें खोटें नाहीं ! "

चाललेल्या कथानकांतील हा भाग वाचून विचारी वाचकांच्या मनांत किती तरी विचार येतील ? वर सांगितलेला प्रकार जगांत प्रत्यहीं

घडत नाहीं असें कोण ह्मणेल ? जगांत प्रत्येक व्यक्तीचें कार्य आणि रूप अशा दोन दृष्टींनें पाहिलें जातें. थोडक्यांत सांगायचें ह्मणजे प्रत्येक दुसऱ्यावर जासुदगिरीचें काम करीत असतो असें ह्मणण्यास हरकत नाहीं. असो.

भुलैंयेनें पुनः डोकें वर उचललें ! अश्रूंनीं तिचे दोन्ही कपोल भिजले होते. ती करुणदृष्टीनें मूर्तीकडे पाहात ह्मणाली, " हे करुणाघन ! तुह्मारा नाम लेनेसे चित्तशांति मिलती है ? फिर मुझे दुःख क्यों ? क्या मैं कहां चुकती हूं ? अच्छा. जो मेरा मार्ग गलत है तो आप बतलाते क्यों नहीं ? आवो—हे हरी ! पधारो और अपने बेटी का उद्धार करो !" याच वेळीं मालदेवानें कुचेष्ठा करण्याचे हेतुनें हाक मारिली, " भुलैंया !" भुलैंयेनें दचकून वळून पाहिलें ! दोन मूर्ति तिच्या नजरेस पडल्या ! ईश्वरस्वरूपांत तन्मय झालेल्या भुलैंयेस त्या देवच कां वाटणार नाहींत? अहाहा ! किती आनंदानें तिनें ह्मटलें, " कौन ? प्यारे श्रीकृष्ण !" आणि असें ह्मणून तिनें मालदेवाचे जवळ जाऊन त्याच्या—त्या पापी, कुचेष्टेखोर मनुष्याच्या—पायावर मस्तक ठेविलें ! आपल्या अश्रूंनीं त्याच्या पायांस स्नान घालीत ती ह्मणाली, " नाथ, क्षमा करो ! क्षमा करो !! मैं बडी पापी हूं—नाथ, आप क्यों आये ? हे भगवन् ! हे दीनवत्सल ! हे कृपानाथ ! हे श्रीकृष्ण !! हाय ! हाय !! आप मेरे लिये भी पधारे ! नाथ ! आसूं नहीं रुकते ? डर लगता है. कहीं मेरे पापिनी की आसूं से आप के पैर धधक न उठे ! कहीं उनके ऊपर फोडें न आ जाय ? नहीं नहीं नाथ ? ये दोघे मैं अपने कपडे से उसको पोंछती हूं ! हे रमारमण ! आप के पैर कितन नाजूक है ? कितने सुंदर है ? नाथ ! मन में आता है छाती से लगा लूं ! पर नहीं—शायद हो की, मेरे पापीहृदय के घोर उष्णता से वे कालें पड जाय !" असें अगदीं अतिशय गद्गद्लेल्या स्वरांत ह्मणून तिनें त्याचे पाय पुसले व आपले दोन्ही हात त्यांचे वर ठेऊन तिनें प्रणाम केला ! भक्तिरसाचा उद्रेक झाला व त्यांत तो ती गाऊं लागली.

**सुना दो शाम बंसी की, मनोहर तान थोडीसी**
**बहुत बीति फजुली में है बाकी हाल थोडीसी**

**मनोहर प्रेम सरसानी, मधुर है रसभरी बानी**
**सुना दो प्यारे दिलजानी, अजी गोपाल ! थोडीशी.**

हा प्रकार पाहून त्या दोघांसही प्रथम मोठें चमत्कारिक वाटलें. मालदेवाची तर तिचा स्पर्श होतांच फार चमत्कारिक अवस्था आली ! क्षणभर तरी त्याचें पापी मन विरघळलें ! रणभीर तटस्थ-वृत्तीनें भुलैंयेकडे पाहात मोठ्यांदा ह्मणाला, " बाबा, आपण येथें आलों ही चूक केली. आतां आपण तिची कांहीं कुचेष्टा तरी करूं नका." या वेळीं भुलैंयेनें आपले हात त्याचे पायावरून काढून घेतले होते. त्यामुळें मालदेव पुनः कोराच्या कोरा झाला होता. तो ह्मणाला, " ह्यः ! रणभीर ! तुला ही मोठी भक्तीण दिसते ! वेडा आहेस ! मी आतां तिचें हें सोंग उघडकीला आणतों बघ." असें ह्मणून तो कुचेष्टेनें मान हालवीत तिचेकडे पाहूं लागला व रणभीर कांहीं बोलणार तोंच मालदेवानें उजवा हात तिच्या डोक्यावर ठेवला व त्यास एक हिसडा देऊन ह्मणाला, " अहो भक्तीणबाई, पुरें आतां अं ! तुमची भक्ति पाहून मी अगदीं प्रसन्न झालों आहें. तेव्हां पूर्वी केलेल्या सर्व पापांची क्षमा करून मी पुनः तुह्मांस आपल्याजवळ ठेवण्यास कबूल आहें !

" शिव ! शिव ! ! " असें ह्मणून रणभीरानें कानावर हात ठेवले ! मालदेव तें पाहून मोठ्यांदा हंसला ! पण या प्रकाराचें त्या तन्मय झालेल्या विभूतीस कांहींही भान नव्हतें ! आपल्या हाकेला भगवान् धावून आले ! आपण इतक्या पापी असूनही केवळ भक्तांचा दास बनलेला देव आपल्यालाही विसरला नाहीं अशीच भुलैंयेची कल्पना व त्यांतच तिचा आनंद ! आणि आनंद कां असणार नाहीं? सारें जग जेथें देव-स्वरूप दिसूं लागलें तेथें मालदेव कां दिसणार नाहीं? मालदेव स्वतःपुरताच पापी होता. भुलैंयेला तो श्रीकृष्णच होता !

भुलैंया आपल्याच नादांत आहे, हें पाहून मालदेवानें पुनः तिला हालविलें ! रणभीरास आतां राहवेना. तो ह्मणाला, " बाबा, हें लक्षण कांहीं ठीक नाहीं. चाललेल्या प्रकारांत सर्व सोंग आहे, असें आपल्यास वाटतें तरी कसें ? "

" का बरें ? मला तर तिचें हें सर्व सोंग वाटतें. पण थांब, तुला तें दाखवितोंच. " असें ह्मणून पुनः त्यानें भुलैयेस हालवीत ह्मटलें, " तुझा तो कृष्ण मेला ! पार त्याचा नायनाट झाला ! मी मालदेव आहें-नीट डोळे उघड न् पाहा ! " दुष्टांच्या दुष्ट वाणींत ब्रह्मानंदालाही दहन करण्याचें सामर्थ्य आहे काय ? कोणास माहीत ? पण भुलैयाची गुंगी मात्र त्यानें उतरली खरी ! तिनें दचकून वर पाहिलें. ती उठून उभी राहिली व मालदेवाकडे पाहूं लागली ! तें पाहून मालदेव मान हालवीत ह्मणाला, " हं-अस्सें ! पाहिलेंस मी कोण तो ? मी मालदेव आहें. ओळखलेंस-होय ओळखलेंस ! बोल-" आपल्या कमरेवर दोन्ही हात ठेऊन व पायांतील अंतर वाढवून तो ह्मणाला, " हं सांग-हें सोंग केव्हांपासून घेतलेंस?

" श्रीकृष्णांनीं मला सांगितलें ! "

मालदेव हंसला ! तो ह्मणाला, " तो कृष्ण कुठें आहे ! "

भुलैयेनें वळून बंशीधराकडे बोट दाखविलें ! पुनः मालदेव हंसला व ह्मणाला, " भूल ! तुझ्या डोळयांत कांहीं विकार दिसतो. तो दगड आहे दगड ! नीट पहा ! "

रणभीर आपल्या बापास खेचीत ह्मणाला, " बाबा, आतां हें फार झालें. चला-चला येथून मुकाट्यानें. " " थांबरे, मला हिचा देव बाहेर काढूं दे ! "

भुलैया हंसली. ती ह्मणाली, " मालदेव, काय ही आपली वेडी कल्पना ? जिथं देव सर्वत्र आहे तिथं आपण त्याला बाहेर तरी कुठं काढणार ? आणि आंत तरी कोंडून कुठं ठेवणार ? भक्त हा नेहमीं आपल्या शक्तीप्रमाणें देवाला लहान मोठें रूप देऊन त्याची आराधना करीत असतो. त्याचप्रमाणें माझा हा बंशीधर ! मालदेव, आपल्याला माझ्या बोलण्याचें हंसूं येतें. पण वर पहा-काय या चंद्रांत देव नाहीं ? जर नाहीं तर त्यांत प्रकाश कोठून आला ? त्या चांदण्या पहा-कशा आपआपल्या मार्गानें पथ आक्रमित आहेत ? त्या कोणाच्या आहेत बरें ? हे वृक्ष पहा-फळें आणि छाया देऊन जगाच्या उपयोगी पडत आहेत. त्यांत देव कसा नसेल ? या वेलीपहा. फुलें देऊन आपलें देवत्व दाखवित

आहेत. तो जवळचा ओढा पहा—जीवन देऊन सर्वांचें जीवन राखतो आहे आणि देव आहे ह्मणून सांगत आहे. झाडावर राहणारे पक्षी पहा—ते सारे देवस्वरूपीं आहेत! मालदेव, प्रत्यक्ष तुह्मी पहा—देवच आहांत! अद्यापिही आपण हंसतांच आहां. देव नाहीं असेंच आपणास वाटतें काय?" कवंडराला मधुरता कोठून येणार? मालदेव ह्मणाला, "भुलैया, तूं बोलण्यांत पूर्वीपेक्षांही चतुर झालीस! चल आतां. पुरें झालें हें सोंग." असें ह्मणून तो तिचा हात धरणार तोंच त्यास एक जोराचा धक्का बसला! त्यानें मागें पाहिलें तों कोणी नाहीं. रणभीर तर दूर उभा! मग धक्का कोणी दिला? एक कुशंका त्याचे मनांत आली. भुलैया भूत तर नसेल? ही शंका त्याचें मनांत येण्याचा अवकाश. त्यानें तिच्याकडे टवकारून पाहिलें तों त्यास एका भुलैयेच्या ठिकाणीं दोन भुलैया दिसूं लागल्या. त्यानें डोळे चोळून पाहिलें तों तीन, जास्त निरखून पाहिलें तों चार! मालदेवास भीतीनें कंप सुटला! त्यानें रणभीरास हाक मारून ह्मटलें, "रणभीर, असा जवळ ये." रणभीर जवळ येतांच त्यानें कांपत कांपत ह्मटलें, "तें पाहिलेंस कां? मला वाटतें, ती भूत आहे! पळ—पळ—अरे बापरे—" असें ह्मणत त्यानें पळ काढला! रणभीरही त्याचे मागोमाग निघून गेला.

ते गेल्यावर भुलैया आपल्या देवापुढें येऊन बसली. ती ह्मणाली, "देवा! तुला नाहीं ह्मणणारांना तूं आहेस हें कसें दाखवावें बरें? गुरुमहाराजांनीं सांगितलें कीं, देव कुठें नाहीं तें स्थान सांग. विचार करून पाहातें तर असं वाटतं, तुह्मी सगळीकडे आहांत. बरें, सगळीकडे आहांत ह्मणावें तर मला प्रत्यक्ष मुळींच दिसला नाहीं. तेव्हां मी आपल्यास आहे ह्मणूं कीं नाहीं ह्मणूं? भुलैयेचे मनांत असे विचार येण्यास मालदेवाचा त्या स्थळांत कांहीं वेळ वास हेंच होय. कोळसा कोठेंही पडेना, त्याचा थोडा तरी काळेपणा लागायचाच! ह्मणूनच संतमंडळीचा सत्संगतीबद्दल एवढा अट्टाहास!

पण थोड्या वेळानें तिचा मोह दूर झाला व ती आपल्या आनंदांत मग्न झाली!

———

* *  * *  * *  * *
*  *  *  *  *  *
* *  * *  * *  * *

राणाजीचें मन दोन कोड्यांमध्यें सारखें हेलकावे खात होतें. एक कोडें हमीरदास कोण आणि ती तरुणी खरोखरच मुकी आहे कीं कसें? आणि दुसरें तिचा व हमीरदासाचा कांहीं संबंध आहे कीं नाहीं? या दोन कोड्यांनीं त्याच्या मनाची अस्वस्थता करून सोडली होती. बलात्कारानें कोडीं सुटणें कांहीं अशक्य नव्हतें. पण यांत एका विशिष्ट मनोविकाराचा उद्भव झाला होता. तो विकार ह्मणजे प्रेम होय! अर्थात् प्रेमाचे राज्यांत बलात्काराला स्थान कसें मिळणार? तेथें आंधळ्या कोशिंबिरीचेंच काम! प्रेमाचें गूढ नेहमीं गूढच असलें पाहिजे. तें सुटण्याऐवजीं जास्त जास्त रहस्यमय बनत गेलें पाहिजे. तरच त्याचें स्वारस्य! राणाजीला त्यापासून एक प्रकारची मानसिक अस्वस्थताही उत्पन्न झाली होती; पण त्याच वेळीं एका प्रकारचा आनंदही त्यास उपभोगण्यास सांपडत होता. तेव्हां त्या गूढ आनंदास बलात्काराचा प्रकार योजून राणाजी कसा गमावील?

त्या दिवसानंतर—हमीरदासानें आपल्या भगिनीबद्दल विनंति केल्यानंतर—तो राणाजीस एकच वेळीं भेटला! राणाजीनें त्यास नानाप्रकारें 'तुझी बहीण मुकी आहे कां? ती अमक्या ठिकाणीं राहाते कां' ह्मणून प्रश्न करावा. त्यावर हमीरदासानें आपली बहीण मुकी नसल्याचें निक्षून सांगावें.

इकडे त्या तरुणीशींही राणाजीचा बराच परिचय झाला. तिची आणि राणाजीची आतांपर्यंत ह्मणजे या पंधरा दिवसांत पांच सहा वेळां तरी भेट झाली. अलीकडच्या एक दोन भेटींत तिनें राणाजीशीं खुणेनें बोलत बसण्यांत बराच वेळ घालविला होता. त्यावेळीं राणाजीनें तिला खुणेनें व जमिनीवर मातींत लिहून दाखवून 'तूं खरोखरीच मुकी आहेस कां? तुला एखादा भाऊ आहे कां?" असे प्रश्न करी. त्याचें उत्तर ती मानेनें नकार दाखविण्यांत देत असे. असो.

## लांच्छित चंद्रमा.

हिंदुस्थानांत सर्वत्र मंगलमय मानण्यांत येणाऱ्या दिपवाळीस सारा पांच दिवसांचा अवधि होता. आज राणाजीची त्याच्या जादुगाराशीं— त्या मुक्या तरुणीशीं—भेट होणार होती. आजच्या भेटीवर राणाजीचें पुढील आयुष्यसौख्य अवलंबून होतें. त्या तरुणीनें आपण मुकी आहों असें कितीही सांगितलें तरी आपल्यास तें खरें वाटत नाहीं, असें तो स्वतःशीं वारंवार ह्मणत असे. आज त्यानें अखेरचा प्रयत्न करून पाहण्याचा निश्चय केला होता.

सायंकाळचा समय होत आला ह्मणून राणाजी गडबडीनें पोषाख करून आपल्या संकेतस्थानीं आला. एका वटवृक्षाखालीं ती तरुणी आपल्या कोंकराशीं खेळत बसली होती. राणाजीला पाहतांच ती उठून उभी राहिली. परिचय झाल्यापासून ती त्याच्याशीं आदबीनें वागे. राणाजीनें मात्र आपण ‘ राजा ’ आहोंत हें सांगितलें नव्हतें. राणाजीजवळ येतांच त्यानें घोड्यावरून खालीं उडी टाकिली. हिनें त्याचे नेहमीं-प्रमाणें अभिवादन केलें. आणि त्याच्या घोड्यास चुचकारून एका झुडुपास नेऊन बांधलें. आज हें तिनें विशेष केलें. राणाजीला हें पाहून मोठा आनंद झाला. तो वटवृक्षाखालीं मुद्दाम साफ केलेल्या एका पाषाणावर येऊन बसला. त्या तरुणीचें कोंकरूं त्याचे आजूबाजूनें बागडूं लागलें. तरुणी जवळ येऊन उभी राहिली. राणाजीनें एकवार तिचेकडे पाहिलें. लज्जेनें तिनें आपलें तोंड फिरविलें. राणाजीनें तिचा हात धरून तिला आपल्याजवळ बसविलें. तो ह्मणाला, “ आज मी तुला स्पष्ट आणि अखेरचें विचारतों, तूं मुकी खास नाहींस. बोल, हें खरें ना ?” ती तरुणी दूर अंतरावर असलेल्या एका गर्द जाळीकडे बारकाईनें पाहात होती. राणाजीच्या बोलण्याकडे तिचें लक्ष नसावें. तें पाहून राणाजीनें तिच्या खांद्यावर हात ठेवून तिला हालविलें. तोंच ती दचकून उठली आणि त्या जाळीकडे बोट करून ओरडली “ हूं हूं ! ” राणाजीनें त्या जाळीकडे पाहिलें; पण त्यास तेथें कांहींही दिसलें नाहीं. तो तिला विचारूं लागला, “ काय आहे ? ” पण त्याचें तिनें उत्तर दिलें नाहीं. ती त्या जाळीकडे पाहात राणाजीभोंवतीं दबत दबत फिरूं लागली. राणाजीला अतिशय आश्चर्य वाटलें. त्यानें निरखून पाहण्याची पराकाष्ठा

केली; पण त्यास कांहींही दिसलें नाहीं. त्या तरुणीला कसला तरी भास झाला असावा, असें त्यास वाटलें व त्याप्रमाणें तो तिला सांगणार तोंच, " महाराज, तीर आला–आला ! " असें ती मुकी तरुणी ओरडली ! तिचे शब्द संपतात न संपतात तोंच एक तीक्ष्ण तीर त्या शूर अबलेनें आपल्या उजव्या तळहातावर आडवून राणाजींचें रक्षण केलें ! तो तीर तिच्या हातांत आरपार घुसला ! राणाजी एकंदर प्रकार पाहून अगदीं भांबावून गेला. एकाच वेळीं त्याचे मनांत तरुणीला वाचा असल्याबद्दल आनंद, बाण कोणी दुष्टानें मारिल्याबद्दल क्रोध आणि आपले रक्षणाकरितां त्या तरुणीनें साहस केलेलें पाहून आश्चर्य हे विकार उत्पन्न झाले ! ती तरुणी घायाळ होऊन पडणार तोंच राणाजीनें तिला सांवरून धरली ! तरुणी क्षीण स्वरांत ह्मणाली, " महाराज, मुक्याचें नाटक फसलें. क्षमा करा. खालीं वाडींत चला. " राणाजीनें तिला अलगद उचलून घोड्यावर बसविलें आणि आपण तिच्यामागें बसून त्यानें तो घोडा प्रथम त्या जाळीकडे वळविला. पुन: एक दोन तीर सूं सूं करीत आले; पण राणाजीनें ते चुकविले व त्यानें तलवार उपसून जाळीकडे चाल केली. थोड्याच वेळांत तो तेथें जाऊन पोंचला. तरुणी अगदीं बेशुद्ध झाली होती. एका हातानें तिला सांवरून, तलवार हवेंत नाचवीत तो ओरडला, " त्या जाळींत कोण आहे बद्माष ! " रणभीर व मालदेव एकदम पुढें घुसले ! राणाजीला आश्चर्य तर वाटलेंच; पण तात्काळ त्यानें त्या दोघांस आपलें अति कौशल्य दाखविण्याचा निश्चय केला. ते दोघेही बापलेक पायींच लढत होते. राणाजी खरोखरीच खंदा लढवय्या होता नाहीं तर एका हातानें घोडा धरून व त्याच हातानें एका बेशुद्ध स्त्रीला सांवरून धरून दोघांशीं लढण्याचा प्रसंग घालणें लेच्यापेच्या वीराचें काम नव्हतें. थोड्याच वेळांत रणभीराला वार लागून त्याची तलवार मोडली. त्याबरोबर त्या दोघांनींही तेथून पलायन केलें. राणाजी त्या तरुणीला घेऊन खालच्या वाडींत गेला. तिचें घर तेथें होतें. असो.

राणाजीनें त्या तरुणीस तिच्या घरीं पोंचविलें. तिचे आईबाप हातारे होते. त्यांनीं राणाजीचे मन:पूर्वक आभार मानले. हर्षितचित्तानें तो गडावर आला.

राणाजीचें मन आतां किती प्रसन्न! ज्या तरुणीवर तो अनुरक्त होता, ती तरुणी मुकी नसून बोलकी आहे. तिच्या सौंदर्यावरून पाहतां ती उच्चकुलजाही असावी. तेव्हां तिला आपली अर्धांगी करून घेण्यास कसलीही हरकत नाहीं असें त्यास वाटूं लागलें. त्या तरुणीला दुखापत झाली हें एकप्रकारें बरें झालें. कारण त्यामुळें तर आपली एक शंका निवारण झाली असें त्यास वाटलें. ती तरुणी आपल्यावर प्रेम करीत असलीच पाहिजे हें तिनें केलेल्या साहसावरूनच स्पष्ट दिसलें. जर तिनें तो जोरानें मारलेला तीर आपल्या हातावर झेलला नसता तर राणाजीच्या कंठनाळावरच त्याचा रोख होता!

राणाजीला आनंद झाला होता खरा; पण अद्यापिही त्याला विचारानें सोडलें नव्हतें. त्या तरुणीनें असें मुक्याचें व्रत कां धरलें होतें? जर आपलें तिच्यावर प्रेम होतें तर हें नाटक कां? हा विचार त्याचे डोक्यांत वारंवार येत होता.

ती रात्र राणाजीनें कशी बशी काढली! अगदीं सकाळींच तो गडावरून खालीं उतरला व वाडींत गेला. झोंपडीसमोरच त्या तरुणीचा वृद्ध पिता लोटून झाडून काढीत होता. राणाजीला पाहतांच त्यानें आदरपूर्वक पुढें होऊन त्याचें स्वागत केलें.

शिष्टाचाराप्रमाणें बोलणें झाल्यावर राणाजी अंगणांत पसरलेल्या घोंगड्यावर बसला व त्यानें त्या वृद्धासही आपल्याजवळ बसण्यास सांगितलें. नंतर त्यानें आपल्या प्रणयिनीच्या प्रकृतिबद्दल कुशलप्रश्न विचारून, हळूंच तिच्या विवाहासंबंधीं गोष्ट काढली. वृद्धानें बराच वेळ दादच दिली नाहीं. "ती अद्याप लहानच (!) आहे. तिच्या मनांत लग्नच करायचें नाहीं. तिचें एकीकडे जुळतें आहे" इत्यादि नानाप्रकारच्या गप्पा त्यानें मारल्या. मात्र या गप्पा तो फार जोरानें बोलत होता. जणूं काय आपलें संभाषण दूरपर्यंत ऐकूं जावें अशीच त्याची इच्छा होती. राणाजीनें त्यास नानाप्रकारानें मोडून काढलें, लालूच दाखविली व मधून मधून थोडा धाकही घातला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मग मात्र राणाजीला थोडा राग आला. तो आणीबाणीवर येऊन

ह्मणाला, " बाबाजी, मी कोण आहें माहीत आहे ना ? मी इतका वेळ खोटेंच दुसरें नांव सांगितलें. पण माझ्याकडे पाहा. मी तुमचा राजा आहें. समजलांत ! माझी आज्ञा तुह्मी मानलीच पाहिजे. आपल्या मुलीच्या कल्याणाकडे पाहाणें आपलें कर्तव्य आहे."

आपण राजा आहों हें कळतांच तो वृद्ध नरम येईल, अशी राणाजीची कल्पना. पण तसें कांहींच झालें नाहीं. तो प्रथम किंचित् हंसला आणि नंतर ह्मणाला, "गरीबाच्या घरीं आपण पायधूळ झाडली हें आमच्यावर उपकारच आहेत. पण आपण प्रथम ज्याप्रमाणें खोटें सांगून नंतर खरें सांगितलेंत त्याचप्रमाणें मलाही पण करणें भाग आहे. माझ्या मुलीचें लग्न होऊन चुकलें आहे. तें त्याचें उत्तर ऐकतांच राणाजी प्रथम तर चपापलाच, पण मागून तो ह्मणाला, " नाहीं; ही गोष्ट अक्षरशः खोटी असली पाहिजे."

"आपल्याला तसें वाटल्यास मी काय करूं ? खरी गोष्ट मीं सांगितली."

आपल्या कन्येच्या कल्याणाविषयीं आपण बरेच बेफिकीर दिसतां !"

नाहीं महाराज, उलट मी तिला आपल्याला न देण्यांतच कल्याण समजतों."

" तें कसें काय ? "

" तिला मी सवतीवर देऊं इच्छित नाहीं."

" ह्मणजे ? "

" ह्मणजे काय ? मालदेवाच्या मुलीशीं आपण लग्न केलेंत. आपण तिला टाकली. आतां आपण माझ्या पोरीवर भाळलां. उद्यां तिसरीच्या नादीं लागून माझ्या पोरीचा घात कराल."

राणाजी ढेंकळाप्रमाणें विरघळला ! त्यावर त्यास कांहीं बोलतांच येईना. मात्र त्यास मालदेवानें येथेंही अप्रत्यक्ष रीतीनें आपल्या सुखांत बिब्बा घातला हें पाहून त्यास फार क्रोध आला. तो ह्मातारा पुढें ह्मणाला, " मालदेव अद्याप जिवंत आहे. त्याची पोरगीही जिवंत असेल. मी आपली मुलगी दिली आणि उद्यां त्या मंडळींनीं येऊन माझें नरडें धरलें ह्मणजे मी तुह्माला कुठं हुडकायला जाऊं ? "

राणाजीला त्याचें तें बोलणें पटलें. मालदेवाचा व त्यांच्या पोरांचा पक्का बंदोबस्त केल्याखेरीज आपल्यास सुख मिळणें कठीण आहे, असेंच त्याच्या मनानें घेतलें. तो उठत झणाला, " मी त्यांचा पक्का बंदोबस्त केल्यावर मग तर तुझी संमती द्याल ना ? "

झातारा शांतपणें झणाला, " तें पुढें पाहूं. माझी मुलगी कांहीं आतां लहान नाहीं. तिच्या विचारानें हें सर्व झालें पाहिजे."

" ठीक आहे." असें झणून राणाजीनें चितोरवर आरोहण केलें आणि तो गडाकडे वळला. मार्गानें मालदेवाची कन्या कोठें असावी, तिचा बंदोबस्त करायचा झणजे काय, याचे विचार त्याचे मनांत येत जात होते.

---

* * * * * * * *

आज दीपावलीचा मंगलमय दिवस ! गडावर जिकडे तिकडे आनंदीआनंद उसळला होता. फक्त एकच व्यक्ति दुःखी–राणाजी ! या चार पांच दिवसांत त्यानें गडावरील दासदासींना अगदीं खोदखोदून विचारिलें. बारकाईनें मंगलेचा शोध केला. पण जो तो झणाला, "जोहाराचे आदले दिवसापर्यंत आपण पाहिली. पुढें आपल्यास माहीत नाहीं." मग काय ती लढाईंत पडली? तसें झणावें तर तिचा मुडदा सांपडायला पाहिजे होता. पण तो तर कोठेंही आढळला नाहीं. तेव्हां आतां पुढें काय करावें अशी राणाजीस मोठी काळजी पडली. जोहाराचे अगोदर हमीरदास किल्ल्यावर होता. त्याला विचारावें तर त्याचा पत्ताही नव्हता. त्याच्या भगिनीसंबंधीं निश्चित असें राण्यानें कांहींच सांगितलें नाहीं. त्यामुळें तो रुसून गेला असावा, असें राणाजीस वाटलें.

गडावर दीपोत्सवाची तयारी मोठ्या गडबडीनें चालली होती. स्वतः राणाजी व्यवस्था सांगत होता. इतक्यांत एका दासीनें येऊन सांगितलें, " महाराज, त्या आल्या आहेत. "

" त्या कोण ? " राणाजीनें आश्चर्यानें विचारिलें.

" त्या आपल्या," दासी गुटमुटट ह्मणाली, "आपल्या मंगलाबाई–"

राणाजीवर वज्राघातच झाला ! मंगला लढाईंत नाहींशी झाली असल्यास एक प्रकारें बरेंच आहे, असें त्याच्या मनानें घेतलें असतां दासी येऊन सांगते–'मंगला आली आहे ! ' आश्चर्य ! तिला या गडावर पुन: येण्यास कांहीं लाज, कांहीं भीति वाटूं नये अं ? असेच विचार त्याचे मनांत आले व तो कपाळाला आंठ्या घालून ह्मणाला, " हं चल– ती कोठें बसली आहे ? "

" आपल्या त्या रंगमहालांत."

रंगमहालांत ! " राणाजी ओंठ चावून स्वत:शींच ह्मणाला, किती निर्लज्ज ? ज्या महालांत तिनें प्रत्यक्ष आपल्या पतीचा खून करण्याचा निश्चय केला, तिनें या महिन्यांत नवऱ्याचें नांवही घेतलें नाहीं, जिच्या बापानें अन्यायाचें वर्तन केलें, ती मंगला निर्लज्जपणानें पुन: गडावर येते. येते ती येते आणि पुन्हा मला भेटीला बोलाविते–तेव्हां स्त्रीचरित्र गहन खरेंच." असें पुटपुटत व ओंठ चावीतच तो महालाच्या दाराशीं आला. दार पुढें केलें होतें.दासीनें तें पुढें होऊन उघडलें आणि ती बाजूला झाली. राणाजी आंत गेला. त्यानें इकडे तिकडे मुळींच पाहिलें नाहीं. तो कोचावर जाऊन बसल्यावर नंतर त्यानें समोर पाहिलें तो थोड्या अंतरावर मंगला उभी ! प्रथम भेटीला तिचा जो पोषाख होता तोच आतांही तिनें धारण केला होता. यामुळें राणाजीस तिची सहज ओळख पटली.तो तिच्याकडे पाहूं लागतांच ती बाहेर गेली व आसपास कोणी नाहीं अशी पक्की खात्री होतांच, ती पुन: आंत आली. राणाजी कांहीं क्रोधानें व कांहीं आश्चर्यानें तिच्या हालचालीकडे पाहात होता. दैवाची गति काय विचित्र आहे ! त्या महालाचेंही किती चमत्कारिक नशीब ! कशाही समारंभानें कां होईना, पण मंगला राणाजीची पत्नी ! आणि तिच्याविषयीं त्याचे मनांत किती हिडीस भावना ! मंगला हळू हळू राणाजीजवळ आली आणि आपल्या पदराखालून डावा हात पुढें करून एक चिटोरें राणाजीपुढें केलें. राणाजी त्याकडे दुर्लक्ष करून ह्मणाला, " मी चिटोरीं

पाहात बसत नाहीं. तूं येथें कां आलीस तें सांग आणि एकदम येथून चालती हो ! ” तरीही मंगलेनें तें चिटोरें त्याचे अंगावर फेंकलें. अतिशय तिरस्कारानें त्यानें तें वाचलें. एकच ओळ—

‘ कृतापराधाची क्षमा करून दासीचा अंगिकार करावा.’

राणाजीनें एकवार तिच्या अवगुंठित मुद्रेकडे पाहिलें. तो तें चिटोरें तिच्याकडे फेंकून ह्मणाला, “ असें चिटोरें घेऊन येण्यास तुला लाज वाटली पाहिजे. पण तूं ह्मणजे पक्की निर्लज्ज ! जा, एक क्षणभरही तूं आतां येथें थांबूं नकोस. मला तुझें दर्शनही असह्य होत आहे.”

मंगला हंसली ! तें ऐकून राणाजी जास्तच चिडला. तो ह्मणाला, “ तुला हंसु येतें ! आपल्या पतीची विटंबना करण्यांतच तुला मौज वाटते अं ? जा—पुनः सांगतों, एकदम तूं इथून चालती हो ! माझ्या गडांत एक क्षणभरही थांबूं नकोस.”

मंगला घोगऱ्या स्वरांत ह्मणाली, “ आपली आज्ञा मान्य आहे. पण मीं जावें अशी आपली अगदीं मनापासून इच्छा आहे ना ? ”

“ हो—हो—टळ लौकर आतां.”

“ पाहायचं बरं—मागून वाटेल मंगला हवीशी—”

“ अग जा ! मला तुझा उपदेश नको आहे.”

“ आपला माझा कांहीं संबंध नाहीं असेंच ना ? ”

“ अगदीं नाहीं. न् असला तरी मला तुझी गरज नाहीं.”

महाराज ! आपण रजपूत आहांत ! ते कधींही वचनभंग करीत नाहींत. मला असं वचन द्यावं कीं, माझा तुझा संबंध तुटला.” असें ह्मणून तिनें आपला उजवा हात पुढें केला. राणाजी त्यावर हात मारणार तोंच ती ह्मणाली, “ महाराज हळूं अं ! माझ्या तळहाताला थोडीशी इजा झाली आहे. तेव्हां वचन हलकेंच द्या ह्मणजे मी जातें.” तिचें हें भाषण ऐकून मात्र राणाजी दचकला !

“ द्यायचं ना वचन ! आपल्याला मजपासून त्रास व्हावा अशी माझी इच्छा नाहीं.”

राणाजीनें तिच्या हातावर हात मारला ! मंगला आपला हात मागें घेत ह्मणाली, “ आपल्याला वचनभंग करण्याचा प्रसंग न येवो ! हें पहा महाराज–” ती द्वारापर्यंत जाऊन ह्मणाली, “ ही मी आपल्या आज्ञेप्रमाणें चाललें. आतां मी पुनः कधींही येणार नाहीं.” असें ह्मणून तिनें आपल्या तोंडावरचा बुरखा बाजूला केला ! राणाजी पाहतो तों काय, त्याची प्रणयिनी कावेबाज मुद्रेनें त्याचेकडे पाहून हंसत होती ! “ महाराज मी जातें अं ! ” असें ह्मणून ती तेथून पळून गेली ! राणाजी आश्चर्यानें वेडा होऊन द्वाराकडे पाहात राहिला. आपण स्वप्नांत आहोंत कीं जागे आहोंत याचाच त्यास भ्रम पडला !

———

* *　* *　* *　* *　* *
*　*　*　*
* *　* *　* *　* *　* *

आपल्या साऱ्या आयुष्यांत राणाजी इतका खुळा कधींही झाला नव्हता ! त्याच्या विचाराचाच त्याला कांहींही उमज पडेना. एकदां वाटे, मंगला, हमीरदास, आपली प्रणयिनी ही सर्व मंडळी एकत्र होऊन त्यांनीं आपल्यावर कांहीं तरी जादू केली आहे. दुसऱ्यांदा वाटे, मालदेवाचें हें कांहीं तरी कपटकारस्थान आहे. पुनः वाटे, आपल्या प्रणयिनीनेंच आपली थट्टा करण्याकरितां असें केलें. एकदां तर त्यास असेंही वाटलें कीं, ही सर्व भुताटकीच असावी. खरें कांहीं असो. राणाजीच्या मनाची मात्र अगदीं त्रेधा उडाली हें खास. त्या तरुणीनें मंगलेचा पोषाख घेऊन आपणास कसें फसविलें, आपल्यापासून कसें वचन घेतलें आणि शेवटीं, “ आपल्या आज्ञेप्रमाणें मी जातें. आतां पुनः कधींही येणार नाहीं.” असें ह्मणून पळून गेली ! किती कावेबाज ! पण आतां पुढें काय करावयाचें ? आपली पत्नी मंगला आणि ती तरुणी एकच व्यक्ति असोत किंवा त्या तरुणीनें मंगलेचें सोंग घेऊन आपणास फसविलेलें असो. तिचा आतां शोध कसा करावयाचा ? गडावर उघड शोध कसा करतां येईल ! आणि शोध करायचा कोणाचा ? मंगलेचा कीं त्या तरुणीचा ? राणाजी जो जो

विचार करूं लागला तो तो जास्तच हतबुद्ध होऊं लागला ! एवढा रण-धुरंधर आणि राजनीतिज्ञ पुरुष, स्त्रीचातुर्यापुढें भांबावून गेला !

त्याची प्रणयिनी निघून गेल्यावर तो बराच वेळ दाराकडे पाहात स्तब्ध बसला होता. नंतर तो उठला व ज्या दासीनें त्यास मंगला आल्याचें सांगितलें होतें, तिला त्यानें एकीकडे बोलावून उलट सुलट प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. पण त्यापासून कांहींही फायदा झाला नाहीं. त्या दासीनें सांगितलें, " मी या महालांतच केर काढीत होतें, तोंच त्या बाई आल्या व त्यांनीं मला आपल्यास बोलावून आणण्यास सांगितलें. त्या कशा आल्या, केव्हां आल्या आणि कूठून आल्या हें मला कांहींच माहीत नाहीं. त्यांचें नांवही मला माहीत नाहीं. त्यांनीं मंगला असें सांगितलें. एवढेंच." अशा प्रकार त्या दासीच्या सांगण्यानें कांहीं उलघडा पडला नाहीं. तेव्हां त्यानें इतर दासदासींच्याजवळ चौकशी केली. बहुतेकांच्या सांगण्यांत असें आलें कीं, " अशा बाई आलेल्या पाहिल्या खऱ्या; पण त्या कशा आल्या आणि कशा गेल्या हें कांहींच माहीत नाहीं." अशी जेव्हां सर्व बाजूंनीं निराशा झाली, तेव्हां मात्र राणाजीला ' ही सर्व भुताटकी तर नाहीं ? " अशी शंका येऊं लागली. या वेळीं संध्याकाळ झाली होती तरी त्यानें वाडींत जाऊन त्या तरुणीचा तपास करण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें तो स्वार होऊन तिकडे वळला !

पण तेथें जाऊन पाहतो तों कोणीही नव्हतें. घर बंद ! शेजारी तपास करतां कळलें कीं, आपल्या मुलीला घेऊन तिचे आईबाप आपल्या जांवयाच्या घरीं गेले ! राणाजी भ्रमिष्टासारखा परत आला. या वेळीं गडावर सर्वत्र रोशनाई झाली होती ! सर्व माणसें आनंदांत होतीं. नौबद झडत होती. सनयांचे मधुर आलाप निघत होते. सर्वत्र आनंदी आनंद ! फक्त एकच प्राणी दुःखी ! राणाजी हमीर ! गडावरील लोकांना त्याची कल्पना तरी होती काय ? होय-हरदेवासारख्या कांहीं मंडळींना संशय आला होता, पण राणाजी इतका त्रासीक बनला होता कीं, प्रत्येक शब्दाला आणि प्रत्येक बाबतींत तो खेकसून बोलूं लागला होता. पुष्कळांना याचें आश्चर्य वाटलें ! वास्तविक राणाजी किती आनंदी आणि मन मिळाऊ ! पण एका स्त्रीनें त्यास मंडळींतून उठविलें होतें. हरदेव

अविचारी! त्यानें चापून ह्मटलें, " महाराज ! राज्यमद कसा असतो, हें आपल्यावरून चांगलें समजलें." या शब्दांनीं मात्र राणाजी थोडा शुद्धीवर आला. तो हरदेवाचे खांद्यावर हात टाकून ह्मणाला, " हरदेवा ! तसें नाहीं. हा राज्यमद नव्हे ! पण मी अतिशय दुःखी आहें." हरदेव कांहीं बोलला नाहीं. त्यास आपल्या धन्याबद्दल वाईट वाटलें. बऱ्याच वेळानें त्यानें विचारिलें; " पण महाराज, हें कसलें दुःख ? " राणाजी करुणवाणीनें बरळला, " तें मला तरी कुठें माहीत आहे ? " असें ह्मणून तो दुसरीकडे गेला. हरदेवही आश्चर्य करीत दुसरीकडे गेला.

आज लक्ष्मीपूजन ! कुलाचाराप्रमाणें गडावर सर्व गोष्टी होत होत्या व त्यांत एकाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें राणाजी इकडून तिकडे हालत होता, एवढेंच. एकाही गोष्टींत त्याचें लक्ष्य नव्हतें. दुपारीं भेटीचा दरबार झाला ! राणाजीची मुद्रा चिंतेनें काळवंडली होती रात्रभर झोंप न आल्यानें त्याचे भारावलेले नेत्र सांगत होते. दरबारांतील पुष्कळांना ह्याचें नवल वाटलें. तीन वाजतां दरबार आटपला व राणाजी अभिष्ठाप्रमाणें आपल्या त्याच रंगमहालाच्या दाराशीं आला. तो आंत शिरणार तोंच समोरील कोचावर ही अलंकारविभूषिता, सुहास्यवदना चारुगात्री रमणी कोण ! तिचें सौंदर्य पाहून राणाजी तेथल्या तेथें खिळल्यासारखा झाला ! रमणीला याचें कांहीं भान नव्हतें. ती पुष्पमाला करण्यांत अगदीं चूर झाली होती ! ती कोचावर बसली होती. एक पाय वर घेतला होता व एक खालीं लोंबत सोडला होता. पायांतील भूषणाच्या भारामुळें ह्मणा अथवा पाय लोंबता सोडल्यामुळें ह्मणा, अथवा नाजुक पाऊल लाल दिसत होतें ! तलम सुताचा लेहंगा–रेशमी झिरझिरीत ओढणी शरीराची शोभा द्विगुणित करीत होती. कमरेंतील रत्नखचित पट्टा, गळ्यांतील रत्नहार चमकत होते! राणाजीनें हें सर्व नेत्र भरून पाहिलें! नेत्रांची तृप्ति झाली नाहीं! त्या तरुणीनें एकदम दचकून वर पाहिलें ! उठण्याची कोण त्वरा ! पायांतील नुपूरांचा मंजुळ नाद किती मनोहर ! आणि लज्जेमुळें गालावर पसरलेली लाली ! ओंठावरील मंदहास्य ! राणाजीनें ओळखलें–त्याची प्रणयिनी ! ओळख पडतांच राणाजी एकदम पुढें झाला व उद्वेगानें ह्मणाला, " चांडाळणी, तूं आहेस तरी कोण ? केवळ अशा गूढ–

रहस्यमय लीला दाखवून आणि आश्चर्याखालीं मला दडपून ठार करण्याचा विचार आहे काय ? तरुणी किती निष्ठुर ? ती हंसली ! त्या हंसण्यांत किती माधुर्य ! तरुणी बोलूं लागली–राणाजींच्या कर्णावर अमृतवर्षाव होऊं लागला, " महाराज, आपल्याला त्रास होत असेल तर ही पहा चाललें." राणाजीनें चटकन् पुढें होऊन तिचा हात धरला व करुणवाणीनें ह्मटलें, " छे छे. सुंदरी ! मी आपला पराभव कबूल करतों. तुझ्या चातुर्यापुढें मी अगदीं निष्प्रभ झालों आहें. मी वीर खरा, पण आज तूं मला आपला दास केलेंस. तेव्हां आतां यापुढें तूं आपली ही जादुगारी एकदम बंद कर."

तरुणी हात सोडवून घेत ह्मणाली, " छे महाराज, आपल्याला त्रास होईल." असें ह्मणून तिनें हात सोडवून घेतला व दाराकडे धांव घेतली. राणाजीनें पुनः त्वरा करून तिला पकडलें व ह्मटलें, " नाहीं. आतां मुळींच नाहीं सोडणार–"

" महाराज, आपला वचनभंग होत आहे."

" होऊं दे–मला त्याची फिकीर नाहीं." असें ह्मणून तो तिला ओढीत कोचावर जाऊन बसला ! तरुणी त्याचेकडे पाहून हंसत हंसत ह्मणाली, " महाराज, एका रणधुरंधुर, राजनीतिज्ञ पुरुषाचें शहाणपण स्त्रीपुढें इतकें लवचीक ठरेल असें मला वाटलें नव्हतें. एकंदरींत जगांत स्त्रियांना अबला आणि मूर्ख ह्मणण्यापेक्षां पुरुषाकडेच ते हुद्दे दिल्यास जास्त सयुक्तिक दिसेल असें वाटतें. असो. आतां मी कोण ? महाराज– काय ? आपल्याला कांहीं कांहीं कल्पना होत नाहीं ? आवाजावरून, शरीराचे ठेवणीवरून, पायाच्या चालीवरून मनुष्य ओळखणें अशक्य कां आहे ? मला आपण तेव्हांच ओळखाल असें भय वाटत होतें. पण येथें पाहावें तो उलटच प्रकार ! पहा–महाराज अद्यापिही मजकडे नीट पहा–मी आपल्याला चालून दाखवूं कां ? असें ह्मणून ती चालून दाखविणार तों राणाजी तिचा हात घट्ट धरून ह्मणाला, "ही पळून जाण्याची क्लृप्ति वाटतं ! "

" छे छे," ती त्याचे पायाजवळ बसून त्याचे पायावर हात ठेऊन वर पाहात ह्मणाली, " एकदां मी या पायाची दासी झालें, ती काय

पळून जाण्याकरितां. नाहीं-नाहीं ! इकडून मला लाथा मारून घालवून देण्यांत आलें तरी मी जाणार नाहीं. हे पाय माझे प्राण ! त्यांना सोडून मी कुठं जाणार ? नाथ, दासी आपल्या सेवेंत किती दिवस तरी होती; असें असून आपण तिला ओळखली नाहीं-आश्चर्यच ह्मणायचं ! ऐकायचं मी कोण ती. आपलं नांव घेऊन त्याला 'दास' हा शब्द जोडणारी व आपल्या सेवेंत राहणारी व्यक्ति मी ! "

राणा हमीर दचकून तिच्याकडे डोळे फाडून पाहात आश्चर्यानें ह्मणाला, " काय ? तूं हमीरदास ? "

" होय नाथ ! मी आपली सगळी हकीकत सांगतें; पण मग मला क्षमा होइल ना ? "

" तुला क्षमा-पूर्ण-अगदीं मनापासून क्षमा ! ऊठ-चल अशी माझ्याजवळ येऊन बैस ! आणि आपली हकीकत सांग. " असें ह्मणून तो तिला उठवूं लागला, तेव्हां ती ह्मणाली, " नको नाथ, मी कितीही शूर असलें तरी मी या पायाची दासी ! आपल्या बरोबरीनं बसणं अधमपणाचं होईल." असें ह्मणून ती पुन: पायाशींच बसून ह्मणाली, " नाथ, पुढील वाक्य उच्चारण्याला थोडी भीति वाटते. माझा तिरस्कार होईल कीं काय अशी शंका येते; पण नाहीं-आपल्या त्या दृष्टींत प्रेम आहे. नाथ ! आपलें शत्रुत्व पत्करणाऱ्या मालदेवाची कन्या मंगला ती मीच. रणभीराची भगिनी ती मीच ! काय, अद्यापिही महाराजांना मी प्रिय आहें ?"

राणाजी एकदम ह्मणाला, " होय-तूं मला प्राणापेक्षांही प्रिय आहेस."

मंगला हंसली. ती ह्मणाली, " आणखी एक गोष्ट सांगतें. आपण माझें करग्रहण करण्यापूर्वींच मी विधवा होतें."

" तें मला माहीत आहे. " राणाजीनें शांतपणें ह्मटलें.

" नाथ ! " मंगला गद्गदलेल्या स्वरानें ह्मणाली, " आपल्या शौर्याप्रमाणें आपलें औदार्यही अलौकिक आहे. आतां मी आपली पुढील हकीकत सांगतें. आपल्यास विश्वासघातानें नाहींसें करण्याकरितांच लग्नाचे निमित्तानें येथें बोलाविलें होतें. आपल्यासंबंधीं मला कांहीं एक माहिती,

नव्हतो व माझ्या पहिल्या विवाहासंबंधीं मला कांहींच स्मरण नव्हतें. आपण अतिशय शूर आहांत एवढेंच मीं ऐकलें व विवाहास उभी राहण्यास कबूल झालें! आणि प्रथम मी आपल्या पित्याच्या कटांत होतें ह्मणण्यास हरकत नाहीं. पण आपणाला पाहतांच माझें मन एकदम पालटलें व मीं आपल्या रक्षणाकरितां प्राणही खर्ची घालण्याचा निश्चय केला. भुलैयेची आपणावर योजना झाली होती. मीं उघडपणें कांहींही नकार दर्शविला नसल्यामुळें माझा संशय येण्याचें मुळींच कारण नव्हतें. त्यामुळें मला भुलैयेवर नजर ठेवतां आली व त्या दिवशीं तिच्या हातावर बाण मारून आपलें रक्षण केलें! पुढें आपल्यास तिच्याकडे भोजनास बोलाविलें. भुलैया आपल्या सौंदर्यानें आपणास जाळ्यांत ओढणार होती व आपल्याला भोजनांत कांहीं संशय येईल ह्मणून मी दासीचा पोषाख करून आपणास पत्र दिलें. भोजन झाल्यावर आपण महालांत गेलां व तेथें मी आपली काय स्थिति आहे हें पाहण्याकरितां आलें असतां आपण तलवार मागितली. पण एकाएकीं आपणाकडे तलवार कशी पोंचवितां येणार ह्मणून मला आपली भेट होईपर्यंत दम खाणें भाग होतें. इकडे भुलैयेकडून जेव्हां काम फसलें तेव्हां बाबांनीं मला तें करण्यास सांगितलें. मला आपल्यास तलवार द्यावयाची होती. ती कशी द्यावी? संशय तर येतां उपयोगी नाहीं. तेव्हां मींच बाबांना सांगितलें, तुह्मी तलवार आणून द्या ह्मणजे काम करतें. महालांत येतांच मी आपणास सर्व सांगणार होतें. पण दैवाची गति विचित्र! आपलें मन संशयांत पडलेलें. इतक्यांत बाबांनीं तलवार आणून दिली. त्याचा अर्थ आपणास भलताच वाटला! पुढें काय झालें तें माहीत आहेच. आपण निघून गेल्यावर मला चैन पडेना. आपली कृपा कशी संपादन करावी आणि किल्यांतून बाहेर पडण्यास काय युक्ति योजावी, या विचारांत मी होतें. तोंच मला एक संधि मिळाली. त्या संधीचा फायदा घेऊन मी गडाबाहेर पडलें. पण आतां आपल्या कृपेंत कसें शिरायचें? तेव्हां अखेरीस मर्दानी वेशानें आपणाकडे येण्याचें ठरविलें. आपल्याशीं युद्धाचा प्रसंग घालते वेळीं मला किती चमत्कारिक वाटलें पण? मी सदा युद्धाचे पोषाखांत राहीन अशी अट केवळ आपण ओळखूं नये एवढ्याचकरितां.

कारण भुलैयेला आपण ओळखलें होतें. असो. आपल्या युद्ध-कौश-ल्यानें मी आपल्या कृपेंत शिरलें. पुढें चितोरगड घेण्यांत सहाय्य कसें व्हावें, या विचारांत असतां मला एक कल्पना सुचली. मी पुनः गडावर आलें. कांहीं तरी थापा देऊन बाबांना बाहेर काढावें लागलें. बनवीरास दिल्लीला पाठविलें. त्या दिवशीं रणभीर दादानें आपणाशीं लढण्याचा प्रसंग घातला नसता तर आपली फौज त्या बनावट पत्राप्रमाणें किल्यांत घतली असती. कसेंही असो. सत्याचा विजय होऊन शेवट गोड झाला आहे." असें ह्मणून मंगला स्तब्ध बसली. तिची मुद्रा प्रसन्न झाली होती. प्रेमळदृष्टीनें ती आपल्या प्रियपतिकडे पाहूं लागली. राणाजीनें तिला उठवून गाढ प्रेमालिंगन दिलें व ह्मटलें, "आणि राणीसाहेब, तें मुक्याचें नाटक कां केलें होतें—तें नाहीं सांगितलें ?"

मंगला हंसली ! आपल्या प्रियकराच्या गळयाभोंवतीं हात टाकून ती ह्मणाली, "स्त्रीजवळ ईश्वरदत्त अशीं दोन हत्यारें आहेत. एक शील आणि दुसरें सौंदर्य ! दुष्टाचा पराभव करण्यास आह्मी शीलाचा उप-योग करतों. आणि सौंदर्याचा प्रयोग पतीवर करून त्यास वठणीवर आणतों ! त्यांतलाच तो एक प्रकार ! बाकी आमच्यापुढं अखेरीस पुरु-षांना हारच खावी लागते हो !" राणाजीनें हंसत हंसत तिच्या हंस-णाऱ्या ओष्ठांना पारितोषक दिलें. त्या पहिल्याच प्रेमचुंबनानें मंगलेचीं गात्रें हर्षरोमांचित झालीं व तिच्या कपोलद्वयाची शोभा वाढली ! आपल्या प्रियकराकडे एक प्रणयकटाक्ष फेंकून ती खालीं पाहूं लागली. राणाजी प्रेममूढ होऊन तिच्याकडे किती वेळ तरी पाहात होता. नंतर तो तिच्या हनुवटीला हात घालून ह्मणाला, "खरेंच मंगले, आतां एकेक गोष्टी माझ्या मनांत येतात. अन् असें वाटतें कीं, मी तुला ओळखायला पाहिजे होतें. तुझें तें युद्धनिमंत्रणाचें पत्र पाहून—"

मंगला मंदस्मित करीत आपल्या पतिकडे पाहूं लागली. राणाजी पुढें सांगूं लागला, "त्यांतील अक्षर मला ओळखीचें वाटलें; पण त्याचें बरोबर स्मरण मला झालें नाहीं. तें जर ओळखतें तर चितोरवरील दासी आणि हमीरदास हीं दोन्हीं माणसें एकच आहेत, असें कळतें–"

"मग आह्मा स्त्रियांची जादू ती काय ?"

राणाजीनें तिला आपल्या हृदयाशीं धरून ह्मटलें, " मंगले, आज तूं आपल्या चातुर्यानें माझा पराभव केलास— तुझा मुखचंद्र किती रमणीय आहे ! "

" पण तो **लांच्छित चंद्रमा** आहे."

" मग त्यांत काय आहे ? कलंकामुळें तर चंद्राला विशेष शोभा ! आणि तुला लागलेलें लांच्छन कांहीं तुझ्या गुणामुळें नव्हे. त्याला कारण तो—" राणाजीनें आपली जीभ चावली.

" जाऊंदेत त्या गोष्टी—आनंदरूपी अमृतवर्षावांत तो विद्युत्पात काय करायचा ? "

राणाजी अनिमिष नेत्रांनीं आपल्या प्रियतमेकडे पाहात होता. मंगलाही मधून मधून त्याचेकडे पाही व नंतर तोंड वळवून हंसूं लागे. राणाजी विनोद करण्याचे हेतुनें ह्मणाला, " आतां तरी तूं खरी स्त्री जातीचीच आहेत ना ? नाहीं तर उद्यां ह्मणशील—" पण पुढें राणाजी न बोलतां एकदम हंसूं लागला. त्या हंसण्यानें मंगला पुष्कळच ओशाळली. बऱ्याच वेळानें ती ह्मणाली, " मी आपली जादुगारीण ! "

असें ह्मणून आपला बाहुपाश घट्ट करून आपल्या प्रिय पतीला आपल्या हृदयाशीं धरलें.

इतक्यांत त्या जोडप्यावर कोणीं तरी फुलें उधळलीं ! दोघेही वर पाहतात तों भगवीं वस्त्रें धारण केलेली भुलैया ! दोघींही परस्परांच्या प्रेमांत इतकीं दंग झालीं होतीं कीं, भुलैया आंत केव्हां आली याचें त्यांना भानही नव्हतें. त्यामुळें त्या देवीस्वरूप बनलेल्या भुलैयेला पाहतांच दोघांनाही ओशाळल्यासारखें झालें ! मंगला चटकन् दूर झाली. भुलैया शांतपणें सस्मित होऊन ह्मणाली, " छे छे, राधे ! कृष्णापासून दूर होऊं नकोस—जा—जा त्याचे अंकावर बैस ! मला तुमचें प्रेमळ ऐक्य पाहूं दे ! "

**भुलैयेची मुद्रा किती तेजस्वी ! बोलणें किती अधिकारयुक्त ! राणाजी आणि मंगला दोघींही चकित झालीं ! दोघांच्याही मनांत भुलैयेविषयीं भक्ति उत्पन्न झाली. राणाजी तात्काळ पुढें झाला व तिच्या**

पायांवर मस्तक ठेवून ह्मणाला, " माते ! तूं धन्य आहेस ! ! " भुलैया हंसली. मंगलेनेंही आपल्या पतीचें अनुकरण केलें. भुलैयेनें तिच्या मस्तकावर हात ठेवून मंगल आशीर्वाद दिला आणि ह्मटलें, " मंगले, शील आणि सौंदर्य यांचा असाच उपयोग कर बरें ! " नंतर ती राणाजीला ह्मणाली, " राणाजी, मला स्थिति प्राप्त होण्यास कारण तुह्मी ! ईश्वर तुमचें कल्याण करो ! दुर्दैवानें माझा उद्धार होण्यास मला हा देह टाकला पाहिजे. आणि तसा दृष्टान्त झाला ह्मणून यात्रा करण्यास जाणार. त्यापूर्वी तुमची भेट व्हावी अशी इच्छा झाली आणि ह्मणूनच मी येथें आलें. मला तुह्मां दोघांना एक ठिकाणीं पाहून फार आनंद झाला. श्रीकृष्णांनीं राधेसह मला अद्याप दर्शन दिलें नाहीं. पण तुमचें रूप पाहून तुह्मी राधाकृष्णच आहांत असें वाटलें. राणाजी, मंगले ! सुखी असा ! पुष्कळ पुष्कळ दिवस सुखानें राज्य करा ! संततीसंपत्तीचा उपभोग घ्या आणि त्या ईश्वराला भजा ! तो तुमचें कल्याण करील ! "

राणाजीनें आणि मंगलेनें खालीं लवून नमस्कार केला. भुलैया पुढें ह्मणाली, " आतां मी जातें. कधीं कधीं माझी आठवण झालीच तर माझा उद्धार लौकर होण्याबद्दल देवाला प्रार्थना करा. जाऊं आतां मी ?" तिचा स्वर कांपरा येऊं लागला व पापण्यावर अश्रु दिसूं लागले. त्या दोघांनाही मोठें चमत्कारिक वाटलें. भुलैया आपले अश्रु पुसून ह्मणाली, " बाबानों ! आतां एकच इच्छा आहे. राणाजी, मंगलेला आपल्या अंकावर घे ! मंगले, चल बैस आपल्या सिंहासनावर ! लाजूं नकोस ! आईपुढें मुलांनीं कसलें लाजावें ? " असें ह्मणून तिनें पुढें होऊन मंगलेस राणाजीजवळ नेलें. त्या दोघांनींही मग विशेष संकोच धरला नाहीं. राणाजीनें आपल्या पत्नीस आपल्या डाव्या अंकावर घेतलें. दोघांनींही परस्परांच्या खांद्यावर हात टाकले. भुलैया आनंदानें त्यांचेकडे पाहात ह्मणाली, " हं ! मंगले, थोडी वर पाहा ! मला तुमचें रूप डोळे भरून पाहूंदे ! अस्सें ! अगदीं राधा-कृष्णासारखें शोभतां ! " असें ह्मणून तिनें पुनः त्यांचेवर फुलें उधळलीं !--

---

# इतिहासाचे शब्दांत समारोप.

" चितोडगड आपल्या हातांतून गेल्यावर मालदेव स्वतः दिल्लीस गेला. तेथें अल्लाउद्दीनाचे मागून ( ! ) महमूद खिलजी ( ! ) हा तख्तावर बसला होता. त्यानें हमीराचें हें कृत्य ऐकून आपली फौज तयार केली आणि ती घेऊन तो स्वतः हमीराचा समाचार घेण्यास निघाला. परंतु इकडे लोकांस हें वर्तमान कळल्याबरोबर हमीराला चोंहोकडील हिंदु संस्थानिकांची मदत येऊन पोंहोचली. ..१... हमीर चितोडच्या गादीवर परत आला ह्मणून परमानंद झाला होता आणि याकरितांच जो जो ह्मणून हिंदु होता त्यानें त्यानें होईल तितकी हमीरास मदत केली. यामुळें हमीराचें सैन्य फारच बलाढ्य झालें. शेवटीं महमूद खिलजी आणि हमीर यांचें चंबळा नदीवर सिंगोली येथें युद्ध होऊन महमुदाचा सर्वांशीं पराजय झाला व तो हमीराचे हातांत कैदी होऊन सांपडला. तो हमीराचे ताब्यांत चितोड येथें तीन महिने सक्त कैदेंत होता. नंतर त्यानें हमीरास अजमीर, रणथंबोर, नागोर व सुइसोपूर हे प्रांत, पन्नास लाख रुपये आणि शंभर हत्ती इतकी खंडणी देऊन आपली सुटका करून घेतली. त्याची सुटका करते वेळीं हमीरानें त्याजपासून, " पुनः अशा स्वाऱ्या करून आपल्याला व आपल्या लोकांना संकटांत व खर्चात घालणार नाहीं. इतकेंच नाहीं तर अशा प्रकारच्या स्वाऱ्या दुसऱ्या कोणी हमीरावर किंवा त्याच्या आसपासच्या मुलखावर केल्यास, त्यामध्यें महमूद खिलजीनें सहाय्यास आलें पाहिजे ! असा त्याजकडून करार लिहून घेतला.

हमीराचे रणभीर व बनबीर असे दोघे मेहुणे असून ते महमूद खिलजीच्या पक्षाचे होते. त्यांपैकीं वरील लढाईंत रणभीर ( आपल्या बापासह ) मारला गेला व बनबीर महमुदाबरोबरच पकडला गेला. पण पुढें त्यास बंधमुक्त करून हमीरानें त्याला निमच, जीरण, रतनपूर वगैरे महाल देऊन सांगितलें कीं, ' तुझें माझें आप्तत्व एकीकडे ठेविलें तरी भी तुझ्या धर्माचा व जातीचा असल्यामुळें तुला हिंदुराज्याचा व राण्याचा अभिमान असूंदे. तूं मोंगलाकडे फितुर होऊन आपल्याकडे अधमपणा व सर्व लोकांत नाचक्की आणून घेऊं नकोस. ' हमीर हा चितोडचा राजा झाल्यापासून सर्व हिंदूंना मोठें भूषण वाटूं लागलें व भोंवतालच्या हिंदुसंस्थानिकांस मोठा आश्रय व पाठिंबा वाटूं लागल्यामुळें ते सर्व हमीरास

हरएक प्रकारचा सन्मान, खंडण्या आणि भेटी देऊं लागले बुंदी, ग्वाल्हेर, चंदेरी, रायहसन, सिक्री, काल्पी, अबू वगैरे ठिकाणचे ठाकूर हमीरास भेटून त्यास मिळाले व जयपूर व जोधपुरचे ठाकूर आत्मखुशीनें त्याचे मांडलिक झाले.

........ चितोडास हमीर हा मोठा पराक्रमी व कुलदीपक राजा होऊन त्यानें आपलें गतवैभव फिरून सर्व मिळविण्याचा निश्चय केला व त्याला आपला हा हेतु सिद्धीस नेण्यास कालही तसाच अनुकूल मिळाला. सर्व लोकांचें त्याजवर प्रेम व त्याला सहाय्य असल्यामुळें त्याला कोणतीही गोष्ट अशक्य नव्हती. तशांतच दिल्लीस खिलजी, लोदी आणि सूर या तीन मोंगल घराण्यांचीं आपआपसांतच भांडणें चाललीं. त्यामध्यें ज्या घराण्याची सरशी होई त्यानें तख्तावर बसावें. असा क्रम चालल्यामुळें लोकांमध्यें अस्वास्थ्य फार वाढत चाललें होतें. अशा संधीस चितोडच्या राजास ( हमीरास ) आपला फायदा करून घेण्यास चांगलें फावलें. त्याच्या फौजा तयार होऊन दिल्ली, सौराष्ट्र व मारवाडांत नागोरपर्यंत जाऊन जय संपादून आल्या. या वेळीं हमीराच्या लोकांनीं जी संपत्ति आणि ऐश्वर्य संपादन केलें होतें, त्याचें दर्शक अशा मेवाडांतल्या भव्य भव्य व सुंदर इमारती आणि त्याजवरचीं कामें पाहिलीं ह्मणजे समजतें. मेवाडच्या एवढ्या मोठ्या फौजांचे खर्च चालून इमारतींमध्यें इतका पैसा घालण्यास त्याजवळ शिल्लक तरी कोठची होती व इतका पैसा त्यांनीं आणिला कोठून याचें मोठें आश्चर्य वाटतें ! बरच दिवसपर्यंत जें त्यांनीं दारिद्र्य आणि पारतंत्र्यजन्य दुःख उपभोगिलें होतें त्याचा सर्व वचपा या कुशल व पराक्रमी हिंदुराज्याचे ( हमीराचे ) कारकीर्दीत लोकांनीं काढून घेतला. चितोड येथील राजघराणें पहिल्यापासूनच कलाकौशल्यास व कारागिरीस उत्तेजन देण्याविषयीं प्रसिद्ध असून हल्लींच्या सर्वमान्य, शांत आणि न्यायी राजपद्धतीनें लोकांची भरभराट फार वाढत चालली होती. यामुळें त्यांना पैशाची तूट ह्मणून पडली नाहीं. याप्रमाणें हमीरानें पुष्कळ दिवस राज्यसुख उपभोगिलें. पुढें थोड्याच दिवसांनीं हमीरास मुलगा झाला ! त्याचें नांव खेतसिंग असें ठेविलें !

—लोकहितवादीकृत राजस्थान.

समाप्त.